ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद सोलापूर यांच्या
उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी
वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ ३० वा.

श्रीमत्परमहंसमरितोंटदार्यकृत

# कैवल्यसार,

हा

वे. शा. सं. रंगाचार्यशास्त्री यांनीं केलेल्या
(महाराष्ट्र भाषांतरासह)

वेदमूर्ति मयूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री
यांनीं सोलापूर येथें
कल्पतरु छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रति १०००

शके १८२८—१९०७



किंमत—॥१०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

# वीरशैवलिंगिब्राह्मण धर्मग्रंथांविषयीं महामहोपाध्याय शिवकुमार पंडित यांचा अभिप्राय.

स्वस्ति श्रीमत्सु पारमेश्वरमाहात्म्यप्रख्यापकग्रंथरत्नप्रख्यापन व्यापारानुमित लोकोत्तरोमासहायपरमेश्वरविभुचरणारविंदभक्तिभाजनेषु मल्लप्पाराव महोदयेषु ॥

परश्शतधन्यवाददानपुरःसरम् द्वाविंशतिसंख्याकानां शैवग्रंथानां मूर्तिमद्भगवत्प्रसादरूपाणां महतान्वेषणेनापि दुर्लभानां अनायासप्राप्त्या नितांतं हृदयसंतोषं आवेदयते ॥

वाराणसी क्षेत्रवास्तव्यः
पंडित शिवकुमारशर्ममिश्रः
महामहोपाध्यायः

विक्रमार्क संवत् १९६४ वैशाखकृष्ण तृतीयायां इयं लिपिः

## वरच्या संस्कृताचें मराठी भाषांतर :—

कल्याण असो. श्रीशिवपरवस्तूचें माहात्म्यप्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांची प्रसिद्धि करीत असल्यामुळें सर्वोत्कृष्ट पार्वतीपरमेश्वरांच्या चरणारविंदी असलेल्या सद्भक्तीची कल्पना अनुमानानें सहज येते. अशा सद्भक्तीला पात्र झालेल्या मल्लप्पाराव महोदय यांच्या विषयीं अनंतवेळां धन्यवाद करतों. आणि बावीस शैवग्रंथ आपण पाठिविले ते मूर्तिमान परशिवाचा प्रसादच मिळाला असें समजतों. व पुष्कळ प्रयत्न केले तरी ग्रंथ मिळणें फार मुष्किलीचें असून मोठ्या प्रयासानें असले ग्रंथ मिळवून आपण प्रसिद्ध करून निरायासानें त्या ग्रंथांचा लाभ मला करून दिला यामुळें माझ्या मनाला अत्यंत संतोष वाटतो.

वाराणसीक्षेत्रवासी.
पंडित शिवकुमारशर्ममिश्र.
महामहोपाध्याय.

विक्रमार्क संवत १९६४ वैशाखकृष्ण तृतीयेच्या दिवशीं ही लिपि लिहिली.

# प्रस्तावना.

मनुष्यप्राणी अहोरात्र सुखाची इच्छा करीत असतो व त्या सुखाकरितां मनामध्यें अनेक कल्पना करीत असतो त्या कल्पनेला अनुसरून शक्य तितके प्रयत्न करतो परंतु त्या प्रयत्नांत अनेक वेळां फसून एखाद्दे वेळेस प्रयत्न सफल झाला ह्मणजे आपण सुखी आहोंत असें, मानीत असतो. हा प्रकार वेदांतशास्त्राच्या दृष्टीनें चुकीचा आहे असें ठरतें. आतां खरें सुख मिळवयास मनुष्यानें नेहमी लिंगांगसामरस्यरूप प्रयत्नच केला पाहिजे याचा विचार या ग्रंथांत चांगल्यारीतीनें केला आहे. ह्मणजे त्या प्रयत्नानें जें कांहीं सुख मिळतें तेंच अक्षय टिकाऊ असून आनंद देणारें आहे. अशा सुखाविषयीं प्रयत्न करणारे महा योगी परम दुर्मिळ असून मायेंत पडून फसणारेच अनेक आहेत. त्यांतल्यात्यांत हल्लींच्या काळांत तर अशा लोकांचाच सुकाळ आहे. फार काय आपण कोण आहोंत, आमचा धर्म कोणता, आह्मी करतों काय याचा विचार करणारे धार्मिक सज्जन वीरशैव क्वचितच आढळतील ही शोचनीय गोष्ट आहे. प्रस्तुत जिकडे तिकडे आपल्या समाजाची अवनति काय दिसते त्या अवनतीच्या अनेक कारणांपैकीं हें एक मुख्य कारण आहे. याकरितां उत्कर्षेच्छु वीरशैवांनीं स्वार्थाकडे किंचित् दृष्टि कमी करून परमार्थाकडे शक्य तितक्या नियमित वेळेंत नजर द्यावी. कारण स्वार्थत्यागपूर्वक उच्च विचाराचा संस्कार मनाला झाल्याशिवाय मनुष्य उच्च वर्गांत जात नाहीं असा सिद्धांत आहे. हा सिद्धांत प्रत्ययास आणून घेण्याकरितां सांप्रत छापून तयार असलेल्या कैवल्यसार ग्रंथाचें वाचन कर्मीत कमी दहा वेळ तरी करावें. जगद्गुरु श्रीमत्परमहंस ब्रह्म श्रीमरितोंटदार्यांनीं लोकोपकाराकरितांच सहमूल स्वार्थाचा नाश करून करून स्वानुभवानें हा ग्रंथ तयार करून ठेवला आहे. ग्रंथ थोडा असून यांतले विचार किती परमावधीच्या उच्च पदवीला नेलेले आहेत तें ग्रंथ मननपूर्वक वाचल्याशिवाय कळावयाचें नाहीं. उदाहरणार्थ यांत असलेल्या अनेक विषयांपैकीं " पिंडस्थल " यांतले विचार पहा. " अशरीर ९ शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितं महांतं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति " या श्रुतीमध्यें शंका समाधानपूर्वक केलेले विचार किती शांत आहेत व उदात्त आहेत ते पाहा. प्रथम येथें शंका अशी घेतली कीं, मनुष्य हा सुखाकरितां केवढ्या मोठमोठ्या उलाढाली करतो परंतु त्याचें रडणें ( दुःख ) आहे तें आहें असें कां व्हावें ? हें कळत नाहीं. या शंकेला या श्रुतीनें उत्तर दिलें आहें तें असें कीं, मनांत सुखाची आशा धरून तदनुसार करावयाचे प्रयत्न ते दुःखाला उत्पन्न करणारेच करावयाचे मग अशानें सुख कसें मिळेल ? एकाद्या भ्रांत मनुष्यानें आपल्या घरच्या खांबाकरितां किंवा तुळई वगैरेकरितां मोठ्या झाडावर चढून जोरानें झाडाच्या मुळाशी जर कुऱ्हाडीचे घाव घातले तर त्या झाडासह आपणही खालीं पडून तो जबर दुखापतीनें मरण पावला तर यांत नवल कोणतें ? त्याप्रमाणें आत्मा हा ( जीव हा ) आनंदस्वरूप असून कर्मवशात् या मनुष्य शरीरांत आलेला

असतो हें शरीर म्हणजे अनर्थांचें माहेरघर आहे जाणत्याला सांगावयास नको. मातीच्या घागरींत मातीच आहे असें सांगावयास पाहिजे काय ? रक्त, मांस, मज्जा, अस्थि अशा अनेक दुर्गंधि पदार्थांनीं शरीराची रचना असल्यानंतर अशा शरीरावर व्यर्थ अभिमान धरून सुखाचे प्रयत्न केले तर सुख कोठून येईल ? गळयांत धोंडा बांधून पोहावयास शिकणारा मूर्ख पाण्यांत तरंगेल काय ? परंतु यांत सूक्ष्म विचार असा कीं, शरीर रहित, सर्व व्यापी अशी शिवपरवस्तु शरीरांत अलिप्तपणें काय राहिली आहे तो वस्तु मीच आहे असें ज्ञान जेव्हां करून घेईल तेव्हां खरें सुख मिळेल. परंतु हें ज्ञान करून घ्यावयास मोठें धैर्य व साहस करावें तें धैर्य म्हणजे हें शरीर माझें नव्हे असें म्हणणें हेंच होय असा धीर जो असेल तो कधीही दुःख करीत नाहीं. असो.

याप्रमाणें मनुष्याचे विचार इतक्या उच्च पदवीला गेल्यानंतर अवनतीला प्रवेश करावयास मुळींच जागा सांपडावयाची नाहीं. अशा रीतीनें श्रुति, स्मृति, आगम यांतल्या प्रमाणांनी चांगल्यारीतीनें विवेचन केलेल्या या कैवल्यसार ग्रंथाचा आस्वाद अवश्यमेव घ्यावा अशी विनंति रसिक वीरशैवांस करून लेख संपवितों

**प्रसिद्धिकर्ता.**

---

या ग्रंथांचें भाषांतर मोठ्या परिश्रमानें वे शा. सं रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनीं केलें आहे. प्रूफ तपासणें, शुद्धाशुद्ध वगैरे कामें वे. मू. जगदीश शास्त्री नालवार व वे. मू. मल्लिकार्जुन शास्त्री जैनापूर व वे. शा. सं. रंगाचार्य शास्त्री यांनीं केलीं आहेत याबद्दल यांचे आम्ही आभारी आहोंत.

या ग्रंथाची ताडपत्री मूळ प्रत वे. मू. मल्लिकार्जुन शास्त्री जैनापूरकर यांनीं दिलीं आहे याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहोंत.

# कैवल्यसारांतील विषयानुक्रमणिका.


| विषय | पृष्ठ. |
|---|---|
| विषयचतुष्टयनिरूपण ... ... ... | २. |
| स्थलशब्दनिर्वचन. ... ... ... ... | ४. |
| अंगशब्दनिर्वचन. ... ... ... ... | ६. |
| पिंडस्थलनिरूपण. ... ... ... ... | ८. |
| संसारहेयस्थलनिरूपण. ... ... ... | ९. |
| लिंगधारणस्थल. ... ... ... ... | १०. |
| विभूतिधारणस्थल. ... ... ... ... | १२. |
| रुद्राक्षधारणस्थल. ... ... ... ... | १२. |
| भक्तिस्थल. ... ... ... ... | १४. |
| उभयस्थल. ... ... ... ... | १५. |
| चतुर्विधसारायस्थल. ... ... ... ... | १६. |
| त्रिविधसंपत्तिस्थल. ... ... ... ... | १६. |
| उपाधिदानस्थल. ... ... ... ... | १७. |
| निरुपाधिदानस्थल. ... ... ... ... | १८. |
| सहजदानस्थल. ... ... ... ... | १९. |
| भक्तस्थल. ... ... ... ... | २०. |
| लिंगनिष्ठास्थल. ... ... ... ... | २२. |
| पूर्वाश्रयनिरसनस्थल.... ... ... ... | २४. |
| अष्टमूर्तिनिरसनस्थल. ... ... ... ... | २६. |
| सर्वगतनिरसनस्थल. ... ... ... ... | २८. |
| शिवजगन्मयस्थल. ... ... ... ... | ३०. |
| भक्तदेहिकलिंगस्थल. ... ... ... ... | ३१. |
| माहेश्वरस्थल. ... ... ... ... | ३१. |
| प्रसादिस्थल. ... ... ... ... | ३२. |
| प्रसादमाहात्म्यस्थल. ... ... ... ... | ३४. |
| गुरुमाहात्म्यस्थल. ... ... ... ... | ३६. |
| लिंगमाहात्म्यस्थल. ... ... ... ... | ३७. |
| भक्तमाहात्म्यस्थल. ... ... ... ... | ३८. |
| शरणमाहात्म्यस्थल. ... ... ... ... | ३९. |

| विषय. | | | | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| प्रसादिस्थल. | ... | ... | ... | ... ४०. |
| प्राणलिंगिस्थल. | ... | ... | ... | ... ४२. |
| शिवयोगसमाधिस्थल. | ... | ... | ... | ... ४४. |
| लिंगनिजस्थल. | ... | ... | ... | ... ४६. |
| अंगलिंगस्थल. | ... | ... | ... | ... ४७. |
| शरणस्थल. | ... | ... | ... | ... ४८. |
| तामसनिरसनस्थल. | ... | ... | ... | ... ४८. |
| शीलसंपादनस्थल. | ... | ... | ... | ... ५०. |
| ऐक्यस्थल. | ... | ... | ... | ... ५२. |
| एकभाजनस्थल ( शिवैकचित्त ) | | ... | ... | ... ५४. |
| सहभोजनस्थल. | ... | ... | ... | ... ५४. |
| दीक्षागुरुस्थल. | ... | ... | ... | ... ५६. |
| शिक्षागुरुस्थल. ( गुरुनें शिष्यास शासन कसें करावें हें सांगितलें. ) | | | | ... ६०. |
| ज्ञानगुरुस्थल. | ... | ... | ... | ... ६१. |
| क्रियालिंगस्थल. | ... | ... | ... | ... ६२. |
| ज्ञानलिंगस्थल. | ... | ... | ... | ... ६३. |
| स्वयस्थल ( स्वयजंगमलक्षण ) | | ... | ... | ... ६४. |
| परस्थल ( परजंगमलक्षण ) | | ... | ... | ... ६६. |
| आचारलिंगस्थल. | ... | ... | ... | ... ६८. |
| क्रियागमस्थल. ( भाव ठेवून कर्मे करावीं. ) | | | ... | ... ७०. |
| भावागमस्थल. | ... | ... | ... | ... ७१. |
| ज्ञानागमस्थल. | ... | ... | ... | ... ७१. |
| सकायस्थल. | ... | ... | ... | ... ७२. |
| अकायस्थल. | ... | ... | ... | ... ७३. |
| परकायस्थल. | ... | ... | ... | ... ७४. |
| भावाचारस्थल. | ... | ... | ... | ... ७५. |
| ज्ञानाचारस्थल ( शिवसाक्षात्कार करून घ्यावयाचा प्रकार. ) | | | ... | ... ७६. |
| कायानुग्रहस्थल. | ... | ... | ... | ... ७८. |
| प्राणानुग्रहस्थल. | ... | ... | ... | ... ८०. |
| करणार्पितस्थल. | ... | ... | ... | ... ८१. |
| भावार्पितस्थल. | ... | ... | ... | ... ८२. |
| शिष्यस्थल. | ... | ... | ... | ... ८३. |

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| शुश्रूषास्थल ( शिष्यलक्षण ) ... ... ... | ८४. |
| जीवात्मस्थल. ... ... ... ... | ८६. |
| परमात्मस्थल. ... ... ... ... | ८८. |
| निर्देहागमस्थल. ... ... .. ... | ९०. |
| निर्भावागमस्थल. ... ... ... ... | ९०. |
| आदिप्रसादिस्थल. ... ... ... ... | ९२. |
| अंत्यप्रसादिस्थल. ... ... ... ... | ९३. |
| सेव्यप्रसादिस्थल. ... ... ... ... | ९३. |
| दीक्षापादोदकस्थल. ... ... ... ... | ९५. |
| शिक्षापादोदकस्थल. ... ... ... ... | ९६. |
| ज्ञानपादोदकस्थल. ... ... ... ... | ९७. |
| क्रियानिष्पत्तिस्थल. ... ... ... ... | ९८. |
| भावनिष्पत्तिस्थल. ... ... ... ... | ९९. |
| ज्ञाननिष्पत्तिस्थल ( शिवज्ञान महिमा ) ... ... ... | १००. |
| पिंडाकाशस्थल. .. ... ... ... | १००. |
| बिंद्वाकाशस्थल. ... ... ... ... | १०१. |
| महदाकाशस्थल. ... ... ... ... | १०२. |
| क्रियाप्रकाशस्थल. ... ... ... ... | १०२. |
| भावप्रकाशस्थल. ... ... ... ... | १०३. |
| ज्ञानप्रकाशस्थल. ... ... ... ... | १०४. |
| स्वीकृतप्रसादिस्थल. ... ... ... ... | १०५. |
| शिष्टोदनस्थल. ... ... ... ... | १०७. |
| चराचरनास्तिस्थल. ... ... ... ... | १०८. |
| भाजनस्थल. ... ... ... ... | १०९. |
| अंगलेपनस्थल. ... ... ... ... | ११०. |
| भावाभावनष्टस्थल. ... ... ... ... | १११. |
| ज्ञानशून्यस्थल. ... ... ... ... | ११२. |

# कैवल्यसाराची संस्कृत शुद्धाशुद्ध पत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | पंक्ति. |
|---|---|---|---|
| इत्युयेत | इत्युच्यते | १२ | ४ |
| धीर | वीर | १७ | ६ |
| घाताय | घ्राताय | ३४ | ८ |
| सर्वेंद्रिय | सर्वेंद्रिय | ३९ | २ |
| सर्वेंद्रिय | सर्वेंद्रियः | ३९ | २ |
| स्थानि | स्थाने | ४२ | ९ |
| तत्तरीयो | तैत्तरीयो | ४४ | ८ |
| दुर्लभः | दुर्लभः | ६१ | २ |
| मेवोक्तः | मेवोक्त | ६२ | ३ |
| स्वरुपै | स्वरूपै | ६२ | ६ |
| नान्य | नान्यै | ६३ | ६ |
| कर्यां | कायां | ६६ | ६ |
| त | न | ६६ | १२ |
| पृथग | पृथक् | ६७ | २ |
| सर्वां | सर्वा | ६७ | १२ |
| रगमत | रागमत् | ७० | ४ |
| कार | कारं | ७० | ६ |
| निर्मथता | निर्मथनाः | ७१ | ११ |
| नपादि | निपादि | ७२ | ७ |
| वोक्त | वोक्तं | ७२ | १० |
| स्तंदृश | स्तदृश | ७२ | ११ |
| द्बुधो | द्बुधो | ७५ | ७ |
| सकलेद्रियाणि | सकलेंद्रियाणि | ८८ | १७ |
| ग्रथांतरे | ग्रंथांतरे | ८७ | ६ |
| रिंद्रियै | रिंद्रियै | ९० | ५ |
| कथमित्य | कथमित्या | ९० | ७ |
| अंत्यप्रसादिस्थलं | सेव्यप्रसादिस्थलं | ९४ | ९ |

# मराठी शुद्धाशुद्ध पत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | पंक्ति |
|---|---|---|---|
| बरं | वर | ९ | २३ |
| सांगततात | सांगतात | १६ | २६ |
| श्रुातमाला | श्रुतिमाला | २० | १६ |
| उद्धत | उध्दृत | २३ | २५ |
| तैत्तिरीयो | तैत्तरीयो | ४४ | २३ |
| रथानांचा | स्थानांचा | २५ | २१ |
| ग्शव | शिव | ६३ | १६ |
| स्वभावगु यें | स्वभाव गुणामध्यें | ६३ | ३१ |
| पक्षां | पेक्षां | ८४ | २८ |

# विनंति.

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राम्हणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रति कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आम्हांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

भणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री,
सोलापूर.

---

## सूचना.

सार्वजनिकसंस्थांमध्यें सर्व वर्गास हे आमचे ग्रंथ वाचण्यास मिळावे अशा हेतूनें, व जंगमांस व गरीब अशा इतर लोकांना देखील वाचावयास मिळावे, या हेतूनें, विक्रीस तयार असलेल्या २९ ग्रंथांची किंमत निम्मी ठेविली आहे. लायब्ररीच्या सेक्रेटरींनीं किंवा मठाच्या अधिकाऱ्यांनीं पुस्तकाची मागणी करावयाची झाल्यास वरील संस्थांना पाहिजे आहे, निम्म्या किंमतीनें पाठवा; असा खुलासा पत्रांत करावा.

# ॥ श्रीशिवाय नमः ॥

॥ श्रीसांबसदाशिवाय नमः ॥ अथ कैवल्यसारः ॥ वृत्तम् ॥ यदेकमव्यक्तमनंतमीड्यं विभुं स्वयं निष्कलमद्वितीयं ॥ गुरुस्वरूपेण सुखप्रदं तन्निरंजनं लिंगमहं नमामि ॥ १ ॥ स्वाधिष्ठितमखिलमिदं जगदेकीकृत्य मां कृतिं चैतां ॥ ब्रह्मप्रापकगुरुराट् पायाच्चिद्रूपबोळबसवार्यः ॥ २ ॥ श्रीमद्वेदांतमूलोत्थितविमलशतैकस्थलोत्कृष्टमेतं वीराख्यं शैवतंत्रं प्रतिभटहृदयान्तस्तमश्चण्डभानुं ॥ ध्यात्वा चिन्मात्ररूपं गुरुवरमनिशं सिद्धवीराख्यदेवं नीत्वा शांतिं प्रपंचं जगदुपकृतये निर्ममोऽहं च कुर्यां ॥ ३ ॥ एकोत्तरस्थलशतं विमलांगलिंगसंबंधरूपमधिगम्य गुरोः प्रसादात् ॥ कैवल्यसारमखिलात्मसुखावबोधसिध्यर्थमाह भुवि तोंटददेशिकेंद्रः ॥ ४ ॥ गद्यं ॥ ॥ अथ वीरतंत्रोदिताचारसंपन्नसर्वोपनिषत्प्रतिपाद्यज्ञानगोचरकैवल्यसारमारभ्यते ॥ ६ ॥ अथ वीरशैवव्रतनिष्ठो मुमुक्षुर्भक्त एवाधिकारी शिवभक्तिसमासादितांग-

---

## ( कैवल्यसारप्रारंभः )

॥ श्रीसांबसदाशिवास नमस्कार असो ॥ १ ॥ जें एक असून अव्यक्त ( अगोचर ) आहे. व ज्याला अंत नसून जें स्तोत्र करावयास पात्र आहे. व जें सर्वत्र व्याप्त असून कलातीत आहे. गुरूच्या स्वरूपानें सुख देणारें आहे अशी जी वस्तु आहे; ती वस्तु निरंजन असून तिला लिंग असें ह्मणतात. त्या निरंजन लिंगाला मी नमस्कार करतों. ॥ २ ॥ चिद्रूपज्ञानस्वरूपी बोळबसवार्य हा परब्रह्मवस्तु मिळवून देणारा असून गुरुराजा असा ह्मणवून घेतो. असा तो आपल्याठिकाणीं असलेल्या या सर्व जगाचें एकीकरण करून माझें आणि या कृतीचें रक्षण करो. ॥ ३ ॥ जयाच्या उपकाराकरितां प्रपंचाला शांति देऊन चिन्मात्रस्वरूप गुळूरसिद्धवीरनांवाच्या गुरुश्रेष्ठाचें ध्यान करून व त्याला नमस्कार करून प्रतिभटांच्या हृदयांत असलेल्या अज्ञानरूपी अंधाराला प्रचंड सूर्यासारखा असलेलें, व शब्दसौष्टव अर्थसौष्टवरूपी ऐश्वर्य असलेल्या वेदांताच्या मूळापासून उत्पन्न झालेल्या निर्मल शतैकस्थलांचीं ( एकशेएकस्थलांनीं ) उत्कृष्ट असलेलें वीरनांवाचें शैवतंत्र ( नांवाचा ग्रंथ ) निरिच्छपणें मी करतों ( लिहतों ) ॥ ४ ॥ निर्मल अशा अंगलिंगसामरस्यरूप एकोत्तरस्थलशताची प्राप्ति गुरूच्या प्रसादानें करून घेऊन सर्वात्म्याच्या आनंदज्ञानाच्या सिद्धी करितां ( सर्वांना ज्ञान होण्यासाठीं ) या भूलोकांमध्यें तोंटददेशिकेंद्रानें कैवल्यसार सांगितला. ॥ ॥ ( ५ ) ( गद्याचा अर्थ ) आतां वेदोक्त सर्व आचाराची निवृत्ति झाल्यानंतर वीरतंत्रामध्यें सांगितलेल्या आचारांनी संपन्न असून सर्व उपनिषदांत प्रतिपादलेल्या ज्ञानालाच मुख्यत्वेंकरून विषय झाला आहे, अशा कैवल्यसाराचा आरंभ करतों. ॥ ( ६ ) यामध्यें वीरशैवव्रतावर ज्याची निष्ठा आहे; असा मुमुक्षु भक्तच या ग्रंथाला अधिकारी होतो. शिव-

लिंगसायुज्यरूपमुक्तिरेव प्रयोजनं एकोत्तरशतस्थलप्रतिपादकसकलोपनिषत्प्रतिपाद्यज्ञानमेव विषयः ॥ अस्य विषयस्य कैवल्यसाराख्यशास्त्रेण सह विषयविषयीभावः संबंधः ॥ ६ ॥ नन्वत्र वीरशैवव्रतनिष्ठो मुमुक्षुर्भक्त एवाधिकारीत्युक्तं ॥ वीरशैवस्वरूपज्ञानाभावे तद्व्रतनिष्ठत्वादिस्वरूपं सुतरां दुर्ज्ञेयमिति चेत् सकलोपनिषत्प्रतिपाद्यशिवजीवैक्यबोधकशिवज्ञानविद्यारतानामेव वीरशैवाभिधानत्वमित्युत्तरकामिकादिषु ॥ “ विशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका ॥ तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ॥ ” इत्युक्तत्वात् ॥ ७ ॥ ननु शिवभक्तिसमासादितांगलिंगसायुज्यरूपमुक्तिरेव प्रयोजनमित्युक्तं तदयुक्तं ॥ तथाहि मुक्तेः शिवभक्तिसमासादितत्वे “ ज्ञानादेव तु कैवल्यमिति ” श्रुतिप्रतिपाद्यज्ञानस्य कारणत्वं न स्यात् किंच मुक्तेः स्वरूपत्वं वा अतिरिक्तत्वं वा नाद्यः भक्तेः कारणत्वाभावप्रसंगात् न द्वितीयः ॥ अद्वैतभंगापुरुषार्थत्वादिदोषप्रसंगादिति चेन्न ॥८॥ ज्ञानकारणकवैदिक-

---

भक्तीनें मिळविलेलें लिंगांगसामरस्यरूप सायुज्यमुक्तिच याग्रंथाला प्रयोजन ( फायदा ) आहे. एकोत्तरशतस्थलाला प्रतिपादणारें सकल उपनिषदांमध्यें सांगितलेलें ज्ञानच या ग्रंथांतला विषय होय. या विषयाबरोबर कैवल्यसार नांवाच्या शास्त्राशीं विषयविषयीभावसंबंध आहे. ( ७ ) ( येथें शंकाकार शंका घेतो कीं ) वीरशैवव्रतावर निष्ठा असणारा मुमुक्षु भक्तच अधिकारी आहे असें सांगितलें; परंतु प्रथम वीरशैवस्वरूप ज्ञानच जर नसलें तर मग वीरशैवव्रतनिष्ठत्व वगैरे स्वरूप समजण्यास अत्यंत अशक्य आहे, अशी शंका आली तर सांगतात कीं,—सर्व उपनिषदांमध्यें प्रतिपादलेल्या शिवजीवैक्याचें बोधन करणारें शिवज्ञान ज्या विद्येमध्यें आहे ( ज्या विद्येनें शिवजीवैक्यज्ञान होतें ) त्या विद्येंत रत असलेल्या शिवयोग्यालाच वीरशैव असें नांव येतें; असें उत्तरकामिकादिग्रंथामध्यें सांगितलें आहे. तें असें कीं,—“ वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका ॥ तस्यां रमंते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः : ” ( अर्थ ) ( वी या शब्दानें शिवजीवैक्य बोधन करणारी विद्या असा अर्थ होतो. अशा विद्येमध्यें जे शैव रत होतात, त्यांना वीरशैव असें ह्मणावें. ) असें सांगितलें आहे. यावरून समजण्यास शक्य आहे असें झालें ( ८ ) बरें दुसरी शंका अशी आहे कीं, शिवभक्तीनें प्राप्त झालेली लिंगांगसामरस्य सायुज्यरूप मुक्तिच या ग्रंथाला प्रयोजन आहे, असें सांगितलें; तें अयुक्त आहे. कारण शिवभक्तीनें मुक्ति मिळतें; असें ह्मटलें असतां “ ज्ञानादेव तु कैवल्यं ” या श्रुतीनें प्रतिपादलेल्या ज्ञानाला कारणत्व यावयाचें नाहीं. त्या श्रुतीनें तर मुक्तीला ज्ञानच कारण आहे; असें सांगितलें आहे. मग हें कसें? आणि दुसरें असें विचारतों कीं— मुक्तीला स्वरूपत्व सांगतां? किंवा अतिरिक्तत्व सांगतां? तर पहिलें आह्मास कबूल नाहीं. कारण भक्तीला कारणत्व यावयाचें नाहीं. आणि दुसरेंही आह्मी कबूल करीत नाहीं. कारण यानें अद्वैताचा भंग होऊन अपुरुषार्थत्व वगैरे दोष येतील. अशी शंका तुझी असली तर असें ह्मणतां यावयाचें नाहीं. ( ९ ) कारण ज्ञानच कारण ज्याला

कर्मनिवृत्तिरूपमोक्षानंतरभाविस्वतंत्रनिजलीलापन्नभक्तेरेव मुक्त्यव्यवहितकारणत्वस्य वातुलादितंत्रेषु "ज्ञानादेव तु मोक्षः स्यान्मोक्षादुपरि शांभवी ॥ भक्तिः परतरा भाति स्वतंत्रनिजलीलया" ॥ इत्युक्तत्वात् ॥ ९ ॥ अन्यथा परंपरासाधनीभूतज्ञानस्यापि मुक्तिकारणत्वे अक्षराभ्यासादेरपि कारणत्वं स्यात् ॥ १० ॥ ननु मुक्तेः स्वरूपातिरिक्तत्वचोद्ये रे किमुत्तरमिति चेत् ॥ श्रूयतामवधानेन ॥ अंगलिंगसामरस्यस्य मुक्तेः सदसद्विलक्षणरूपत्वं वातुलादिसर्वागमसिद्धं ॥ तत्कथमिति चेत् ॥ "शिव एव स्वयं लिंगमात्मैवांगं भवेत्खलु ॥ तयोः शिवात्मनोः सम्यग्योगः संयोग एव हि ॥ सम्यग्योगो हि संयोगो भवेल्लिंगांगयोः सदा ॥ संयोग एव सायुज्यरूपा मुक्तिर्न संशयः ॥ इत्युच्यते ॥ ११ ॥ अथ स्थलशब्देनोच्यमानशिवतत्वं सकलागमसारसंग्रहशिवाद्वैतपरतत्वप्रतिपादकवचनमुखेन व्याख्यायते ॥ १२ ॥ तत्रादौ स्थलशब्दो ब्रह्मणि कथं निष्पन्न इत्याशंकां निवार्यमाणः सर्वागमेष्वपि तत्र तत्र स्थलत्वेन प्रतिपादकाधिष्ठानपरवचनानि संगृह्य व्याख्यायन्ते ॥ एकमेव परं ब्रह्म

---

आहे, अशा वैदिक कर्मांची जी निवृत्ति आहे; त्या निवृत्तिरूप मोक्षानंतर होत असलेल्या स्वतंत्रत्वेन निजलीलेनें प्राप्त झालेल्या भक्तीलाच मुक्तीचें अव्यवहित ( व्यवधान नसलेलें कारणत्व येतें; असें वातुलादि आगमांमध्यें " ज्ञानादेव तु मोक्षः स्यान्मोक्षादुपरि शांभवी ॥ भक्तिः परतरा भाति स्वतंत्रनिजलीलया " ( अर्थ—ज्ञानानेंच मुक्ति मिळते, त्या नंतर शंभूच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होते, ती परम श्रेष्ठ असून स्वतंत्रपणें आपोआप उत्पन्न होते.) असें सांगितलें आहे ( १० ) नाहीं तर परंपरेनें साधन झालेल्या ज्ञानालाही मुक्तिकारणत्व येत असल्यास अक्षराचा अभ्यास वगैरे यालाही कारणत्व येईल. ( ११ ) अरे, हें असो. मुक्तीला स्वरूपातिरिक्तत्व सांगतों, या शंकेला काय उत्तर आहे, हें सांग. असें काय? तर सावधपणें ऐक अंगलिंगसामरस्यरूप मुक्तीचें स्वरूपत्व सदसत्पदार्थांपेक्षां विलक्षण आहे; असें वातुल वगैरे आगमांमध्यें सिद्ध केलें आहे. तें कसें ह्मणशील तर ऐक. " शिव एव स्वयं लिंगमात्मैवांगं भवेत्खलु ॥ तयोः शिवात्मनोः सम्यग्योगः संयोग एव हि ॥ सम्यग्योगो हि संयोगो भवेल्लिंगांगयोः सदा ॥ संयोग एव सायुज्यरूपा मुक्तिर्न संशयः ॥ " ( अर्थ—शिवच स्वतः लिंग असून आत्माच ( जीवच ) अंग आहे, त्या शिवात्म्यांच्या चांगल्या संबंधाला ( सामरस्याला ) संयोग असें ह्मणतात. लिंगांगांच्या सामरस्याला संयोग ह्मणतात. त्या संयोगालाच सायुज्यरूप मुक्ति ह्मणतात यांत संशय नाहीं- ) असें सांगितलें आहे. असो. ( १२ ) आतां स्थल याशब्दानें सांगितलेलें शिवतत्व सर्व आगमांतला सारसंग्रह ज्यांत आहे, अशा शिवाद्वैतपरतत्व प्रतिपादणाऱ्या वचनांच्या द्वारानें व्याख्यान करून स्पष्ट सांगतात. ( १३ ) त्यांत प्रथमतः स्थलशब्द हा परब्रह्माच्या ठिकाणीं कसा निष्पंन झाला? या शंकेचें निवारण करण्याकरितां सर्व आगमांमध्यें. त्या त्या ठिकाणीं स्थ-

सच्चिदानंदलक्षणं ॥ शिवतत्वं शिवाचार्याः स्थलमित्याहुरादरात् ॥ १३ ॥ लोके स्थलशब्दस्य प्रदेशांतरवाचकत्वात्कथं ब्रह्मणि प्रयोग इत्याशंकायामाह ॥ सर्वेषां स्थानभूतत्वाल्लयभूतत्वतस्तथा ॥ तत्वानां महदादीनां स्थलमित्यभिधीयते ॥ १४ ॥ एवं चाधिष्ठानव्यतिरेकेण वस्त्वंतराभावाद्व्यवहारः कथमापद्यत इत्याशंकायामाह ॥ स्वशक्तिक्षोभमात्रेण स्थलं तद्विविधं भवेत् ॥ एकं लिंगस्थलं प्रोक्तमन्यदंगस्थलं स्मृतं ॥ १५ ॥ एकस्य वस्तुनो द्वैरूप्यासंभवादिति न्यायेनैकस्यैव वस्तुनो भेदेन प्रतीतिविषयत्वं न कुत्रापि दृष्टमित्येतां शंकां दृष्टान्तमुखेन परिहरति ॥ महद्घटप्रभेदेन यथाकाशं प्रतीयते ॥ प्रतीयते तथा चैकस्थलं लिंगांगभेदतः ॥ १६ ॥ सत्यज्ञानानंदात्मकस्य परमात्मनः स्वेतरकल्पितभेदः स्वस्य कथमुपपद्यत इत्यतआह ॥

---

त्वेन प्रतिपादणाऱ्या अधिष्ठानपर ( ब्रह्मपर ) वचनांचा संग्रह करून व्याख्यान करतात. " एकमेव परंब्रह्म० " ( अर्थ ) सच्चिदानंद लक्षण परब्रह्मवस्तु एकच असून शिवाचार्य सर्व त्या वस्तूलाच आदरानें स्थल असें ह्मणतात. ॥ " या श्लोकांत असें जरी सांगितलें आहे, तरी ( १४ ) लौकिकांत स्थल या शब्दाला दुसरा प्रदेश असा अर्थ करतात. तर त्या स्थल शब्दाचा प्रयोग परब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं कसा करतात? अशी शंका आली असतां सांगतात. " सर्वेषां० " ( अर्थ ) महत्तत्व वगैरे सर्व तत्वांला नाश होत असल्यामुळें ( उत्पत्तीचें ठिकाण असल्यामुळें ) व त्या तत्वांचा नाश होत असल्यामुळें ( त्याठिकाणीं लय होत असल्यामुळें ) त्यास्थानाला ( परब्रह्मवस्तूला ) स्थल असें ह्मणतात. ( १५ ) असें असतां जगदाधारभूत ( जगाचा आधार ) अशा ईश्वराशिवाय दुसरी वस्तुच नाहीं; असें जर ह्मणाल तर दुसरी वस्तु नसल्यानंतर व्यवहार कसा होतो? अशी शंका आली असतां सांगतात. " स्वशक्ति० " ( अर्थ– ) तें परब्रह्म नांवाचें स्थल आपल्या शक्तीच्या केवळ चलनानें दोन प्रकारचें झालें आहे. त्या दोहोंमध्यें एकाला लिंगस्थल ह्मणतात, आणि दुसऱ्याला अंगस्थल असें ह्मणतात. ( १६ ) " एका वस्तूचीं रूपें दोन असण्याचा संभव नाहीं " या न्यायानें एकच वस्तु भेदानें ( निरनिराळ्या प्रकारानें ) ज्ञानगोचर होईल असें कोठेंही पाहिलें नाहीं, मग एथें एका वस्तूचें दोन प्रकार कसें सांगतात? अशी शंका आली असतां दृष्टांताच्या द्वारानें शंकेचा परिहार करतात. " महद्घट० " ( अर्थ ) आकाश ही वस्तु एकच असून घटामध्यें ( घागरींत ) घटाकाश मठामध्यें ( घरांत ) मठाकाश असे भेद त्या आकाशाचे जसे दृष्टीस पडतात; तसे भेद एका स्थलामध्यें अंगस्थल आणि लिंगस्थल असे दृष्टीस पडतात. ( १७ ) बरें? सच्चिदानंदस्वरूप परमात्म्याच्या ठिकाणीं आपल्याशीं ( परमात्म्याशीं ) आणि इतराशीं ( जीवाशीं ) कल्पिलेला भेद कसा युक्त ( बरोबर ) दिसतो? अशी शंका आली असतां सांगतात. " चिन्मात्रं० " ( अर्थ– ) चैतन्यस्वरूप, सत्य, ज्ञान, आनंद यां लक्षणांनी युक्त, उत्कृष्ट असें हें लिंगस्थल

चिन्मात्रं परमं साक्षात्स्थलं सत्यादिलक्षणम् ॥ लिंगांगत्वं शिवात्मत्वभेदेनैव स्वयं श्रितम् ॥ १७ ॥ पूर्वं स्वशक्तिक्षोभमात्रेणेत्युक्तमिदानीं तु स्वयमेव लिंगांगत्वं श्रितमित्युक्तमिदमनुपपन्नमित्यत आह ॥ यथा स्थलं द्विधाभूतं तथा शक्तिर्द्विधा भवेत् ॥ शक्तिरप्रतिघा साक्षाच्छिवेन सहधर्मिणी ॥ १८ ॥ तथापि शक्तिपरमात्मनोः भेदकल्पकत्वाभावात्कथं भेदः प्रतीयत इत्यत आह ॥ लिंगस्थलाश्रया काचित्काचिदंगस्थलाश्रया ॥ लिंगस्थलाश्रया शक्तिः कलारूपा प्रकीर्तिता ॥ अंगस्थलाश्रया शक्तिर्भक्तिरूपा भवापहा ॥ १९ ॥ तंत्रान्तरोक्तलिंगशब्दार्थमत्र प्रमाणयति ॥ लीयते गम्यते यत्र येन सर्वं चराचरं ॥ तदेतल्लिंगमित्युक्तं लिंगतत्वविशारदैः ॥ २० ॥ लिंगस्थलं सम्यग्विचार्य क्रमप्राप्तमंगस्थलं निरूपयति ॥ अनाद्यन्तमजं लिंगं तत्पदं परमं प्रति ॥ यद्गच्छति महाभक्त्या तदंगमिति निश्चितं ॥ २१ ॥ आत्मस्वरूपापरिचये तस्यांगत्वमेव ज्ञातुं न शक्यत इत्याकांक्षायामात्मस्वरूपमाह ॥ आत्मायं

---

प्रत्यक्ष आपलें आपणच शिव आणि जीव या भेदानें लिंगस्थल आणि अंगस्थल असें ह्मणविलें जातें. ( १८ ) बरें? पूर्वी आपल्या शक्तीच्या केवळ क्षोभानें भिन्न झालें आहे; असें सांगितलें, आतां स्वतः आपणच लिंगस्थल अंगस्थल झालें आहे; असें ह्मणतां तर तें अयोग्य आहे; अशी शंका आली तर सांगतात- " यथा स्थलं० " ( अर्थ— ) स्थल जसें दोन प्रकारचें झालें; तद्वत शक्तिही दोन प्रकारची झाली. त्या शक्तीला कोठेंहीं प्रतिबंध नाहीं. अर्थात शिवाबरोबर सहचारिणी होऊन ( बरोबर फिरणारी ) राहते. ( १९ ) असें जरी आहे; तरी शक्ति आणि परमात्मा यांच्यामध्यें भेद उत्पन्न होत नसून भेद आहे; असें कसें सांगता ? अशी शंका आली तर त्याला उत्तर देतात. " लिंगस्थलाश्रया० " लिंगस्थलाचा आश्रय करणारी कोणी एक शक्ति आहे; आणि अंगस्थलाचा आश्रय करणारी कोणी एक शक्ति आहे. लिंगस्थलाचा आश्रय केलेल्या शक्तीला कला असें ह्मणतात, आणि अंगस्थलाचा आश्रय केलेल्या शक्तीला संसार दूर करणारी भक्ति असें ह्मणतात. ( २० ) वातुलागमाशिवाय इतर आगमांमध्यें " लिंग " या शब्दाला केलेला अर्थ या ठिकाणीं प्रमाणाकरितां देतात. "लीयते० " ( अर्थ— ) चराचरात्मक ( जीवजडात्मक ) सर्व जग ज्या ठिकाणीं लय पावतें; ज्याच्या योगानें ज्या जगाचें ज्ञान होतें; त्या पदार्थाला लिंग तत्व जाणणारे प्रौढ लोक लिंग असें ह्मणतात. ( २१ ) लिंगस्थलाचा चांगला विचार करून क्रमानें आलेल्या अंगस्थलाचें निरूपण करतात. " अनाद्यंत० " उत्पत्ति व नाश नसलेलें, जन्मरहित, त्या स्थलाचें ( अंगस्थलाचें ) स्थान झालेलें लिंगस्थल होय, त्या लिंगस्थलाप्रत मोठ्या भक्तीनें जें जातें; त्याला अंगस्थल ह्मणावें; असें निश्चित झालें आहे. ( २२ ) आत्मस्वरूपाचा परिचय जर झाला नाहीं; तर त्याला अंगत्वच समजत नाहीं; अशी आकांक्षा प्राप्त झाली असतां आत्मस्वरूप निवेदन कर-

केवलः शुद्धः शिवस्यांशः सदामलः ॥ नित्यो निरंजनस्यान्तस्तस्मादात्मा स्वयं शिवः ॥ २२ ॥ एवंभूतस्यात्मनः शिवांगत्वं कथमुपपद्यत इत्यत आह ॥ सोयमात्मा शिवांगं स्याच्छिवेनांगीकृतत्वतः ॥ सर्वज्ञतादिभेदैश्च शिवांगमयमिष्यते ॥२३॥ अंगमिति पदव्युत्पत्तिविचारेणाप्यात्मनः शिवांगत्वमुपपद्यत इत्याह ॥ अमिति ब्रह्मसन्मात्रं गच्छतीति गमुच्यते ॥ रूप्यतेऽगमिति प्राज्ञैरंगतत्वविचिंतकैः ॥ २४ ॥ यदेकमेवेत्यादिप्रतिपादितमेकमेव स्थलं स्वशक्तिक्षोभमात्रादेव द्विविधं जातं तदेवशक्तिभक्तिरूपोपाधिवशादेकमेकं प्रत्येकं प्रत्येकं त्रिविधं त्रिविधं स्यात् ज्ञानक्रियात्मकत्वेन पुनरेकं द्विविधं द्विविधं भवति॥ एवं च पूर्वोक्तं तयोरेकस्थलं शक्तिविशिष्टाल्लिंगस्थलमिति व्यवह्रियते ॥ अन्यत्तु भक्तिविशिष्टं सदंगपट्स्थलमिति व्यवहारः ॥ २६ ॥ तथा चैकमेव परस्परवैलक्षण्येन द्वादशधा जातं इदानीं तदवान्तरभेदानेकोत्तरशतसंख्याकान् पिंडादिज्ञानशून्यांतत्वेनाभिमतान् वीरशैवाचार्यागस्त्यदूर्वासादिसकलपुरातनव्यवहारविषयान् सकलविद्यासागरशिरोमणिसर्वोपनिषदर्थसंग्रहमुखेन वि-

---

तात. " आत्मायं " ( अर्थ ) हा आत्मा मुक्त असून शुद्ध आहे, आणि तो शिवाचा अंशभूत आहे, तो केव्हांही निर्मल आहे; तो आत्मा नित्य असून पापरहित आहे, आणि रागद्वेषरहित आहे. याकरितां तो आत्मा स्वतः शिवच आहे. ( २३ ) बरें? अशा त्या आत्म्याला शिवांगत्व कसें प्राप्त होतें? अशी शंका आली तर सांगतात " सोयमात्मा० " ( अर्थ— ) तो हा जीव शिवांग आहे; कारण शिवानें त्याचा अंगिकार अंगत्वानें केला आहे. आणि सर्वज्ञता वगैरे भेदांनी ( प्रकारांनीं ) आत्म्याला शिवांग असें ह्मणतात. (२४) अंग शब्दाची व्युत्पत्ति केली असतां ( अंग या शब्दांतला अक्षरार्थ काढिला असतां ) आत्म्याला शिवांगत्व प्राप्त होतें असें सांगतात. " अमिति० " ( अर्थ— ) अं या अक्षराचा अर्थ कालत्रयाबाधित ब्रह्म असून त्या परब्रह्मवस्तूजवळ हा आत्मा ग ह्मणजे जातो, यामुळें अंगतत्व चिंतन करणाऱ्या ज्ञात्यांनी या आत्म्याला अंग असें ह्मटलें आहे. ( २५ ) " यदेक० " ( अर्थ— ) जें एकच आहे, असें प्रतिपादिलें आहे, तेंच स्थल आपल्या चिच्छक्तीच्या क्षोभानें दोन प्रकारचें झालें. तेंच पुनः शक्तिभक्तीरूप उपाधींच्या निमित्तानें असलें तरी त्यांत प्रत्येक प्रत्येक तीन तीन प्रकार झाले. त्यांत पुनः ज्ञानक्रियारूपानें तेंच एक दोनरूपाचें झालें. असें असतां त्यांमध्यें शक्तिविशिष्ट कोणतें आहे, त्याला लिंगस्थल असें ह्मणतात, दुसरें तें भक्तिविशिष्ट असल्यामुळें त्याला सदंगपट्स्थल असें ह्मणतात. (२६) एकूण तें एकच स्थल असून त्यांत परस्परवैलक्षण्यानें बारा प्रकार झाले. प्रस्तुत त्यांतले अवांतर भेद एकोत्तरशत ( एकशें एक ) असून पिंडापासून ज्ञानशून्यापर्यंत अभिमत झालेले आहेत; आणि वीरशैवाचार्य अशा अगस्त्य, दूर्वास वगैरे सर्व पुरातनांच्या व्यवहाराला विषय झाले आहेत, आतां सर्व विद्येमध्यें शिरोमणी ह्मणविणाऱ्या सर्व उपनि-

विच्य प्रत्येकं प्रत्येकं प्रतिपादयितुं तत्तत्स्थलप्रतिपादकश्रुतिगणोऽनुसंधीयते ॥२६॥ तत्र यद्यपि लिंगस्थलनिरूपणाधीनमेवांगस्थलनिरूपणं तथा चांगस्थलनिरूपणात्पूर्वमेव लिंगस्थलं निरूपणीयमुपजीव्यनिरूपणानंतरमेवोपजीवकनिरूपणस्य न्यायत्वात् ॥ तथापि अंगस्थलस्वरूपं ज्ञानं विना लिंगस्थलस्वरूपस्य दुर्ज्ञेयत्वादंगस्थलमेव प्रथमं निरूपणीयमिति विनिगमकानुरोधेन सांगस्थलमेव प्रथमं निरूप्यते ॥ २७ ॥ ननु उभयोरप्येकस्मादेवोत्पन्नत्वाविशेषादेकस्य प्राथम्यमन्यस्यानंतर्यमिति विनिगमकमेव न संवति ॥ येनांगस्थलस्य प्राथम्यमंगीक्रियते इति चेदुभयोरप्येकस्मादेवोत्पन्नत्वाविशेषेऽपि स्वस्वरूपज्ञानाधीनमेव परस्वरूपज्ञानमित्येव विनिगमकं ॥ २८ ॥ अन्यथा ॥ अहंकारबलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहं ॥ विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २९ ॥ ब्रह्मभूतप्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥ समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां ॥ इति पौर्वापर्यक्रमभंगोऽपि स्यात् ॥ ३० ॥ तस्मादंगस्थलस्यैवादौ निरूपणीयत्वे सिद्धे तदवान्तरभेदभक्तस्थलादिभूतं

---

पदांच्या अर्थांच्या संग्रहाच्या द्वारानें विवेचन करून प्रत्येक प्रत्येक प्रतिपादन करावयाकरितां त्या त्या स्थलाचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतिसमूहाचें अनुसंधान करतों. ( २७ ) त्यांत जरी लिंगस्थलनिरूपण केल्याशिवाय अंगस्थलनिरूपण करणें उचित नव्हे, अर्थात अंगस्थलनिरूपणाच्या अगोदर लिंगस्थलनिरूपण करणें योग्य आहे; असें झालें. कारण उपजीव्यनिरूपणानंतरच उपजीवकनिरूपण करणें उचित आहे. तथापि अंगस्थलस्वरूपज्ञान झाल्यावाचून लिंगस्थलस्वरूप कळणें शक्य नाहीं, या करितां प्रथम अंगस्थलच निरूपण करावयाचें योग्य आहे, या विनिगमकाच्या अनुरोधानें ( याप्रमाणाला अनुसरून ) प्रथम अंगस्थलच सांगतों.

( २८ ) बरें? दोन्हीची उत्पत्ति एकच ठिकाणीं असल्यामुळें परस्परांत विशेष कांहीं नसतो; मग एकाचें निरूपण आधीं केलें पाहिजे; एकाचें नंतर केलें पाहिजे, असा विनिगमकच संभवत नाहीं ( अशाविषयीं प्रमाण सांपडत नाहीं ) तर अंगस्थलाचें निरूपण कां करावें? असें ह्मणाल तर दोहोंची उत्पत्ति एकाच ठिकाणीं असली तरी त्यांत विशेष कांहीं नसला तरी स्वस्वरूपज्ञानाच्या ताब्यांतच परस्परस्वरूपज्ञान आहे असेंच विनिगमक करावें लागतें. ( हेंच प्रमाण धरावें लागतें ) ( २९ ) नाहीं तर " अहंकारबलं० " ( अर्थ– ) अहंकाराचें बळ, दर्प, काम, क्रोध, परिग्रह ( परिवार ) हे सोडून ममतारहित होऊन जो शांत असतो तोच ब्रह्मस्वरूप ज्ञानी होतो. ( ३० ) " ब्रह्मभूत० " ( अर्थ– ) ब्रह्मस्वरूप झाल्यामुळें प्रसन्न अंतःकरण ज्याचें झालें आहे, अर्थात तो दुःख करीत नाहीं, कांहीं इच्छा करीत नाहीं. सर्व प्राणिमात्रांवर समबुद्धि ठेवून माझ्या ठिकाणीं श्रेष्ठ भक्ति पावतो. असा जो पूर्वापर क्रम आहे, त्याचा भंग होईल. ( ३१ ) याकरितां अंगस्थलनिरूपणच आधीं केलें पाहिजे असें सिद्ध होतें. ह्म-

पिण्डस्थलं निरूप्यते ॥ ३१ ॥ अत्र बहुजन्मकृतसुकृतवशात् क्षीणपापः सन्निर्मलान्तःकरणचरमदेही यः स एवात्मा पिंडसंज्ञस्तदन्तरावस्थितपरब्रह्मैव पिंडस्थलमित्युच्यते ॥ ३२ ॥ " श्वेताश्वतरोपनिषदि " ॥ तिलेषु तैलं दधिनीव सर्पिरापः स्रोतः स्वरणीषु चाग्निः ॥ एवमात्मात्मनि गृह्यतेऽसौ सत्येनैनं तपसा योऽनुपश्यति ॥ ३३ ॥ तथैवोक्तं कूर्मपुराणे ॥ अंकुरः सुंदरे बीजे सूर्यकान्ते च पावकः ॥ सलिलं चंद्रकान्ते च तथात्मांगेऽपिसाध्यते ॥ ३४ ॥ एवंभूतपरब्रह्मणि स्वांतरावस्थितसकलनिष्कलात्मकतत्वं प्रदर्शयितुं या इच्छा जायते तदनुरोधेन यत्पिण्डभूतात्मनि ज्ञानं जायते तदेव पिण्डज्ञानस्थलमित्युच्यते ॥ ३५ ॥ " अमृतनादोपनिषदि " ज्ञाननेत्रं समादायोद्धरेद्वन्हिवत्परं ॥ निश्चलं निष्कलं शांतं तद्ब्रह्माहमिति स्मृतं ॥ ३६ ॥ " कठवल्युपनिषदि " ॥ अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितं ॥ महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥ ३७ ॥ तथैवोक्तं वासिष्ठे ॥ कुतो

---

णूनच त्यांतला अवांतर भेद अशा भक्तस्थल वगैरे स्थलांसहित पिंडस्थलनिरूपण करतों ( ३२ ) " अत्र बहुजन्मकृत० " ( अर्थ ) पुष्कळ जन्मांमध्यें केलेल्या पुण्याच्या योगानें पापाचा क्षय करून घेतलेला, निर्मल अंतःकरण असलेला, शेवटल्या शरीरांत आलेला असा जो आत्मा असेल. त्याला पिंड अशी संज्ञा आहे. त्या पिंडाच्या मध्यभागीं असलेल्या परब्रम्ह्यालाच पिंडस्थल असें सांगतात. ( ३३ ) श्वेताश्वतरोपनिपदांत सांगितलें कीं– " तिलेषु० " ( अर्थ ) तिळांत तेलाप्रमाणें दहींत तुपाप्रमाणें स्रोतसांतील ( स्रवणाऱ्या पदार्थांतील ) पाण्याप्रमाणें, अरणींतल्या अग्नीप्रमाणें पिंडरूप आत्म्याच्या ठिकाणीं ब्रह्मवस्तु आहे. अशा परब्रह्मवस्तूला सत्य तपाच्या योगानें अधिकारी मानव हा पाहतो; तो परमात्मा जीवात्म्याच्या ठिकाणीं स्वीकारला जातो. ( ३४ ) तसेच कूर्मपुराणांत सागितलें कीं,– " अंकुरः " ( अर्थ– ) सुंदर अशा बीजाच्या ठिकाणीं अंकुराप्रमाणें, सूर्यकांतमणींत अग्नीप्रमाणें, चंद्रकांतमणींत जलाप्रमाणें पिंडसंज्ञक अंगाच्या ( आत्म्याच्या ) ठिकाणीं आत्मा ( परब्रह्म ) साध्य होतो. ( ३५ ) " एवंभूत " ( अर्थ ) अशा प्रकारच्या परब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं आपल्या ठिकाणीं असलेल्या सकल निष्कलस्वरूप तत्वाचें प्रदर्शन करावयाकरितां जी इच्छा होते; त्या इच्छेला अनुसरून पिंडभूत आत्म्याच्या ठिकाणीं जें ज्ञान उत्पन्न होतें; त्यालाच पिंडज्ञानस्थल असें सांगतात. ( ३६ ) अमृतनादोपनिषदांत सांगितलें कीं,– " ज्ञाननेत्रं० " ( अर्थ– ) उत्कृष्ट असें ज्ञाननेत्र घेऊन अग्नि प्रज्वलित केल्याप्रमाणें उद्धार आपला करून घ्यावा. चलरहित, कलातीत, शांत असें तें परब्रह्म मीच आहें; असें स्मरण करावें. ( ३७ ) कठवल्युपनिपदांत सांगितलें कीं,– " अशरीरं " ( अर्थ– ) शरीररहित असून अनर्थकर शरीरांत राहिलेला, मोठा, व्यापक अशा आत्म्याला जाणून धैर्यवान मनुष्य दुःख करीत नाहीं. ( ३८ ) तसेंच वासिष्ठामध्यें सांगितलें कीं,– " कुतो मायेय० " ( अर्थ ) वसिष्ठ रामाला

मायेयमिति ते राम मास्तु विचारणा ॥ कथमेनां जहामीति चैषा तेऽस्तु विचारणा ॥ ३८ ॥ एवंविधपिंडज्ञानवान् महात्मा सकलनिष्कलतत्वं सम्यग्विचार्य तयोः सकलरूपसंसारस्य हेयत्वबुद्धौ सत्यामनंतरं संसारहेयस्थलमित्युच्यते ॥ ३९ ॥ "मैत्रेयोपनिषदि" ॥ भगवन्नस्थिचर्मस्नायुमज्जामांसशुक्लशोणितश्लेष्मा-श्रुदूषिते विण्मूत्रवातपित्तकफसंघाते दुर्गन्धे निःसारेऽस्मिञ्छरीरे किं कामोपभोगैः ॥ ४० ॥ तथैवोक्तं पुराणे ॥ मांसासृक्पूयविण्मूत्रस्नायुमज्जास्थिसंहते ॥ देहे चेत् प्रीतिमान्मूढो भविता नरकेऽपि सः ॥ ४१ ॥ एवंभूतसंसारजुगुप्सानंतरं गुरूपदेशाभावे स्वस्वरूपसाक्षात्कारासंभवात्तदर्थं गुरूपसदने कृते सत्यनंतरं गुरुकारुण्यस्थलमित्युच्यते ॥ ४२ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं ॥ ४३ ॥ किंच मैत्रेयोपनिषदि ॥ अथ[1] किमेतैर्वान्यानां शोषणं महार्णवानां शिखरिणां प्रपतनं ध्रुवस्य प्रचलनं प्रच्यवनं

---

ह्मणतो कीं, हे रामा, ही माया कोठली आहे; असा विचार मात्र तूं मनांत आणूं नको. परंतु या मायेचा त्याग मी कसा करीन? हा विचार मनांत आण (३९) एवंविध०— (अर्थ—) या तऱ्हेच्या पिंडज्ञानी महात्म्याला सकल निष्कल तत्वांचा (अंगलिंगतत्वांचा) विचार चांगल्या तऱ्हेनें उत्पन्न झाल्यानंतर व त्या दोहोंमध्यें सकलरूप संसार त्याज्य आहे, अशी बुद्धि उत्पन्न झाल्यानंतर त्याकरितांच संसारहेयस्थल सांगतात. (४०) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, "भगवन्नस्थि०" (अर्थ—) षड्गुणैश्वर्य संपन्न हे गुरो,— अस्थि, चर्म, स्नायु, मज्जा, मांस, शुक्लशोणित, श्लेष्म, यांनी दूषित झालेल्या व विष्ठा, मूत, वात, पित्त, कफ यांचा समुदाय ज्यांत आहे, अशा दुर्गंध निःसत्वशरीराच्या ठिकाणीं कामोपभोग घेऊन काय फायदा आहे? (४१) तसेंच पुराणांत सांगितलें कीं,— "मांसासृक्पूयं०" (अर्थ—) मांस, रक्त, पू, विष्ठा, मूत्र, स्नायु, मज्जा, अस्थि यांचा समुदाय ज्यांत आहे; अशा शरीरावर जो मूर्ख प्रेम ठेवतो, तो नरकाला जातो. (४२) "एवंभूत०" (अर्थ। अशा तऱ्हेच्या संसारावर जुगुप्सा (निंद्यबुद्धि) उत्पन्न झाल्यानंतर गुरूपदेशाशिवाय शिवस्वरूपाचा साक्षात्कार होत नाहीं; याकरितां गुरूचा आश्रय केल्यानंतर गुरुकारुण्यस्थल सांगतात (४३) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं,— "तद्विज्ञानार्थं०" (अर्थ) त्या परब्रह्माच्या साक्षात्काराकरितां तो शिष्य शुश्रूषायुक्त होऊन सर्व शास्त्र जाणणारा, परब्रह्मनिष्ठ, व क्षत्रिय अशा गुरूला शरण जातो. (शिष्यानें अशा गुरूला शरण जावें.) (४४) आणि मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं,— "अथकिमेतै०" (अर्थ—) संसाराच्या ठिकाणीं त्याज्यबुद्धि

---

१ स्थानेवा ॥ पाठान्तरम्.

वा तरूणां निमज्जनं पृथिव्याः स्थानादपसरणं सुराणां सोऽहमित्येतद्विधेऽस्मिन्संसारे किं कामोपभोगैर्यैरेवाश्रितस्यासकृदिच्छावर्तनं दृश्यत इत्युद्धर्तुमर्हसीत्यन्धोदपानस्थो भेक इवास्म यस्मिन्संसारे भगवंस्त्वन्नो गतिरिति ॥ ४४ ॥ तथैवोक्तं वाक्यवृत्ते ॥ अनायासेन येनास्मान्मुच्येत भवबंधनात् ॥ तन्मे संक्षिप्य भगवन् केवलं कृपया वद ॥ ४५ ॥ एवं गुरुकरुणान्वितस्यैव महात्मनः पंचभूतात्मकस्थूलदेहधर्मान्परिहृत्य सदाचारसाधनीभूतदेहस्योपरि लिंगधारणे कृते सत्यनंतरं लिंगधारणस्थलमित्युच्यते ॥ ४६ ॥ "ऋग्वेदे सप्तमाध्याये" ॥ पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्येषि विश्वतः ॥ अतप्ततनुर्न तदामो अश्नुते श्रितास इद्वहंतस्तत्समाशत ॥ ४७ ॥ तथैवोक्तं कामिकागमे ॥ ऋगित्याह पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते ॥ तस्मात्पवित्रं तल्लिंगं धार्यं शैवमनामयं ॥ ४८ ॥ अतप्त-

---

उत्पन्न झाल्यानंतर मोठमोठे दुसरे समुद्र शुष्क झाले तर काय; पर्वत वरून पडले काय, ध्रुव खाली पडला तर काय; मोठमोठीं झाडं उलथून पडलीं काय; पृथिवी बुडाली काय; स्थानापासून देव भ्रष्ट झाले काय, आणि "मीच तो आहे," अशा संसारांत कामोपभोग घेऊन काय प्रयोजन आहे? अशा बुद्धीनें कामोपभोगांचा आश्रय केलेल्या मनुष्याची इच्छा त्यांपासून फिरते, आणि पुनः तिकडे जाते, असा तो मनुष्य उद्धार व्हावयास योग्य आहे. ह्मणूनच याला दृष्टांत देतात कीं,— अशा तऱ्हेचा मनुष्य कोरड्या विहिरींत राहत असलेल्या बेडकाप्रमाणें असतो. ह्मणूनच तो आपल्या गुरूला ह्मणतो कीं,— हे भगवंन् आह्माला तूंच गति देणारा आहेस. ( ४५ ) तसेंच वाक्यवृत्तांत सांगितलें कीं,— "अनायासेन०" ( अर्थ— ) हे भगवंन या संसारबंधनापासून अनायासानें ( विन श्रमानें ) मी मुक्त कसा होईन; तें संक्षेपानें केवळ माझ्यावर दया ठेवून सांगा. ( ४६ ) — एवंगुरु० — ( अर्थ— ) याप्रमाणें गुरुकारुण्यानें युक्त असलेल्या महात्म्याच्याच पंचभूतात्मक स्थूलदेहांतील धर्मांचा परिहार करून सदाचाराला साधनभूत अशा देहावर लिंगधारण केल्यानंतर लिंगधारणस्थल सांगतात. ( ४७ ) ऋग्वेदांत सप्तमाध्यायांत सांगितलें कीं,— "पवित्रं०" ( अर्थ— ) ब्रह्मोपदेश करणाऱ्या हे गुरो, ( हे शिवा ) तुझें पवित्रकर इष्टलिंग सर्वकाळीं सर्व शरीराला नियामक होऊन व्याप्त होऊन राहिलें आहे. दीक्षात्रयानें ज्याचें शरीर शुद्ध झालें नाहीं; त्याचें अंतःकरण परिपक्व झालेलें नसल्यामुळें तो मुक्त होत नाहीं. याकरितां ज्ञानी लोक इष्टलिंग धारण करून मुक्त होतात. ( ४८ ) तसेंच कामिकागमांत सांगितलें कीं,— ब्रह्मोपदेश करणाऱ्या हे गुरो, ( हे शिवा, ) तुझें लिंग पवित्र असून सर्वदा स्थूलशरीरावर धारण करावयास योग्य आहे: असें ऋग्वेदांत सांगितलें आहे. याकरितां आरोग्यकारक तें शिवलिंग धारण करावें. ( ४९ ) जो अतप्ततनु आहे; ( ज्यानें त्रि-

तत्त्वज्ञो व सामः संस्कारवर्जितः ॥ दीक्षया रहितः साक्षान्नाप्नुयाल्लिंगमुत्तमं ।४९। किंच " ब्रह्मोपनिपदि " ॥ यदक्षरं परं ब्रह्म तत्सूत्रमिति धारयेत् ॥ सूचनात्सूत्र- मित्याहुः सूत्रं नाम परं पदं ॥ धारणात्तस्य सूत्रस्य नोच्छिष्टो नाशुचिर्भवेत् ॥५०॥ अस्मिन्नर्थे योगजागमे ॥ संसूतत्वात्समस्तेषु वस्तुष्वपि तु संततं ॥ सूचनात्पर- मेशस्य सूत्रं लिंगमितीरितं ॥ ५१ ॥ किंच बृहत्कालोत्तरे ॥ व्रतानि दुश्चरा णीह तपांस्युग्राणि यानि च ॥ न्यूनानि तानि सर्वाणि शिवलिंगस्य धार-[2] णात् ॥ ५२ ॥ तथा शिवरहस्ये ॥ परिशुद्धेन मनसा नियमेन दृढव्रतः ॥ शिवस्य लिंगं बिभ्राणः शिवमेव प्रपद्यते ॥ ५३ ॥ तथा वातुलेऽपि ॥ यस्य सांसा- रिको भावो नास्ति लज्जादयस्तथा ॥ स भक्तो निश्चलो धन्यो लिंगं सर्वत्र धारयेत् ॥ ५४ ॥ तत्रैव ॥ दास्यैकव्रतनिष्ठस्तु समतिक्रान्तलौकिकः ॥ धारयेच्छि-

---

विध दीक्षा घेतली नाही. ) तो अज्ञानी असून त्याचें अंतःकरण परिपक्व झालेलें न- सतें. आणि संस्कारानें रहित असून दीक्षारहित असल्यामुळें त्या उत्तम इष्टलिंगाचा सुखानुभव घेतां येत नाहीं. ( त्याला मोक्ष मिळत नाहीं. ) ( ५० ) आणि ब्रह्मोपनिपदांत सांगितलें कीं,– " यदक्षरं० " ( अर्थ– ) नाशरहित जें परशिवतत्व अ- सेल, तें सूत्र आहे; असें समजून धारण करावें. सूचना करीत असल्यामुळें त्याला सूत्र असें ह्मणतात. त्याला सूत्र असें नांव असून तें उत्कृष्ट स्थान ( परब्रह्मपद ) आहे. या सूत्राच्या ( सूत्रात्मकलिंगाच्या धारणेमुळें उच्छिष्टाचा दोष लागत नाहीं आणि अशुचि तो होत नाहीं. ( ५१ ) याचविषयीं योगजागमांत सांगितलें कीं,– " संसू- तत्वा० " समस्तवस्तूमध्यें संतत गोंवलें गेलें असल्यामुळें त्याला सूत्र असें ह्मणतात. परमेश्वराची सूचना करीत असल्यामुळें त्या सूत्राला लिंग असें ह्मणतात- ( ५२ ) आणि बृहत्कालोत्तरांत सांगितलें कीं,– " व्रतानि० " ( अर्थ– ) करावयास अशक्य अशीं व्रतें जीं असतील, उग्र तपें जीं असतील, तीं सर्व शिवलिंग धारणेमुळें न्यून आहेत. ( ५३ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं,– " परिशु० " ( अर्थ– ) शुद्ध मनानें उत्तम नियमानें दृढव्रत होऊन शिवलिंग धारण जो करतो, तो शिवाजवळ जातो. ( ५४ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं,– " यस्य सांसारिका' ' – ( अर्थ– ) सांसारिक भाव ज्याला नाहींत, ( संसारांतील विषय ज्यानें सोडले आहेत. ) लज्जा वगैरे ज्याला नसतील, तोच भक्त स्थिर असून धन्य होय. त्यानें सर्वत्र ( सार्वकाळ ) लिंग धारण करावें. ( ५५ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं,– " दास्यैक व्रत० " मुख्यत्वेंकरून दास्यच माझें व्रत आहे, असें समजून लौकिक सर्व सोडून जितेंद्रिय होऊन शिवलिंग

---

२. शिरःसु.

वलिंगं च पूजयेन्नियतात्मवान् ॥ ५५ ॥ एवं लिंगधारणसंपन्नस्य परब्रह्माविनाभूतचित्प्रकाशस्वरूपभस्मधारणं कर्तव्यमिति नियम एव विभूतिधारणस्थलमित्युच्यते ॥ ५६ ॥ " जाबालोपनिषदि " विभूतिधारणाद्ब्रह्मैकत्वं गच्छति स एष भस्मज्योतिः स एष भस्मज्योतिः विभूतिधारणात्कैवल्यमश्नुते स एष भस्मज्योतिः स एष भस्मज्योतिः विभूतिधारणादेव अमृतत्वं च गच्छति स एष भस्मज्योतिः स एष भस्मज्योतिः ॥ ५७ ॥ एवं महाज्ञानभस्मसत्क्रियामुखेन धृतस्य लिंगक्रियासंपन्नस्य शिवज्ञानचक्षुःसंभूतरुद्राक्षधारणे कृते सत्यनंतरं रुद्राक्षधारणस्थलमित्युच्यते ॥ ५८ ॥ जाबालोपनिषदि ॥ य इदं रुद्राक्षं धत्ते स सर्वपुण्यतीर्थस्नातो भवति स सर्ववेदधारी भवति स सर्वक्रतुकृद्भवति स सर्ववेदात्मको भवति स सत्यं परमः शिवः स परमः शिवः ॥ ५९ ॥ तत्रैव ॥ पापं कुर्वन्नपि मानवः रुद्राक्षं धारयन् सर्वपाप्मानं तरति ॥ ६० ॥ मानव पुराणे ॥ रुद्राक्षं धारयन्पापं कुर्वन्नपि च मानवः ॥ सर्वं तरति पाप्मानं जाबालश्रुतिराह हि ॥ ६१ ॥ एवं लिंगांगिनः विभूतिरुद्राक्षधारकस्य नित्यलिंगार्चनारतलिंगसंपन्नस्य प्रणवा

---

धारण करावें. ( ५६ ) याप्रमाणें लिंगधारणसंपन्न जो असेल, त्यानें परब्रह्म अशा चित्प्रकाशस्वरूप भस्माचें धारण केलें पाहिजे, हा नियमच आहे, ह्मणून विभूति धारणस्थल सांगतात. ( ५७ ) जाबालोपनिषदांत सांगितलें कीं.– " विभूति० " विभूति धारणेंमुळें ब्रह्मस्वरूपाला पावतो. तें परब्रह्म भस्मज्योत आहे; तें परब्रह्मच भस्मज्योत आहे. ( भस्मस्वरूप ज्योतिर्मय तो आत्मा आहे; असें तात्पर्य आहे. ) विभूति धारणेमुळें कैवल्यसुखाचा अनुभव घेतो. तें परब्रह्म भस्मज्योत होय; तें परब्रह्म भस्मज्योत होय. विभूति धारणेंमुळें जो मोक्षाला जातो; तोच आत्मा भस्मस्वरूप ज्योतिमय होय. तोच आत्मा ज्योतिमय भस्मस्वरूप होय. ( ५८ ) याप्रमाणें मोठ्या ज्ञानानें दीक्षापूर्वक भस्मधारण केल्यानंतर आणि दीक्षापूर्वक लिंग धारण केल्यानंतर पराशिवाच्या ज्ञान चक्षूंपासून उत्पन्न झालेले रुद्राक्ष धारण केल्यानंतर रुद्राक्ष धारणस्थल सांगतात- ( ५९ ) जाबालोपनिषदांत सांगितलें कीं,– " य इदं रुद्राक्षं० " ( अर्थ– ) जो रुद्राक्ष धारण करतो; तो सर्व पुण्यकर तीर्थांमध्यें स्नान करतो; असें समजावें. तो सर्व वेदधारी आहे; असें समजावें. तो सर्व यज्ञ करणारा आहे; असें समजावें. तो सर्व वेदस्वरूप आहे, असें समजावें. तो सत्यस्वरूप पराशिवच आहे; तो सत्यस्वरूप पराशिवच आहे. ( ६० ) तेथेंच पुनः सांगितलें कीं,– " पापं कुर्वन्नपि० " ( अर्थ– ) पाप करणारा जरी आहे; तरी त्यानें रुद्राक्ष धारण केलें तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ( ६१ ) मानव पुराणांत सांगितलें कीं,– ", रुद्राक्षं० " ( अर्थ– ) रुद्राक्ष धारण करणारा मानव पाप जरी करीत असला तथापि तो सर्व पापापांसून मुक्त होतो; असें जाबालश्रुति सांगते. ( ६२ ) याप्रमाणें लिंगांगसामरस्य करणारा असून विभूति रुद्राक्ष

न्वितपंचाक्षरीमंत्रजपस्यावश्यकत्वेनानंतरं पंचाक्षरीस्थलमित्युच्यते ॥ ६२ ॥ यजुर्वेदे ॥ शतरुद्रीये ॥ " नमः शिवाय च " ॥ ६३ ॥ तथैवोक्तं शिवज्ञानविद्यायां सूत्रम् ॥ अंगं नमःपदमिदं शिव एष लिंगं संबंधमायपदमेतदुदीरितं स्यात् ॥ लिंगांगसंगमपदत्रयबोधनार्थं मंत्रोऽयमाह निगमागममंत्रराजः ॥ ६४ ॥ एवं विभूतिरुद्राक्षाणि धृत्वा पंचाक्षरीं जपित्वा नित्यलिंगार्चनारतस्य सांगक्रियावर्तनं यथेत्याकांक्षायाऽनंतरं भक्तिस्थलमित्युच्यते ॥ ६५ ॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ तस्माद्भस्मरुद्राक्षाणि धृत्वा रुद्रानुवाकै रुद्रं संपूज्य ॥ ६६ ॥ " एक एव हि रुद्रो न द्वितीयाय तस्थे " इत्यादिभिः परमेश्वरं स्तुत्वा सततं युक्तिभिर्मन्यमानो ध्यायेत् ततः सकलपाशबंधच्छेदान्मुक्तो भवति नित्यसुखी भवति न संसारी भवति शिवस्वरूपो भवति शिवस्वरूपो भवति शिवस्वरूपो भवति ॥ ६७ ॥ तथा च शिवाद्वैते ॥ शिवयोगी शिवः साक्षादिति कैंकर्यभक्तितः ॥ पूजनं सुमनाः कुर्वन् यः स भक्त इतीरितः ॥ ६८ ॥ तथा वातुले ॥ मुक्तस्यैव भवेद्भक्तिर्बद्धस्य न कदाचन ॥ भ-

---

धारण करून निरंतर लिंगपूजेंत रत असलेल्या मानवाला प्रणवयुक्त पंचाक्षरी जपाची आवश्यकता आहे; याकरितां पंचाक्षरी जपस्थल सांगतात. ( ६२ ) यजुर्वेदांत शतरुद्रीयांत सांगितलें कीं,– " नमः शिवाय " ( शिवाला नमस्कार असो ) ( ६४ ) तसेंच शिवज्ञान विद्येंत सांगितलें कीं,– " अंगं नमःपदमिदं० " ( अर्थ– ) नमः या पदाला अंग ह्मणतात, आणि शिव या पदाचा अर्थ लिंग असा आहे, आय या पदाचा अर्थ संबंध आहे. एकूण लिंगांगसामरस्य करण्याकरितांच हा मंत्र सांगितला आहे. हा मंत्र निगमामध्यें ( वेदांमध्यें ) आगमांमध्यें श्रेष्ठ असा गणिला गेला आहे. ( ६५ ) याप्रमाणें विभूति रुद्राक्ष धारण करून पंचाक्षरी जप करून नित्य लिंगपूजेंत रत असलेल्या मानवाची सर्व क्रिया यथासांग कशी असावी, अशी आकांक्षा येईल याकरितां भक्तिस्थल सांगतात. ( ६६ ) वृद्धजाबालोपनिषदांत सांगितलें कीं,– " तस्माद्भस्म० " ( अर्थ– ) याकरितां भस्म रुद्राक्ष धारण करून रुद्रानुवाकांनी रुद्राची पूजा करावी. ( ६७ ) " एक एवहि रुद्रो न द्वितीयाय तस्थे " इत्यादि मंत्रांनी परमेश्वराची स्तुति करून निरंतर युक्तींनी ज्ञान करून घेऊन शिवाचें ध्यान करावें. नंतर सर्व पाशबंधच्छेदापासून तो मानव मुक्त होतो. नित्य सुखी होतो; संसारांत पुनः येत नाहीं शिवस्वरूप होतो, शिवस्वरूप होतो, शिवस्वरूप होतो. ( ६८ ) तसेंच शिवाद्वैतांत सांगितलें कीं,– शिवयोगी हा साक्षात शिवच आहे; अशा दासभावानें जो चांगल्या मनानें पूजा करतो, त्यालाच भक्त असें ह्मणतात. ( ६९ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं,– " मुक्तस्यैव० " ( अर्थ ) मुक्त मानवालाच भक्ति उत्पन्न होते, संसारांत निमग्न झालेल्या बद्ध मानवाला कधींही भक्ति उत्पन्न होत

कस्यैव हि मुक्तिः स्यान्नाभक्तस्य कदाचन ॥ ६९ ॥ वातुले ॥ प्रसादभक्तिमुक्तीनामेक-देशसमन्वयः ॥ अपि मुक्तिर्भवेज्जन्या शेषौ द्वौ जनकौ मतौ ॥ ७० ॥ तत्रैव ॥ प्रसादो जनकः प्रोक्तो जननी भक्तिरीरिता ॥ अनयोरैक्यभावेन जनिता मुक्तिकन्यका ॥ ७१ ॥ स्कांदे ॥ लिंगे प्राणं समाधाय प्राणे लिंगं तु शांभवं ॥ सशरीरं मनः कृत्वा न किंचिच्चिंतयेद्यदि ॥ ७२ ॥ साभ्यंतरा भक्तिरिति प्रोच्यते शिवयोगिभिः ॥ सा यस्मिन्वर्तते तस्य जीवनं भ्रष्टबीजवत् ॥ ७३ ॥ तत्रैव ॥ बहुनात्र किमुक्तेन गुह्याद्गुह्यतरं परं ॥ शिवभक्तिर्न संदेहस्तया युक्तो विमुच्यते ॥ ७४ ॥ किंच वातुले ॥ प्रसादाद्देवताभक्तिः प्रसादो भक्तिसंभवः ॥ यथैवांकुरतो बीजं बीजतो वा तथांकुरं ॥ ७५ ॥ प्रसादपूर्विका चैका भक्तिर्मुक्तिविधायिनी ॥ नैव सा शक्यते प्राप्तुं नरैरेकेन जन्मना ॥ ७६ ॥ तत्र ॥ अनेकजन्मशुद्धानां श्रौतस्मार्तानुवर्तिनाम् ॥ विरक्तानां प्रबुद्धानां प्रसीदति महेश्वरः ॥ ७७ ॥ प्रसन्ने सति मुक्तोऽ-

---

नाहीं. भक्तालाच मुक्ति होते; अभक्ताला होत नाहीं. ( ७० ) वातुलांत सांगितलें कीं,— " प्रसाद० " ( अर्थ ) प्रसाद, भक्ति, मुक्ति यां सर्व वस्तूंचा समन्वय एकाच ठिकाणीं होतो. मुक्ति ही दोन्हींची कन्या असून बाकीचें दोन ( प्रसाद आणि भक्ति ) जनक आहेत. ( ७१ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं. " प्रसादो० " ( अर्थ— ) प्रसाद हा बाप असून भक्ति ही आई आहे. या दोहोंच्या संयोगानें ( ऐक्यानें ) मुक्तिरूप कन्या उत्पन्न झाली. ( ७२ ) स्कांदपुराणांत सांगितलें कीं,— " लिंगे प्राणं० " ( अर्थ— ) शरीरसहित मन एके ठिकाणीं करून लिंगाच्या ठिकाणीं प्राण ठेवून प्राणाच्या ठिकाणीं शिवलिंग ठेवून शिवाचें ध्यान करावें; दुसरें ध्यान कांहीं करूं नये. ( ७३ ) " साभ्यंतरा " ( अर्थ ) शिवयोगी लोक याला आभ्यंतर भक्ति ह्मणतात. ती भक्ति ज्याच्या ठिकाणीं असेल, त्याचें जीवन नासलेल्या बीजाप्रमाणें आहे. ( ह्मणजे तो पुनः संसारांत येत नाहीं. ) ( ७४ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं, " बहुनात्र० " ( अर्थ ) फार बोलून काय उपयोग? अति गुप्त गोष्टीपैकीं ही गुप्त गोष्ट आहे कीं शिवभक्ति हीच होय. जो शिवभक्तीनें युक्त आहे; तो मुक्त होतो. ( ७५ ) आणि वातुलांत सांगितलें कीं, " प्रसादा० " प्रसादापासून देवतेच्या ठिकाणीं ( शिवाच्या ठिकाणीं ) भक्ति उत्पन्न होते; प्रसादापासून भक्तीची उत्पत्ति आहे. अंकुरापासून बीजाची उत्पत्ति असून बीजापासून अंकुराची उत्पत्ति जसें लोकांत प्रसिद्ध आहे; त्याप्रमाणें समजावें. ( ७६ ) " प्रसाद० " ( अर्थ ) प्रसादपूर्वक एक भक्तीचं मुक्ति देणारी आहे ती शिवभक्ति एका जन्मांत मिळणें फार असंभव आहे. ( ७७ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं,— " अनेक जन्म० " ( अर्थ ) अनेक जन्मामध्यें शुद्ध झालेले, श्रौत स्मार्त मार्गानें वागणारे, विरक्त, ज्ञानी अशा मानवांना महेश्वर प्रसंन्न होतो. ( ७८ ) " प्रसंने० " ( अर्थ ) श्रीशिव प्रसंन्न झाल्यानंतर तो शिवभक्त

भून्मुक्तः शिवसमो भवेत् ॥ अल्पभाव्यपि यो मर्त्यस्तस्य जन्मत्रयात्परं ॥ ७८ तथा स्कांदे ॥ तीर्थयात्रा बहुविधा यज्ञाश्च विविधाः कृताः ॥ एषां जन्मसहस्रेषु तस्माद्भक्तिर्भवेच्छिवे ॥ ७९ ॥ किंच ब्रह्मगीतायां ॥ नाहं प्रसन्नस्तपसा न दानेन न चेज्यया ॥ तुष्टोऽहं भक्तिलेशेन क्षिप्रं याति परं पदं ॥ ८० ॥ तत्रैव ॥ न कर्मणा न तपसा न जपैर्न समाधिभिः ॥ न ज्ञानेन न दानेन वश्योऽहं श्रद्धया विना ॥ ८१ ॥ तथा स्कांदे ॥ शुभानामशुभानां च कर्मणां वापि संचयं ॥ करोति भस्मसाद्भक्तिर्देहत्यग्निरिवेंधनं ॥ ८२ ॥ शैवरत्नाकरे ॥ सद्भक्तजनसंगश्च दुःसंगाभाव एव च ॥ एताभ्यां वर्धते पुंसां शिवभक्तिर्गरीयसी ॥ ८३ ॥ एवं सद्भक्तिस्थलसंपन्नस्य भक्तस्य देहप्राणरूपकर्तृभृत्यत्वसंबंधः यथेत्याकांक्षायामनंतरमुभयस्थलमित्युच्यते ॥८४॥ "श्वेताश्वतरोपनिषदि" ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ ८५ ॥ तथैवोक्तं तत्वसारे ॥ सम्यग्गुरुं

---

मुक्त होतो. मुक्त झाल्यानंतर शिवासमान होतो. अल्प भावना शिवाच्या ठिकाणीं ठेवणार जो शुद्धशैव असेल; त्याला तीन जन्मांनंतर मुक्ति मिळते. (७९) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, "तीर्थयात्रा०" (अर्थ) हजारो जन्मांमध्यें पुष्कळ तऱ्हेच्या तीर्थयात्रा ज्याला झाल्या असतील, अनेक तऱ्हेचे यज्ञ केले असतील, ह्मणूनच शिवाच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होते. (८०) आणि ब्रह्मगीतेंत सांगितलें कीं,– "नाहं प्रसन्न०" (अर्थ) तपश्चर्येनें मी प्रसन होत नाहीं, दानानें प्रसंन होत नाहीं; योगानें प्रसंन होत नाहीं, थोडक्या भक्तीनें मात्र प्रसंन होतों; त्यामुळें मानव लौकरच परपदाला जातो. (८१) तेथेंच पुनः सांगितलें कीं, "न-कर्मणा०" (अर्थ) कर्मानें, तपानें, जपांनी, समाधींनी, ज्ञानानें, दानांनें मी वश्य होत नाहीं; परंतु श्रद्धेनें मात्र लौकरच वश्य होतों. (८२) तसेंच स्कांदपुराणामध्यें सांगितलें कीं,– "शुभाना०" (अर्थ–) शुभकर्मांचा संचय असो, किंवा अशुभकर्मांचा संचय असो, भक्ति एक असली ह्मणजे त्यायोगानें अग्नींत लांकडे जळल्याप्रमाणें सर्व शुभाशुभ कर्में जळून जातात. (८३) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, "सद्भक्तजन०" (अर्थ) नेहमीं सद्भक्तांचा सहवास होणें आणे दुष्ट लोकांची संगति न होणें या दोहोंपासून श्रेष्ठ शिवभक्ति वाढते. (८४) याप्रमाणें सद्भक्तिस्थल संपन्न झालेल्या भक्त मानवाला देहप्राणरूप कर्तृभृत्यत्वाचा संबंध कसा येतो? अशी आकांक्षा झाली तर उभयस्थल सांगतात. (८५) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, "यस्य देवे०" (अर्थ–) ज्या भक्ताची भक्ति श्रीशिवाच्या ठिकाणीं जशी असेल; तशी श्रेष्ठ भक्ति गुरूच्या ठिकाणीं असली तर त्या भक्ताला सर्व अर्थ प्रकाशमान होतात. (मिळतात.) (८६) तसेंच तत्वसारांत सांगितलें आहे; कीं.

शिवं नित्यं ज्ञात्वा तत्पूजनं बुधः ॥ यः करोत्युभयाकारं शिवस्यैकाश्रयः स हि ।८६। एवमुभयस्थले लिंगांगोभयसंबंधज्ञानवतो भक्तस्य शरीरमनोभावेषु गुरुलिंगजंगमभूतविचारो यथेत्याकांक्षायामनंतरं त्रिविधसंपत्तिस्थलमित्युच्यते ॥ ८७ ॥ " श्वेताश्वतरोपनिषदि „ तस्याभिज्ञानातृतीयं देहभेदे विश्वैश्वर्यं केवलमाप्तकामः ॥ ८८ ॥ तथैवोक्तं वातुलतंत्रे ॥ गुरौ देवे समा बुद्धिर्यथा या शिवयोगिनि ॥ सैषा त्रिविधसंपत्तिः संवित्साम्राज्यशालिनां ॥ ८९ ॥ एवं त्रिविधसंपत्तिस्थलसंपन्नस्य भक्तस्य शरीरमनोज्ञानपरिणामेषु गुरुलिंगजंगमप्रसादभक्तिसन्निहितभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं चतुर्विधसारायस्थलमित्युच्यते ॥ ९० ॥ " पारातश्रुतौ " प्रांचो धावन्ति प्रांचो वहि स्वर्गो लोकः चतसृभिरनुमंत्रयते चत्वारि छंदा९ सि छंदोभिरेवैनान् स्वर्गं लोकं गमयति ॥ ९१ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ शिवाचार्यातिथिष्वेतत्प्रसादेऽप्येकरूपिणी ॥ सा चतुर्विधसारोक्ता भक्तिरव्यभिचारिणी ॥ ९२ ॥ एवं चतुर्विधसारायस्थलसंपन्नो महात्मा सकलभक्तजनहितोप-

---

" सम्यग्गुरुं " ( अर्थ ) निरंतर शिवाला आणि गुरूला चांगल्या तऱ्हेनें जाणून जो उभयस्वरूपानें पूजा करतो; तो शिवाचें मुख्य स्थान होय. ( ८७ ) याप्रमाणें उभयस्थलामध्यें लिंगांगोभय संबंधी ज्ञान ज्याला आहे; अशा भक्ताच्या शरीर मनोभावामध्यें गुरुलिंगजंगमाचा विचार कसा येईल ? अशी आकांक्षा आली असतां त्रिविध संपत्तिस्थल सांगतात. ( ८८ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं,– " तस्याभिधाना० " ( अर्थ ) त्या शिवाच्या नाम भेदानें गुरुलिंग जंगम मूर्तिरूप देह भेदाच्या ठिकाणीं सर्व ऐश्वर्य व मोक्ष मिळविण्याची इच्छा करणारा होऊन राहावें. ( ८९ ) तसेंच वातुलतंत्रांत सांगितलें कीं,– " गुरौ देवे० " ( अर्थ ) जसें गुरूच्या ठिकाणीं शिवाच्या ठिकाणीं, शिवयोग्याच्या शरीराच्या ठिकाणीं जी समबुद्धि असेल; ती बुद्धि चांगलें ज्ञानरूपी साम्राज्यानें संपन्न अशा लोकांची त्रिविध संपत्ति होय. ( ९० ) याप्रमाणें त्रिविध संपत्तिस्थल संपन्न अशा भक्ताच्या शरीर मन ज्ञान यांच्या परिणामांमध्यें गुरु लिंग जंगम यांच्या प्रसादामध्यें भक्तिसहित भेद कसा? होतो अशी आकांक्षा झाली तर चतुर्विधसारायस्थल सांगततात. ( ९१ ) पारा श्रुतींत सांगितलें कीं, "प्रांचो धावंति०" ( अर्थ ) पुरातन लोक सुखरूप उत्तम दृष्टीचे होऊन फिरतात. त्या पुरातन लोकांप्रमाणें छंदस्वरूप गुरु, लिंग, जंगम, प्रसाद या चौघांचें ध्यान करावें. असें ध्यान करणाऱ्या त्यां भक्तांना सुखस्वरूप उत्तम पद मिळतें. ( ९२ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं,– " शिवाचार्य० " ( अर्थ ) शिव, ( लिंग ) आचार्य, ( गुरु ) अतिथि ( जंगम ) यां तिघांच्या ठिकाणीं व यां तिघांच्या प्रसादाच्या ठिकाणीं एकाच प्रकारची व्यभिचाररहित असलेली ती भक्ति चतुर्विधसार असें ह्मणविली जाते. ( ९३ ) याप्रमाणें चतुर्विधसारायस्थल संपन्न असा महात्मा सकल भक्त जनांच्या हितोपदे-

देशार्थं गुरुलिंगजंगमपूजानिरूपणे कृते सत्यनंतरमुपाधिदानस्थलमित्युच्यते ॥ ९३ ॥ छांदोग्योपनिषदि ॥ त्रयो धर्मस्कन्धाः यज्ञोऽध्ययनं दानमिति ॥ ९४ ॥ काठकीयश्रुतौ ॥ यस्त्वतिथिभ्योऽन्नादिहविरदत्त्वा भुंक्ते स किल्बिषं भुंक्ते ॥ ९५ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ क्षीयन्ते च वरारोहे तपोयज्ञक्रियादयः ॥ न क्षीयन्ते वरारोहे वीरवक्त्रहुतं हविः ॥ ९६ ॥ किं च शैवपुराणे ॥ वृत्तम् ॥ नाहं तदद्मि यजमानहविर्वितानं चोत्यं घृतप्लुतमिदं हुतभुङ्मुखेन ॥ यज्जंगमस्य मुखतश्चरतोऽनुमासं तृप्तिर्न मे ह्यवहितैर्निजकर्मपाकैः ॥ ९७ ॥ पेषणं खण्डनं चुल्ली उदकुंभः प्रमार्जनं ॥ पंचसूना गृहस्थस्य केन मोक्षं न जायते ॥ ९८ ॥ देवकार्यं गुरोः कार्यं गणकार्यं च योगिने ॥ खननोत्पाटनं खण्डं कुर्वन्पापैर्न लिप्यते ॥ ९९ ॥ तथैव शातातपस्मृतौ ॥ आत्मार्थं न पचेदन्नं देवतार्थं तु पाचयेत् ॥ आत्मार्थं पचते यस्तु ब्रह्महा स च कथ्यते ॥ १०० ॥ किं च शिवरहस्ये ॥ लिंगार्थं जंगमार्थं च विशेषं पाक-

---

शाकरितां गुरुलिंगजंगमपूजा निरूपण केल्यानंतर उपाधिदानस्थल सांगतात. ( ९४ ) छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं,— " त्रयो धर्म " ( अर्थ ) यज्ञ, ( शिवपूजा ) अध्ययन, ( शिवकथाश्रवण ) दान ( शिवयोग्यांस दान देणें ) असे हे धर्मरूप वृक्षाचे स्कंध ( शाखा ) आहेत. ( ९५ ) काठकीयश्रुतींत सांगितलें कीं, " यस्त्वतिथिभ्यो " ( अर्थ ) जो मानव अतिथि अशा जंगमांना अन्नादि पदार्थ दिल्याशिवाय आपणच त्याचा उपभोग घेतो, तो मानव आपलें पापच आपण खातो; असें समजावें. ( ९६ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " क्षीयंते० " ( अर्थ ) हे सुंदरि देवि, तप, यज्ञ, वगैरे क्रिया क्षय पावतात; परंतु हे देवि, वीरांच्या ( वीरमाहेश्वरांच्या ) तोंडांत हवन केलेलें कधींही नष्ट होत नाहीं. ( ह्मणजे वीरमाहेश्वरांना अन्न दान केलेलें अक्षय होतें ) ( ९७ ) आणि शैवपुराणांत सांगितलें कीं, " नाहं तदद्मि० " ( अर्थ ) श्रीशिव ह्मणतात कीं, तुपानें भिजलेलें तें हविर्द्रव्य यजमानानें ( याग करणाऱ्यानें ) अग्नीच्या द्वारानें दिलें तरी मी घेत नाहीं; परंतु जंगमांच्या मुखानें प्रतिमासीं दिलेलें तें जसें मला तृप्तिकर होतें; तसें सावधान मनानें केलेल्या निजकर्माच्या परिपाकानें तृप्ति होत नाहीं. ( ९८ ) " पेषणं " ( अर्थ ) दळणें, कांडणें, स्वयपाक करणें, पाणी आणणें, केर काढणें असे पंचसून दोष गृहस्थाचे का जातील बरें? कधींही जणारच नाहींत; अर्थात त्याला मोक्षही होत नाहीं. ( ९९ ) " देवकार्य० " ( अर्थ— ) श्रीशिवाचें कार्य, श्रीगुरूचें कार्य, शिवगणांचें कार्य शिवयोग्याचें कार्य यांच्याकरितां खणलें तर, उत्पाटन केलें तर, तोडलें तर मनुष्याला पाप लागत नाहीं. ( १०० ) तसेंच शातातपस्मृतींत सांगितलें कीं, " आत्मार्थं० " ( अर्थ ) आपल्या स्वताकरितां कधींही स्वयपाक करूं नये; देवाकरितां मात्र स्वयपाक करावा. जो मानव आपल्या स्वताकरितां स्वयपाक करतो, तो ब्रह्मघातकी आहे; असें समजावें. ( १०१ ) आणि शि-

मुत्तमं ॥ आत्मार्थं यत्कृतं पाकं श्वानमांससमं भवेत् ॥ १०१ ॥ ब्रह्मगीतायां ॥ प्रवृत्तं च निवृत्तं च द्विविधं दानमिष्यते ॥ आहुः प्रवृत्तमाचार्या देवैश्वर्यादिसाधकं ॥ १०२ ॥ शिवधर्मोत्तरे ॥ तस्मात्पात्रतमं ज्ञात्वा शिवभक्तमकल्मषं ॥ तस्मै सर्वं प्रदातव्यमक्षयं फलमिच्छता ॥ १०३ ॥ शैवरत्नाकरे ॥ शिवभक्तमतिक्रम्य यच्चान्यस्मै प्रदीयते ॥ निष्फलं तद्भवेदानं नरकं च प्रपद्यते ॥ १०४ ॥ शिवरहस्ये ॥ सर्वाचारविशेषेण सर्वव्रतविशेषतः ॥ सर्वशीलविशेषेण शिवदासोऽहमुत्तमं ॥ १०५ ॥ एवं सकलभक्तजनानां भक्तिप्रारंभमुपदिष्टमहात्मा स्वयमुपाधिमनादृत्य निरुपाधिकः सन् सेवापरः कथमित्याकांक्षायामनंतरं निरुपाधिदानस्थलमित्युच्यते ॥ १०६ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ यो देवानामधिपो यस्मिन् लोका अधिश्रिताः य ईशोऽस्य द्विपाचतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ १०७ ॥ तथा शिवरहस्ये ॥ ममेशस्वामिकं

---

वरहस्यांत सांगितलें कीं, " लिंगार्थं० " ( अर्थ– ) आपल्या इष्टलिंगाकरितां व जंगमाकरितां केलेला स्वयपाक श्रेष्ठ होय. आपल्या स्वताकरितां केलेला स्वयपाक कुत्र्याच्या मांसाप्रमाणें समजावें. जंगमांला पंक्तींत घेऊन भोजन केलें असतां कोणत्याही प्रकारचें पातक असलें तरी त्यांपासून मानव मुक्त होतो असें यांतलें तात्पर्य आहे. ( १०२ ) ब्रह्मगीतेंत सांगितलें कीं,— " प्रवृत्तं० " ( अर्थ– ) दानामध्यें प्रवृत्त आणि निवृत्त असे दोन मार्ग आहेत; त्यांत प्रवृत्त दान केलें असतां देवांचें ऐश्वर्य मिळतें; असें मोठमोठे आचार्य सांगतात. ( प्रवृत्त ह्मणजे फलकांक्षा धरून केलेलें दान आणि निवृत्त ह्मणजे फलकांक्षा न धरतां केलेलें दान. ) ( १०३ ) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं,— " तस्मात्पात्रतमं० " ( अर्थ– ) अक्षय फल इच्छा करणाऱ्या मानवानें अत्यंत श्रेष्ठ पात्र अशा निष्कल्मष शिवभक्तांला जाणून त्याला जें कांहीं द्यावयाचें दान तें द्यावें. ( १०४ ) शैवरत्नकरांत सांगितलें कीं, " शिवभक्त० " ( अर्थ– ) शिवभक्ताला सोडून दुसऱ्या कोणाला दान दिलें तर तें दान निष्फल होतें; आणि त्यामुळें दान देणारा नरकाला जातो. ( १०५ ) शिवरहस्यांत सांगितलें कीं,— " सर्वाचार० " ( अर्थ ) विशेष विशेष सर्व आचारांपेक्षां, विशेष विशेष सर्व व्रतांपेक्षां, विशेष विशेष सर्व शीलांपेक्षां शिवाचें दास्य करणें ( शिवभक्तांला अन्न दान करणें ) श्रेष्ठ होय. ( १०६ ) याप्रमाणें सर्व भक्तजनांला भक्तीच्या प्रारंभाचा उपदेश करून त्या माहात्म्यानें स्वतः उपाधीचा अनादर करून निरुपाधिक होऊन सेवेंत आसक्त कसें व्हावें? अशी आकांक्षा आल्यानंतर निरुपाधिदानस्थळ सांगतात. ( १०७ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " यो देवानामधिपो० " ( अर्थ ) जो देवांचा स्वामी आहे; व ज्याच्यामध्यें सर्व लोक राहिले आहेत, तो द्विपाद चतुष्पाद प्राण्यांचा प्रभु आहे, तशा महादेवाला हविष्यान्नानें पूजा करतों. ( १०८ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " ममेश स्वामिकं० " ( अर्थ ) मी जें कार्य करतों; त्याच्यावर

कार्यं सर्वं मत्वेशचोदितं ॥ यस्यार्थः क्रियते पात्रे सा क्रिया निरुपाधिका ॥१०८॥ किं च भगवद्गीतायां ॥ दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ॥ देशे काले च पात्रे च तद्दानं निरुपाधिकं ॥ १०९ ॥ वातुलतंत्रे ॥ मदीयं तुभ्यमित्युक्तं[1] न दद्याद्वस्तु किंचन ॥ त्वदीयं तुभ्यमित्येतद्दानं विमलमीरितं[2] ॥ ११० ॥ तत्रैव ॥ समयाराधनं नित्यं धनप्राणाभिमानकैः ॥ त्रिसंध्यं ध्यानतो देवि मार्गशुद्धिरिहोच्यते ॥ १११ ॥ एवं निरुपाधिको भूत्वा कर्तृभृत्यभावेन सेवापरो महात्मा स्वकृतभक्तौ स्वीकृतवस्तुनि चाभेदे प्राप्ते सत्यनंतरं सहजदानस्थलमित्युच्यते ॥ ११२ ॥ "श्वेताश्वतरोपनिषदि" ॥ भोक्ता भोग्यं प्रेरितारं च मत्वा सर्वं प्रोक्तं त्रिविधं ब्रह्म चैतत् ॥ ११३ ॥ तथैवोक्तं कूर्मपुराणे ॥ दाता दानं च देयं च पात्रं चैव शिवः स्वयं ॥ नाहं कारणमित्येतद्दानं विमलमीरितं ॥ ११४ ॥ तथा स्कांदे ॥ शिवो दाता शिवो

सत्ता प्रभु श्रीशिवाची आहे; असें समजून आणि साक्षात श्रीशिवाची प्रेरणा झाली आहे; असें समजूनच सत्पात्राच्या ठिकाणीं जें दिलें जातें; त्या क्रियेला निरुपाधिक क्रिया ह्मणतात. ( १०९ ) आणि भगवद्गीतेंत सांगितलें कीं,– दातव्यमिति० " ( अर्थ ) दान दिलें पाहिजे; असें समजून परत उपकाराची अपेक्षां न करितां जें दान पुण्य-देश, पुण्यकाल सत्पात्र पाहून दिलें जातें, त्या दानाला निरुपाधिक दान ह्मणतात. ( ११० ) वातुलतंत्रांत सांगितलें कीं,– " मदीयं० " ( अर्थ ) हा पदार्थ माझा आहे तुह्माला मी देतों; असें ह्मणून कोणत्याहीं वस्तूचें दान करूं नयें; परंतु हा पदार्थ तुमचाच असून तुह्माला मी देतों; असें ह्मणून दान करावें.( १११ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं,– " समयाराधनं० " ( अर्थ० ) हे देवि, समयाचाराच्या निमित्तानें निरंतर धन, प्राण, अभिमान त्रिकाल जो अर्पण करतो; त्याला तेथें मार्गशुद्धि असें ह्मणतात. ( ११२ ) याप्रमाणें निरुपाधिक होऊन कर्तृ भृत्यभावानें सेवेंत आसक्त झालेला महात्मा आपण केलेल्या भक्तीच्या ठिकाणीं आणि आपण स्वीकारलेल्या वस्तूच्या ठिकाणीं एक झाल्यानंतर सहजदानस्थल सांगतात. ( ११३ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " भोक्ता भोग्यं० " ( अर्थ ) उपभोग घेणारा, उपभोगास योग्य वस्तु, प्रेरक ( प्रेरणा करणारा शिवभक्त ) हे तीन्हीही पदार्थ ब्रह्मस्वरूपच आहेत. असें सांगतात. ( ११४ ) तसेंच कूर्मपुराणांत सांगितलें कीं, " दाता दानं० " ( अर्थ ) दान करणारा, दान, घावयास योग्य वस्तु, पात्र या सर्वांला कारण शिवच आहे! मी कांहीं कारण नाहीं; असें समजून दान दिलें तर त्या दानाला विमल दान ह्मणतात. ( ११५ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " शिवो दाता० " ( अर्थ ) दाता हा शिवच असून शिवच

१ समयाचरणे ॥ पाठान्तरम् ॥ २ दास्यतो पाठान्तरम् ॥

भोक्ता शिवः सर्वमिदं जगत् ॥ शिवो यजति तत्सर्वं तच्छिवः सोऽहमेव च ॥ ॥ ११६ ॥ कपिल उवाच ॥ न्यायार्जितं धनं यत्तु शिवभक्तस्यैव केवलं ॥ दत्वा त्संगविनिर्मुक्तस्तद्दानं सहजं स्मृतं ॥ ११६ ॥ वासिष्ठे ॥ निरुपाधिकचिद्रूपपरानंदात्मवस्तुनि ॥ समाप्तं सकलं यस्य स दानी शंकरः स्वयं ॥ ११७ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे भक्तस्थलं नाम प्रथमं प्रकरणं संपूर्णम्

---

भोक्ता आहे; हें जग सर्व शिवच आहे. शिवच सर्व योग करतो; याकरितां तो शिव मीच आहे. ( ११६ ) कपिल ऋषि बोलतात, " न्यायार्जित० " ( अर्थ ) न्यायानें मिळविलेलें द्रव्य केवळ शिवभक्तीनेंच सर्व संगाचा त्याग करून दिलें तर त्याला सहजदान म्हणतात. ( ११७ ) वासिष्ठांत सांगितलें कीं, " निरुपाधिक० " ( अर्थ ) उपाधिरहित, चित्स्वरूप, परानंदस्वरूप अशा आत्मवस्तूच्या ठिकाणीं सर्व कांहीं समाप्त झालें आहे; अशा समजुतीनें दान देणारा तो साक्षात स्वतः शंकरच होय.

याप्रमाणें श्रीमत्परम शिवयोगिराज व परिव्राजकांचा आचार्य अशा श्रीतोंटदार्यांनी रचलेल्या परमवीरशैवाद्वैत बोध करणाऱ्या एकोत्तरशतस्थलश्रुतिमाला विवरण नांवाच्या कैवल्यसार ग्रंथांतील भक्तस्थल नांवाचें पहिलें प्रकरण संपलें.

# ॥ अथ द्वितीयप्रकरणम् ॥

॥ श्रीशिवायनमः ॥ एवं भक्तस्थलमाश्रित्य कर्तृभृत्यभावं विस्मृत्य स्वस्वरूपनिष्ठमाहात्म्यानंतरं निष्ठामुखेनाचारमनुस्मृत्य सामरस्यं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं माहेश्वरस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ श्रीरुद्रे ॥ ये भूतानामधिपतयो विशिखासः कपर्दिनः ॥ २ ॥ तथा उत्तरकामिके ॥ ब्रह्मादिदेवताजालं मोहितं मायया सदा ॥ अशक्तं मुक्तिदाने तु क्षयातिशयसंयुतं[1] ॥ ३ ॥ अनादिमुक्तो भगवानेक एव महेश्वरः ॥ मुक्तिदश्चेति यो देवः स वै माहेश्वरः स्मृतः ॥ ४ ॥ ब्रह्माद्यैर्मलिनप्रायैर्निर्मले परमेश्वरे ॥ साम्योक्तिं यो न सहते स वै माहेश्वराभिधः ॥ ५ ॥ क्षयातिशयसंयुक्ता ब्रह्मविष्ण्वादिसंपदः ॥ तृणवन्मन्यते बुध्या वीरमाहेश्वरः सदा ॥६॥ सिध्दान्तशेखरे ॥ सदाकाले शिवे भक्तिलिंगजंगमपूजनं ॥ एकपत्नीव्रतं वीरमाहेश्वरमहा

---

## दुसरें प्रकरण.

॥ १ ॥ याप्रमाणें भक्तस्थलाचा आश्रय करून कर्तृभृत्यभाव विसरून स्वस्वरूपाच्या ठिकाणीं तो महात्मा एकनिष्ठ झाल्यानंतर मुख्यत्वेंकरून असलेल्या नैष्ठिक भक्तीनें आचाराचें स्मरण करून समरसभाव पावलेल्या भेदाचा कसा होतो; ( सामरस्य कसें प्राप्त होतें ) अशी आकांक्षा आल्यानंतर माहेश्वरस्थल सांगतात ( २ ) श्रीरुद्रांत सांगितलें कीं,– " ये भूतानामधिपतयो० " ( अर्थ– ) शिवःशिवाय इतर देवांला न जाणणारे, जटाधारी जे कोणी माहेश्वर आहेत, ते प्राणिमात्रांचे कर्ते आहेत. ( ३ ) तसेंच उत्तर कामिकागमांत ह्मटलें कीं,– " ब्रह्मादि देवताजालं० " ( अर्थ ) ब्रह्मादि सर्व देव श्रीशिवाच्या मायेनें सर्वदा मोहित झाले आहेत, मुक्ति देण्याविषयीं ते सर्व असमर्थ आहेत; आणि काळोखी रात्रीच्या गाढांधकाराप्रमाणें असलेल्या अज्ञानानें युक्त आहेत. ( ४ ) " अनादि० " ( अर्थ ) अनादिकालापासून मुक्त असलेला भगवान महेश्वर एकच आहे. आणि तोच मुक्ति देणारा आहे असें जो प्रतिपादन करीत असेल; तोच माहेश्वर होय. ( ५ ) " ब्रह्माद्यै० " ( अर्थ ) अज्ञानानें युक्त असलेल्या ब्रह्मादि देवांशी आणि निर्मल परमेश्वराशीं सारखेपणा सांगणाऱ्याचीं वचनें ज्याला खोंवतात, तोच खरा माहेश्वर होय. ( ६ ) " क्षयातिशय० " ( अर्थ ) ब्रह्मा विष्णु वगैरे देवांची संपत्ति अतिशय नाशवंत आहे; ह्मणून तृणाप्रमाणें त्या संपत्तीला बुद्धिपूर्वक मानतात, तेच वीरमाहेश्वर होत. ( ७ ) सिद्धांतशेखरांत सांगितलें कीं, " सदा० " ( अर्थ ) सार्वकाल शिवाच्या ठिकाणीं भक्ति करणें, इष्टलिंगाची व जंगमाची पूजा करणें, एक प-

---

[1] क्षुपातितमसान्वितं

व्रतम् ॥७॥ शैवरत्नाकरे ॥ तदेव लिंगं तत्प्रोक्तं लिंगाचारस्तु यस्य वै ॥ तेनैवाचारलिंगेन लिंगी माहेश्वरो जनः ॥ ८ ॥ एवं माहेश्वरस्थले नियमव्रतादिषु कृतनिश्चयस्य माहेश्वरस्यांगस्थितलिंगनिष्ठाभेदः कथमित्यकांक्षायामनंतरं लिंगनिष्ठास्थलमित्युच्यते ॥ ९ ॥ अथर्वशिरउपनिषद्वि ॥ शिव एको ध्येयः शिवंकरः सर्वमन्यत्परित्यज्य समाप्ताथर्वणी श्रुतिः ॥ १० ॥ तथैवोक्तं शैवपुराणे ॥ संसारमोचकः साक्षाच्छिव एव न चापरः ॥ अन्याश्च देवताः सर्वाः केवलं भोगदायकाः ॥११॥ सर्वमन्यत्परित्यज्य शिव एव शिवंकरः ॥ ध्येय इत्याह परमा श्रुतिराथर्वणी खलु ॥ १२ ॥ स्कांदे ॥ प्रणामदर्शनस्पर्शपूजाद्यैर्नियमेन यत् ॥ शिवलिंगस्य भजनं लिंगनिष्ठेति गीयते ॥ १३ ॥ किंच ॥ कूर्मपुराणे ॥ तदेव परमं धाम सैवेह परमा गतिः ॥ सैवेह परमा काष्ठा लिंगनिष्ठा शिवस्य या ॥ १४ ॥ तथैवोक्तं ब्रह्मणा वायवीयसंहितायां ॥ तदीयं त्रिविधं रूपं स्थूलं सूक्ष्मं ततः परं ॥ अस्मदाद्यमरैर्दृश्यं स्थूलं सूक्ष्मं च योगिभिः ॥ १६ ॥ ततः परं तु यन्नित्यं ज्ञान-

---

शीव्रत राखणें वगैरे वीरमाहेश्वराचीं व्रतें आहेत. ( ८ ) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " तदेव लिंगं० " ( अर्थ ) ज्याला इष्टलिंगाचा आचार जो सांगितला असेल, त्याला तेंच इष्टलिंग आहे; असें सांगितलें आहे; त्याच आचार लिंगानें माहेश्वर जनाला लिंगवंत असें ह्मणतात. ( ९ ) याप्रमाणें माहेश्वरस्थलामध्यें नियम व्रतादिकांच्या ठिकाणीं निश्चय केलेल्या माहेश्वराच्या अंगावर असलेल्या लिंगाच्या ठिकाणीं निष्ठा भेद कसा? अशी आकांक्षा आली तर लिंगनिष्ठास्थल सांगतात. ( १० ) अथर्वशिर उपनिषदांत सांगितलें कीं, " शिव एको० " ( अर्थ ) सर्व इतर देवतांचा त्याग करून शुभकर एकट्या श्रीशिवाचेंच ध्यान करावें. असें सांगून येथें अथर्वशिखा संपली. ( ११ ) तसेंच शैवपुराणांत सांगितलें कीं,– " संसारमोचकः " ( अर्थ ) संसारापासून सोडविणारा साक्षात शिव एकटाच आहे? दुसरा कोणीही नाहीं इतर सर्व देवता केवल भोगदायक आहेत. ( १२ ) " सर्वम० " ( अर्थ ) इतर सर्व सोडून शुभकर श्रीशिवाचेंच ध्यान करावें; असें श्रेष्ठ अथर्वण श्रुतीनें सांगितलें आहे. ( १३ ) स्कांदपुराणांत सांगितलें कीं,– " प्रणाम० " ( अर्थ ) नमस्कार दर्शन, स्पर्श, पूजा इत्यादिकांनी व नियमानें शिवलिंगाचें भजन करणें याला लिंगनिष्ठा असें ह्मणतात. ( १४ ) आणखी कूर्मपुराणांत सांगितलें कीं,– " तदेव० " शिवलिंगाच्या ठिकाणीं निष्ठा ठेवणें हेंच श्रेष्ठ स्थान होय, ती निष्ठाच श्रेष्ठ गति होय, तीच चांगली दिशा होय. ( १५ ) तसेंच ब्रह्मदेवानें वायवीयसंहितेंत सांगितलें कीं, " तदीयं० " त्या परतत्वाचीं स्थूल, सूक्ष्म, परतत्व अशीं तीन रूपें आहेत. मीच वगैरे देवानां दिसणारें रूप ह्मणजे स्थूलरूप असें माहेश्वरतत्व होय. योग्यांना दिसणारें सूक्ष्मरूप असें सदाशिवतत्व होय; ( १६ ) " ततःपरं० "

मानंदमव्ययं ॥ तन्निष्ठैस्तत्परैर्भक्तैर्दृश्यं तद्व्रतमास्तिकैः ॥ १६ ॥ किंच ॥ वातुले ॥ लिंगभक्तिर्लिंगपूजा लिंगधारणमेव च ॥ लिंगप्रसादस्वीकारो लिंगश्रवणमादरात् ॥ लिंगध्यानं लिंगमनः सर्वं लिंगमयं जगत् ॥ १७ ॥ एवं लिंगनिष्ठान्वितो माहेश्वरः तस्मिन् लिंगे लोलुप्तः सन् स्वस्य पूर्वजातिजीवभावलौकिकनानाप्रपंचपूर्वाश्रमान् मिथ्येति मत्वा निरसने कृते सत्यनंतरं पूर्वाश्रयनिरसनस्थलमित्युच्यते ॥१८॥ मुण्डकोपनिषदि ॥ स यो हवै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रंथिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥ १९ ॥ किंच ॥ नारायणोपनिषदि ॥ न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ॥२०॥ तथैवोक्तं स्कांदे ॥ अज्ञानं पूर्वमित्याहुर्भवोऽनादिस्तदाश्रयः ॥ सर्वं निरसितव्यं

---

( अर्थ ) नंतर नित्य, ज्ञानस्वरूप, आनंदस्वरूप, अव्यय ( नाशरहित ) असें परतत्व तन्निष्ठ, ( परतत्वांत निष्ठा असलेले ) तत्पर ( परतत्वांत असक्त असलेले ) परशिवसंबंधी वीरशैव व्रतामध्यें आस्तिक्य बुद्धि असलेल्या अशा माहेश्वरांला दिसणारे आहे. षट्स्थल ब्रह्मी ( १७ ) आणि वातुलांत सांगितलें कीं, " लिंग भक्ति० " ( अर्थ ) इष्टलिंगावर भक्ति करणें, इष्टलिंगाची पूजा करणें, इष्टलिंग धारण करणें, इष्टलिंगाच्या प्रसादाचा स्वीकार करणें, इष्टलिंगाचें चरित्र श्रवण करणें, इष्टलिंगाचें ध्यान करणें इष्टलिंगाच्या ठिकाणीं मन ठेवणें, सर्व जग इष्टलिंगमयच आहे, अशी भावना ठेवणें याला लिंगनिष्ठा ह्मणतात. ( १८ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें इष्टलिंगाचें ठिकाणीं निष्ठा ठेवणारा जो माहेश्वर असेल त्यानें त्या इष्टलिंगाचें ठिकाणीं लुब्ध होऊन आपली पूर्वींची जात व जीवत्व आणि लौकिकांतील नानातऱ्हेचा प्रपंच व पूर्वाश्रम वगैरे सर्व खोटे आहेत; असें समजून त्याला दूर सोडावें. ( त्यांतली आसक्ति सोडावी. ) त्यानंतर पूर्वाश्रय निरसनस्थल सांगतात. ( १९ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे कीं,— " सयो हवै० " ( अर्थ ) जो माहेश्वर उत्कृष्ट असें परब्रह्म हेंच आहे; असें समजतो, तो स्वतः परब्रह्मच होतो. कदाचित तो ब्रह्मस्वरूप झाला नाहीं; तर ब्रह्मज्ञान्याच्या वंशांत तो जन्म घेतो. शोकापासून मुक्त होतो, पातकांपासून उध्दत होतो, हृदयगुहेंतील अज्ञानग्रंथीपासून मुक्त होतो; आणि शेवटीं मोक्षाला जातो. ( २० ) आणि नारायणोपनिषदांत सांगितलें कीं,— " न कर्मणा० " ( अर्थ ) जप होम पितृतर्पण वगैरे कर्मांनी मोक्ष होत नाहीं, औरस वगैरे संततीनें मोक्ष होत नाहीं, द्रव्यानें मोक्ष मिळत नाहीं, परंतु कांहीं लोक पूर्वाश्रयाचा त्याग केल्यामुळें मोक्षाला गेले आहेत. ( २१ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं,— " अज्ञानं० " ( अर्थ ) अज्ञान हें पूर्वींचें आहे; आहे, असें सांगतात. आणि त्या अज्ञानाचा आश्रय करून राहिलेला संसार हा अनादि आहे,

तत्प्रयत्नेन विवर्जिता ॥ २१ ॥ तथा सिद्धान्तशेखरे ॥ यो दीक्षितस्तु श्राद्धादौ स्वपूर्वविधिमाचरेत् ॥ तस्य तन्निष्फलं सर्वं समयेन च लंघ्यते ॥ २२ ॥ शिवरहस्ये ॥ संध्या ध्यानं जपो होमः स्वाध्यायः पितृतर्पणं ॥ वृद्धाचारं तु तत्सर्वं शिवलिंगी न कारयेत् ॥ २३ ॥ एवं पूर्वाश्रयनिरस्तमाहेश्वरः लिंगं ज्ञात्वा तल्लिंगसुखं पृथग्वाचा व्यवहृते सति भिन्नत्वं प्राप्यतीति वाङ्निवृत्तौ सत्यामनंतरं वागद्वैतनिरसनस्थलमित्युच्यते ॥ २४ ॥ " मुण्डकोपनिषदि " अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः जघन्यमानाः परियंति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यंति बालाः ॥ २५ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥ २६ ॥ तथैवोक्तं सूतसंहितायां ॥ द्वौ सुपर्णौ शरीरेऽस्मिन् जीवेशाख्यौ व्यवस्थितौ ॥ तयोर्जीवः

---

असें सांगतात. याकरितां ज्ञानी मनुष्यानें प्रयत्नपूर्वक या सर्वांचा त्याग करावा. ( २२ ) तसेंच सिद्धांतशेखरांत सांगितलें कीं, " यो दीक्षित० " ज्यानें शिवदीक्षा घेतली आहे; त्यानें श्राद्धादिकाच्या वेळेस पूर्वीप्रमाणें कर्में केलीं तर त्याचीं तीं सर्व कर्में निष्फळ होऊन तो शिवाचारापासून भ्रष्ट होतो. ( २३ ) शिवरहस्यांत सांगितलें कीं, " संध्या ध्यानं० " ( अर्थ ) संध्या, ध्यान, जप, होम, स्वाध्याय, पितृतर्पण, वृद्धाचार, वगैरे कर्में शिवलिंगी माननानें करूं नये. ( २४ ) याप्रमाणें पूर्वाश्रयनिरसन केलेल्या माहेश्वरानें शिवलिंगज्ञान करून घेऊन त्या ज्ञानाचें सुख निराळ्यारीतानें बोलून दाखविल्यानंतर भेद प्राप्त होतो, याकरितां त्यानें वाणीची निवृत्ति करून घ्यावी; ती निवृत्ति झाल्यानंतर वागद्वैतनिरसनस्थल सांगतात. ( २५ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " अविद्याया० " ( अर्थ ) अज्ञानामध्यें असलेले लोक स्वतः आपण धीर असें मानून घेत असून आह्मी पंडित आहोंत; असा अभिमान वाळगितात. अशा तऱ्हेचे कनिष्ठ दर्जातील मूर्ख लोक आंधळ्याचा हात धरून चालणाऱ्या आंधळ्याप्रमाणें प्रायशः अज्ञानांत राहून आह्मी कृतार्थ झालों, असा व्यर्थ अभिमान वाळगतात. अर्थात ते बाल ( अज्ञानी ) होत. ( २६ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " द्वा सुपर्णा० " ( अर्थ— ) जीवपरमात्मा नांवाचे दोन पक्षी कधींही वियोग न पावणारे स्नेही असून शरीररूपी एका वृक्षावर ( झाडावर ) राहतात; त्या दोहोंमध्यें एक पक्षी सत्कर्मरूपी फळ खातो, दुसरा पक्षी कांहीं एक न खातां त्याच्या जोडीला प्रकाशतो. ( २७ ) तसेंच सूतसंहितेंत सांगितलें कीं, " द्वौ सुपर्णौ० " ( अर्थ ) या शरीरामध्यें जीव व ईश नांवाचे दोन पक्षी राहत असून त्या दोहोमध्यें जीव नांवाचा पक्षी आपल्या कर्मांचें

फलं भुंक्ते कर्मणो न महेश्वरः ॥ २७ ॥ तथा वासिष्ठे ॥ अज्ञस्याल्पप्रबुद्धस्य सर्वं ब्रह्मेति यो वदेत् ॥ महानरकजालेषु स तेन विनियोजितः ॥ २८ ॥ किंच ॥ विश्वसादाख्ये ॥ सर्वेषामेव भावानामात्मा सर्वेश्वरो हरः ॥ सति तस्मिन्नविज्ञाते किमद्वैतं भवेदहो ॥ २९ ॥ तथा पद्मनाभौ ॥ एक एव सदा रुद्रो न द्वितीयोऽस्ति कश्चन ॥ एतदद्वैतविज्ञानमन्यद्व्यर्थमुदाहृतं ॥ ३० ॥ एवं वाग्द्वैतनिरसनं कृत्वा सर्वांगे लिंगमेव पूर्णमिति विज्ञाता महेश्वरः कदाचिदावाह्य कदाचिद्विसर्जयितुमवकाशमजानानः आव्हानविसर्जनोभयेऽपि निरस्ते सत्यनंतरमाव्हाननिरसनस्थलमित्युच्यते ॥ ३१ ॥ प्रश्नोपनिषदि ॥ या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि॥ या च मनसि संततां शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥३२॥ तथैवोक्तं सिद्धान्तशिखामणौ ॥ यदा शिवकलायुक्तं लिंगं दद्यान्महागुरुः ॥ तदारभ्य शिवस्तत्र तिष्ठत्याव्हानमत्र किं ॥ ३३ ॥ तत्रैव ॥ सुसंस्कारेषु लिंगेषु सदा

---

फळ भोगतो; दुसरा माहेश्वर नांवाचा पक्षी न खातां प्रकाशमान होऊन राहतो. ( २८ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, " अज्ञस्या० " ( अर्थ ) अल्पज्ञानी मूर्ख शिष्याला सर्व परब्रह्मच आहे; असा उपदेश जो गुरु देतो; तो गुरु शिष्यासह मोठमोठ्या नरकांमध्यें जातो. ( २९ ) आणि विश्वसादाख्यांत सांगितलें कीं, " सर्वेषामेव " ( अर्थ ) विष्णु वगैरे सर्व देवांचा प्रभु श्रीशिवच सर्व प्राण्यांचें चैतन्य आहे. त्या शिवाच्या स्वरूपाचें ज्ञान करून घेतलें नाहीं; तर अद्वैतज्ञान होईल काय ? कधीहीं होणार नाहीं. हेंच आश्चर्य आहे. ( ३० ) तसेंच पद्मनाभींत ( ग्रंथांत ) सांगितलें कीं " एक एव० " ( अर्थ ) सदा सर्वदा श्रीरुद्र एकच आहे, दुसरा कोणी नाहीं. हेंच अद्वैत ज्ञान होय; दुसरें ज्ञान सर्व व्यर्थ आहे. ( ३१ ) याप्रमाणें वाग्द्वैतनिरसन करून सर्वांगामध्यें लिंगच पूर्ण आहे; असें जाणणारा माहेश्वर केव्हां एकदां आवाहन करून मग केव्हां विसर्जन करावयाचा याचा अवकाश न समजून आवाहन विसर्जन दोन्हीचा निरास केल्यानंतर आव्हान निरसनस्थल सांगतात. ( ३२ ) प्रश्नोपनिषदांत सांगितलें कीं, " यातेतनू " ( अर्थ ) हे प्रभो श्रीशिवा, तुझें शिवलिंग नांवाचें शरीर माझ्या वाणीमध्यें, तें तुझें शरीर माझ्या कानांमध्यें, तें तुझें शरीर नेत्रांमध्यें, तें तुझें शरीर माझ्या मनामध्यें संतत राहून मंगळकर कर. उल्लंघन करूं नको. ( ३३ ) तसेंच सिद्धांतशिखामणींत सांगितलें कीं, " यदा शिव० " ( अर्थ ) जेव्हां एकदा महागुरु शिवकलायुक्त इष्टलिंग देतो, तेव्हांपासून श्रीशिव निरंतर राहतच आहे; पुनः त्याला आव्हान करावयाचें कारण काय ? ( ३४ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं, " सुसंस्कारेषु " ( अर्थ ) चांगल्या तऱ्हेनें संस्कार केलेल्या क्रियादित्रिविध इष्टलिंगाचें ठिकाणीं साक्षात शिव सन्निधानानें युक्तच

सन्निहितः शिवः ॥ तत्राव्हानं न कर्तव्यं प्रतिपत्तिविरोधकं ॥ ३४ ॥ पुनस्तत्रैव ॥ नाव्हानं न विसर्गं च स्वेष्टलिंगे तु कारयेत् ॥ लिंगनिष्ठापरो नित्यमिति शास्त्रस्य निश्चयः ॥ ३९ ॥ किंच ॥ वातुले ॥ वासनाऽऽवाह्यते देवि वासनैव विसर्ज्यते ॥ पारमार्थेन देवस्य नावाहनविसर्जने ॥ ३६ ॥ किंच ॥ तंत्रसारे ॥ कुतो वा नीयते देवि कुतो वा न विसर्ज्यते ॥ स्थूलसूक्ष्मादिभेदेन स हि योगिषु संस्थितः ॥ ३७ ॥ एवं निवृत्ताव्हानविसर्जनोभयवतः माहेश्वरस्याष्टतनुभिराविर्भूतसमस्तप्रपंचो मिथ्येतिज्ञाने सत्यनंतरमष्टमूर्तिनिरसनस्थलमित्युच्यते ॥ ३८ ॥ अन्तर्यामिब्राह्मणोपनिषदि ॥ यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अन्तरोयं पृथिवी न वेद

---

असतो; याकरितां तेथें आव्हान करूं नये. केलें तर अज्ञानमूलक होईल. ( तें अज्ञान समजावें. ) ( ३९ ) पुनः आणखी तेथेंच सांगितलें की, " नाव्हानं० " ( अर्थ ) आपल्या इष्टलिंगाचें ठिकाणीं आव्हान करूं नये, व विसर्जनही करूं नये. शिवभक्तानें निरंतर लिंगनिष्ठापर व्हावें, असा शास्त्राचा निश्चय आहे. ( ३६ ) आणि वातुलगमांत सांगितलें कीं,– " वासना० " ( अर्थ ) हे देवि, वासना आवाहन करते, आणि यासनाच विसर्जन करते. वास्तविक विचार केला तर श्रीशिवाला आवाहन नाहीं; आणि विसर्जन नाहीं. ( ३७ ) आणि तंत्रसारांत सांगितलें कीं, " कुतो वा नीयते० " हे देवि, आवाहन कां करावें बरें? आणि विसर्जन तरी कां करावें बरें? कारण तो शिव स्थूल सूक्ष्म वगैरे भेदांनी शिव योगिजनांच्या हृदयामध्यें ( त्रिविधांगांमध्यें ) नेहमीं राहतो. ( ३८ ) याप्रमाणें आवाहन विसर्जनांपासून निवृत्त झालेल्या ( सोडलेल्या ) माहेश्वराला अष्टमूर्तीनें सृष्टि केलेलें जग खोटें आहे; असें ज्ञान झाल्यानंतर अष्टमूर्तीनिरसनस्थल सांगतात. ( ३९ ) अंतर्यामि ब्राह्मणोपनिषदांत सांगितलें कीं, " यःपृथिव्यां० " ( अर्थ )[1] जो शिव पृथिवीच्या ठिकाणीं राहून पृथिवीच्या ठिकाणीं अंतर्यामी होऊन राहिला आहे. त्या श्रीशिवाला पृथिवी जाणत नाहीं. शिवाचें शरीर पृथ्वी असून तुझ्या अंतर्यामांत असणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव उदकांमध्यें राहून उदकांत ( पाण्यांत ) अंतर्यामी होऊन राहिला आहे. त्या श्रीशिवाला पाणी जाणत नाहीं शिवाचें शरीर पाणी असून तुझ्या अंतर्यामांत असणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव अग्नींत राहून अग्नीच्या अंतर्यामी होऊन राहिला आहे; त्या शिवाला अग्नि जाणत नाहीं ज्याचें शरीर अग्नि असून तुझ्या अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव वायूच्या ठिकाणीं राहून वायूचा अंतर्यामी होऊन राहिला

---

१ ( पाठांतर असल्यामुळें ) सर्व ठिकाणीं त्या त्या तत्वाचा प्रेरक श्रीशिवच आहे, असा एक विशेष अर्थ या वाक्यांत निघतो.

यास्य पृथिवी शरीरं यः पृथिवीमन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥ योऽप्सु तिष्ठन्नद्भ्योऽन्तरोयमापो न विदुर्यस्यापः शरीरं योपोऽन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥ योऽग्नावतिष्ठन्नग्ने रन्तरोयमाग्निर्न वेद दस्याग्निः शरीरं योऽग्निमन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः यो वायौ तिष्ठन् वायोरन्तरोयं वायुर्न वेद यस्य वायुः शरीरं यो वायुमन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः य आकाशे तिष्ठन् आकाशा दन्तरोयमाकाशं न वेद यस्य आकाशं शरीरं यो आकाशमन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥ यश्चंद्रमासि तिष्ठन् चंद्रमसोन्तरोऽयं चंद्रमा न वेद यस्य चंद्रमाः शरीरं यश्चन्द्रमसमन्तरो यमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥ यः सूर्ये तिष्ठन् सूर्यस्यान्तरोऽयं सूर्यो न वेद यस्य सूर्यः शरीरं यस्सूर्यमन्तरोयम्रयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥ य आत्मनि तिष्ठन्नात्मान्तरोयमात्मा न वेद यस्यात्मा शरीरं य आत्मानमन्तरोयमयत्येपत आत्मान्तर्याम्यमृतः ॥३९॥ तथा आदित्यपुराणे ॥ तथा कर्ता कुलालादिर्न घटादिर्न हि स्वयं ॥ भूम्यादिकृत्तदीशानो भूम्यादेरन्य एव हि ॥ ४० ॥ तत्रैव ॥ व्यतिरिक्तः शरीरादेः शरीरी यद्वदिष्यते ॥ तथा मूर्त्यष्टकादन्यो मूर्तिमान् पृथगीश्वरः ॥ ४१ ॥ तथाच स्कांदे ॥ न गंधादिगुणैर्युक्तः क्ष्मादिवद्भगवांश्चिच्छवः

---

आहे; वायु त्या शिवाला जाणत नाहीं शिवाचें शरीर वायु असून अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव आकाशांत राहून आकाशाचा अंतर्यामी होऊन राहिला आहे. त्या शिवाला आकाश जाणत नाहीं. शिवाचें शरीर आकाश असून तुझ्या अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव चंद्राचें ठिकाणीं राहत असून चंद्राचा अंतर्गामी होऊन राहिला आहे. त्या शिवाला चंद्र जाणत नाहीं. शिवाचें शरीर चंद्र असून तुझ्या अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव सूर्याच्या ठिकाणीं राहून सूर्याच्या ठिकाणीं अंतर्यामी होऊन राहिला आहे. त्या शिवाला सूर्य जाणत नाहीं. शिवाचें शरीर सूर्य असून तुझ्या अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. जो शिव जीवाच्या ठिकाणीं राहून जीवाचा अंतर्यामी होऊन राहिला आहे. त्या शिवाला आत्मा जाणत नाहीं. शिवाचें शरीर आत्मा असून तुझ्या अंतर्यामांत राहणारा तो परमात्मा मोक्षस्वरूप आहे. (४०) तसेंच आदित्यपुराणांत सांगितलें कीं, "तथा कर्ता०" ( अर्थ ) घटादिकार्यांचे कर्ते ( मातीची घागर वगैरे करणारे कर्ते ) कुंभार वगैरे असून स्वतः घटादिकच कर्ते होत नाहींत त्याप्रमाणें पृथिव्यादिकांचा कर्ता श्रीशिव असून पृथिव्यादि पदार्थांहून तो भिन्न आहे. ( ४१ ) तेथेंच पुनः सांगितलें कीं,– "व्यतिरिक्तः०" ( अर्थ ) शरीरादि पदार्थांहून शरीर ( जीव ) जसा भिन्न आहे; त्याप्रमाणें आठमूर्तींहून ( पृथिव्यादि अष्टमूर्ती ) मूर्तिमान असा ईश्वर निराळा आहे. ( ४२ ) तसेंच स्कांदपुराणांत सां-

॥ न स्पंदनस्वभावश्च यथैवापस्तथा विभुः ॥ ४२ ॥ यथा ज्वलनवन्नोष्णस्तिरश्चीनो न वायुवत् ॥ नाकाशवत्तथा शब्दः शिवः परमचेतनः ॥ ४३ ॥ चंद्रसूर्याविवाश्रान्तं स्थाणुर्न परिवर्तते ॥ मायागुणादिसंबंधो नात्मवत्परमेशितुः ॥ ४४ ॥ एवं परित्यक्तमूर्त्यष्टकेन माहेश्वरेण शरणपूर्णः शिव इति ज्ञात्वा प्रतिष्ठाप्य जगत्पूर्णः शिव इत्युच्यमानेन सर्वगतशब्दनिरसने कृते सत्यनंतरं सर्वगतनिरसनस्थलमित्युच्यते ॥ ४५ ॥ " बृहदारण्यकोपनिषदि " ॥ अनन्वागस्तः न भवत्यसंगो ह्ययं पुरुषः ॥ ४६ ॥ तथा स्कांदे ॥ असंगो ह्ययमित्येवं ब्रवीति च परा श्रुतिः ॥ तस्मादात्मा तु विज्ञमः कर्मभिर्न स बध्यते ॥ चिद्रूपस्यात्मनः साक्षाद्ब्रह्मतामाह हि श्रुतिः ॥४७॥ किंच शिवगीतायां ॥ कथं सर्वगतत्वं स्याच्छिवस्य परमात्मनः ॥ असंगो ह्ययं पुरुष इत्याह श्रुतिरुन्नता ॥ ४८ ॥ तथा शिवधर्मे ॥ कथं भवेत्सर्वगतः शिवः

---

गितलें कीं " नगंधादि० " ( अर्थ ) पृथ्वी गंध वगैरे गुणांनीं युक्त जशी आहे; त्याप्रमाणें भगवान शिव हा गंधादि गुणांनी युक्त नाहीं. उदकाच्या ठिकाणीं ( पाण्यामध्यें ) स्रवणें हा गुण जसा आहे त्याप्रमाणें प्रभु शिवाच्या ठिकाणीं स्रवणें हा गुण नाहीं, ( ४३ ) " यथाज्वलन " ( अर्थ ) अग्नीच्या ठिकाणीं उष्णता जशी आहे. तसें शिवाच्या ठिकाणीं नाहीं, वायूप्रमाणें तिरकस जाणारा शिव नाहीं; आकाशाप्रमाणें परम चेतन तो शिव शब्द करीत नाहीं. ( ४४ ) " चंद्र सूर्या० " ( अर्थ ) चंद्र सूर्याप्रमाणें विन आयासानें तो शिव फिरत नाहीं; जीवाला मायागुणादिकांचा संबंध जसा आहे; त्याप्रमाणें परमेश शिवाला नाहीं. ( ४५ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें अष्ट मूर्तींचा त्याग केलेल्या माहेश्वरानें शिव हा शरणाच्या ठिकाणीं परिपूर्णपणानें राहिलेला आहे; असें समजून प्रतिष्ठापना करून जगत्पूर्ण शिव आहे, असें बोलत असून त्यानें सर्वगतशब्दनिरसन केल्यानंतर सर्व गतनिरसनस्थल सांगतात. ( ४६ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " अनन्वागस्तः " ( अर्थ ) हा पुरुष असा शिव संगरहित असून संसाराला कारणीभूत अशा कर्मबंधनांनीं युक्त होत नाहीं. ( ४७ ) तसेंच स्कंदपुराणांत सांगितलें कीं " असंगो " ( अर्थ ) हा शिव संगरहित आहे असें परा श्रुति सांगते. याकरितां अपरोक्षगोचर ( समोर दिसणारा ) असा आत्मा कर्मांनीं बद्ध होत नाहीं. चिद्रूप अशा परवस्तूला " विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात् " ही श्रुति परब्रह्मत्व सांगते ( ४८ ) आणि शिवगीतेंत सांगितलें कीं " कथं " ( अर्थ ) परमात्मा शिवाला सर्वगतत्व ( व्यापत्व ) कसें येईल ? कारण " असंगो ह्ययं पुरुषः " ( हा पुरुष जीवाच्या संगतीनें रहित आहे ) असें उच्चस्वरानें श्रुति सांगते. ( ४९ ) तसेंच शिवधर्मांत सांगितलें कीं, " कथं भवेत्सर्वगतः " ( अर्थ ) परमात्मा शिव हा सर्व गत कसा होईल ?

परमपूरुषः ॥ जडं नाशि च सर्वं च चिदानंदघनः शिवः ॥ ४९ ॥ पुनरत एवोक्तं श्रीरुद्रोपनिषदि ॥ या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी ॥ तया नस्तनुवा शंतमया गिरिशंताभिचाकशीहि ॥ ९० ॥ तथैवोक्तं शैवपुराणे ॥ लिंगं शिवा तनूः प्रोक्ता मूर्तिर्घोरतनुः स्मृता ॥ अपापेषु च भक्तेषु तयोर्मध्ये शिवा तनुः ॥ काशते परमेशस्य शिष्टास्ते लिंगधारिणः ॥ ९१ ॥ पुनर्वातुले ॥ अघोरा पापकाशीति या ते रुद्र शिवा तनुः ॥ यजुषा गीयते यस्मात्तस्माच्छैवोऽघवर्जितः ॥ ९२ ॥ किंच ॥ शिवयोगप्रदीपिकायां ॥ नित्यं भाति त्वदीयेषु या ते रुद्र शिवा तनुः ॥ अघोरा पापकाशीति श्रुतिरिह सनातनी ॥९३॥ कारणागमे ॥ वृत्तम् ॥ अपापकाशीति वपुः श्रुतं ते शिष्टाः प्रसिद्धा भगवन्नपापाः ॥ अतस्त्वदीयानपहाय भक्तानन्यानशिष्टानिति निश्चिनोमि ॥ ९४ ॥ एवं निरस्तसर्वगतमाहेश्वरः प्रपंचे शिवव्यतिरिक्ते शिवेन विना प्रपंचस्य भानमेव न स्यादिति ज्ञात्वा तस्मिन् स्थितोऽप्यस्थितैव तिष्ठतीति निश्चये ज्ञाप्यमाने सत्यनंतरं शिवजगन्मयस्थलमित्युच्यते ॥ ९५ ॥

---

कारण सर्व वस्तु जड असून नाशवंत आहे. शिव हा चिदानंदमय आहे. (५०) पुनः याकरितांच श्रीरुद्रोपनिषदांत सांगितलें कीं “ या ते रुद्र शिवा० ” ( अर्थ ) हे रुद्रा, तुझी तनु ( शरीर ) घोररहित असून लिंगरूप आहे. आणि पापरहित भक्तांच्या शरीरांत प्रकाशते. हे कैलासवासी शिवा, त्या लिंगरूपी शरीरानें आह्मांला तेजस्वी कर. ( ५१ ) तसेंच शैवपुराणांत सांगितलें कीं “ लिंगं शिवा० ” ( अर्थ ) शिवा, शिवलिंगाला शिवा तनु असें ह्मणतात, आणि मूर्तीला घोरतनु असें ह्मणतात. या दोहोंमध्यें शिवा तनु ही पापरहित भक्तांच्या शरीरांत प्रकाशते. याकरितां लिंगधारी ते भक्त श्रेष्ठ होत. ( ५२ ) पुनः वातुलांत सांगितलें कीं “ अघोरा० ” ( अर्थ ) हे रुद्रा, तुझी तनु घोररहित असून पापरहित भक्तांच्या हृदयांत जी प्रकाशते; असें यजुर्वेदानें ज्या अर्थी गायिलें आहे: त्या अर्थी लिंगधारी वीरशैव हा पापरहित आहे. ( ५३ ) आणि शिवयोग प्रदीपिकेंत सांगितलें कीं, “ नित्यं० ” ( अर्थ ) हे परशिवा, तुझ्या भक्तांच्या हृदयाकाशांत तुझी शिवा तनु जी प्रकाशते; ती तनु घोररहित असून पापरहित भक्तांना प्रकाशते; ( दिसते ) असें पुरातन श्रुति सांगते. ( ५४ ) कारणागमांत सांगितलें कीं हे परशिवा, पापरहित भक्तांना प्रत्यक्ष प्रकाशणारें तुझें शरीर आहे: असें ऐकिलें आहे. याकरितांच हे भगवन्, पापरहित तुझे भक्त श्रेष्ठ आहेत; असें प्रसिद्ध झालें आहे. ह्मणूनच तुझ्या भक्तांशिवाय इतर मानव अश्रेष्ट ( कमी दर्जाचे ) आहेत: असें मानतों. ( ५५ ) याप्रमाणें माहेश्वरानें सर्वगतत्व निरसन केल्यानंतर शिवव्यतिरिक्त ( शिवरहित ) प्रपंचामध्यें शिवाशिवाय प्रपंचाचें अस्तित्व नाहींसें होईल असें जाणून अशा प्रपंचांत तो माहेश्वर राहून न राहिल्यासारखाच आहे; असें समजल्यानंतर शिवजगन्मयस्थल सांगतात.

" मुण्डकोपनिषदि " ॥ ब्रह्मैवेदममृतं पुरस्तात्पश्चाद्दक्षिणतश्चोत्तरेणाधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठं ॥ ५६ ॥ किंच ॥ " उत्तरतापनीयोपनिषदि ॥ " सर्वगो ह्येष ईश्वरः क्रियाज्ञानात्मा सर्वं शर्वमयं हि सर्वे जीवाः शर्वमयाः ॥ ५७ ॥ " तथा श्वेताश्वतरोपनिषदि दृत्तम् " ॥ परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥ न तस्य कश्चित्पतिरस्ति लोके न चेशिता नैव च तस्य लिंगं ॥ ५८ ॥ तथा च वायुपुराणे ॥ शिवेनाधिष्ठितं यत्स्याज्जगत्सर्वं चराचरं ॥ शुद्धा स्वाभाविकी तस्य शक्तिः सर्वातिशायिनी ॥ ५९ ॥ किंच ॥ अमृतबिंदूपनिषदि ॥ एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः ॥ एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् ॥६० ॥ तथैवोक्तं योगशास्त्रे ॥ एक एव हि भूतात्मा देहे देहे व्यवस्थितः ॥ एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् ॥ ६१ ॥ किंच सौरपुराणे ॥ सर्वोपाधिविनिर्मुक्तं चैतन्यं सर्वगं शिवं ॥ तदेवेदं च विश्वं हि तस्मादन्यं न विद्यते ॥ ६२ ॥ एवं शिव एव जगद्रूपजगद्व्यतिरिक्तरूपद्वयसमर्थ इति मत्वा तं शिवं

---

( ५६ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं,— " ब्रह्मै० " ( अर्थ ) मोक्षस्वरूप ब्रह्मच हें प्रपंच आहे. पुढें, मागें, उजवीकडे, डावीकडे, वर, खालीं परब्रह्मच व्यापिलेलें आहे. अर्थात हें जग श्रेष्ठ आहे. ( ५७ ) आणि उत्तरतापनीयोपनिषदांत सांगितलें कीं,— " सर्वगो० " ( अर्थ ) क्रियाज्ञानस्वरूप हा ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे. सर्व हें जग शिवमय आहे. सर्व जीव शर्वमय आहेत. ( ५८ ) तसेंच श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " परास्य० " ( अर्थ ) ज्ञानबल क्रियास्वरूप शक्ति ही शिवाची अधिक असून स्वाभाविक आहे; असें ऐकिलें आहे. त्या शिवाचा प्रभु जगांत कोणी नाहीं. आणि त्या शिवावर सत्ता कोणाचीही नाहीं. त्याला ( शिवाला ) कोणतेंही चिन्ह नाहीं. ( ५९ ) तसेंच वायुपुराणांत सांगितलें कीं,— " शिवेनाधि० " ( अर्थ ) जीव जडरूप या जगामध्यें जो शिव व्यापिलेला आहे; त्या शिवाची शक्ति स्वभावसिद्ध असून सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे. ( ६० ) आणि अमृतबिंदूपनिषदांत सांगितलें कीं;— " एक एव० " ( अर्थ ) सर्व प्राण्यांमध्यें असणारा शिव हा एकटाच प्रत्येक प्राणीच्या शरीरांत राहिला आहे. तो शिव एकटा असून पाण्यांतल्या चंद्रबिंबाप्रमाणें अनेक दिसतो; एकही दिसतो. ( ६१ ) तसेंच योगशास्त्रांत सांगितलें कीं, " एक एव० " ( अर्थ ) भूतांतर्यामी शिव हा एकच असून दरएक देहामध्यें राहिला आहे. त्यामुळें पाण्यांतल्या चंद्रबिंबाप्रमाणें अनेक दिसतो; आणि एकही दिसतो. ( ६२ ) आणि सौरपुराणांत सांगितलें कीं,— " सर्वोपाधि० " ( अथ ) सर्व उपाधींनी रहित असें शिव चैतन्य सर्वत्र व्याप्त आहे. असें तें जग हेंच होय. त्याच्याशिवाय दुसरें नांहीं. ( ६३ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें शिव हा जगद्रूप असून जगाव्यतिरिक्त रूपाचा आहे; असें जाणून त्या शिवाला आपल्या

स्वस्मिन्नालिंग्य स्थितमाहेश्वरे तथाविधः शिवः भक्तदेहिकदेहः सन् स्थितभेदो यथेत्याकांक्षायामनंतरं भक्तदेहिकलिंगस्थलमित्युच्यते ॥ ६३ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ उक्तं ॥ अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः ॥ स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महांतं ॥ ६४ ॥ तथा शिवरहस्ये ॥ शिवांगं शरणः साक्षाच्छरणांगं शिवो भवेत् ॥ शिवास्यं शरणः साक्षाच्छरणास्यं शिवो भवेत् ॥ ६५ ॥ किंच शिवसूत्रे ॥ लिंग एवेशिते यद्वच्छिवः सर्वगतोऽपि सन् ॥ तथा भक्तजनेष्वेव शिवताव्यक्तिरिष्यते ॥ ६६ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे माहेश्वरस्थलं नाम द्वितीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

ठिकाणीं आलिंगन देऊन राहिलेल्या त्या माहेश्वराच्या ठिकाणीं तशा तऱ्हेचा तो शिव भक्तांच्या देहाप्रमाणें देहाचा होऊन अभेदभावानें कसा राहिला? अशी आकांक्षा आली तर भक्तदेहकलिंगस्थल सांगतात. ( ६४ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " अपाणिपादो० " ( अर्थ ) हातपाय नसून मोठा पळणारा आहे; आणि धरावयास प्रयत्न केलें तर सांपडतो; डोळे नसून पाहतो; कान नसून ऐकतो; जाणावयाची वस्तु तो जाणतो. त्याला जाणणारा कोणी नाहीं. असा तो पुरुष मोठा असून श्रेष्ठ आहे; असें सांगतात. भक्तांचे हात पाय कान डोळे यांनी धरणें चालणें फेकणें पाहणें वगैरे धर्म शिवाचें आहेत असें तात्पर्य आहे. ( ६५ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं,— " शिवांगं० " शिवाचें शरीर शरण असून शरणाचें शरीर साक्षात शिव आहे. शिवाचें मुख शरण असून शरणाचें मुख साक्षात शिव आहे. ( ६६ ) आणि शिवसूत्रांत सांगितलें कीं, " लिंग० " ( अर्थ ) शिव हा सर्वत्र व्याप्त जरी आहे; तरी प्रभु अशा लिंगाच्या ठिकाणीं जसा शिव आहे; तसा भक्तजनांमध्येंही शिव हा सन्निहित होऊन राहिला आहे.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य तोंटदार्यानें रचलेल्या परमशिवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारांतील माहेश्वरस्थल नांवाचें दुसरें प्रकरण संपलें.

# तृतीयं प्रकरणम्.

॥ श्री शिवाय नमः ॥ एवं माहेश्वरस्थले आचारमनुष्ठाय भक्तलिंगकाययोः सामरस्यवान्महात्मा तदनंतरं सावधानसुखेनानुष्ठानभेदो यथेत्याकांक्षायामनंतरं प्रसादिस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ जाबालोपनिषदि ॥ रुद्रेणात्तमश्नंति रुद्रेण पीतं पिबंति रुद्रेणाघ्रातं जिघ्रंति ॥ २ ॥ तथा स्कांदे ॥ शिष्टाः शान्ताश्च रुद्रेण भुक्तमेव हि भुंजते ॥ घ्रातमेव हि जिघ्रंति पीतमेव पिबंति च ॥ ३ ॥ किंच " छांदोग्योपनिषदि " ॥ आहारशुद्धौ सत्वशुद्धिः सत्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः ॥ स्मृतिलाभे सर्वग्रंथीनां विमोक्षः ॥ ४ ॥ " बृहदारण्यकोपनिषदि " ॥ यदन्नं पुरुषोऽश्नुते तदन्नं तस्य देवता ॥ ५ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ जगज्जीवेश्वराणां तु त्रयाणां तत्वनिर्णयः ॥ उच्छिष्टान्नप्रसादेषु त्रिषु निर्णयते क्रमात् ॥ ६ ॥ शरीरादि जगद्रूपमुच्छिष्टं भ्रांतिलक्षणं ॥ अन्नं तदभिमानी स्याज्जीवः संसारलक्षणः ॥ प्रसाद ईश्वरः साक्षात्सच्चिदानंदलक्षणः ॥ ७ ॥ वृत्तम् ॥ प्रसाद आद्यन्तविवर्जितः स्वयं ह्यखण्डरूपः परि-

---

# तिसरें प्रकरण.

॥ श्रीशिवायनमः ॥ १ ॥ " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें माहेश्वरस्थलामध्यें आचाराचें अनुष्ठान करून भक्तलिंग शरीरांमध्यें सामरस्य करणारा महात्मा त्यानंतर सावधानानें निरनिराळें अनुष्ठान कसें करतो; अशी आकांक्षा आल्यानंतर प्रसादिस्थल सांगतात. ( २ ) जाबालोपनिषदांत सांगितलें कीं, " रुद्रेणात० " ( अर्थ ) श्रेष्ठ लोक श्रीशिवानें स्वीकारलेलें अन्नच खातात; श्रीशिवानें पान केलेलें पीतात; श्रीशिवानें वास घेतलेल्या पदार्थांचा वास आपण वास घेतात. ( ३ ) शिष्ट व शांत असे सज्जन श्रीशिवाला दाखविलेला नैवेद्य भोजन करतात' व श्रीशिवास अर्पण केलेल्या सुवासिक पदार्थांचा वास घेतात व श्रीशिवास अर्पण केलेल्या पेय पदार्थांचें पान करतात. ( ४ ) छांदोग्योपनिषदामध्यें सांगितलें कीं, " आहार शुद्धौ० " ( अर्थ ) आहाराची शुद्धि झाली असतां सत्वशुद्धि होते; ( अंतः करण शुद्ध होतें ) सत्वशुद्धि झाली असतां स्मृति लाभ होतो. स्मृतीचा लाभ झाला असतां सर्व ग्रंथीचा ( अज्ञानाचा ) नाश होतो. (५) बृहदारण्यकोपनिषदामध्यें सांगितलें कीं, " यदन्नं० " ( अर्थ ) पुरुष जें अन्न खातो; तें प्रसादान्न त्याची देवता होय. ( ६ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं,— " जगज्जीवेश्वराणां० " ( अर्थ ) जग, जीव, ईश्वर या तिघांच्या तत्वांचा निर्णय अनुक्रमानें उच्छिष्ट, अन्न, प्रसाद यां तीन पदार्थांमध्यें होतो. ( ७ ) " शरीरादि० " ( अर्थ ) भ्रांतिलक्षणात्मक शरीरादि जगद्रूप हें उच्छिष्ट आहे. त्याचा ( शरीराचा ) अभिमानी संसारलक्षणाचा जीव हा अन्न होय. सच्चिदानंद लक्षण परमेश्वर हा प्रसाद होय. ( ८ ) " प्रसाद० " ( अर्थ ) प्रसाद हा आद्यंतरहित असून स्वतः अखंडरूप आहे. याचें

शेपलक्षणः ॥ विकल्पहीनः सुविशुद्धवत्स्थितः प्रभाव एषोऽस्य निजस्वभावजः ॥८॥ लीयते द्रव्यमन्नादि यत्र यद्गम्यते यतः ॥ प्रसादत्वेन तल्लिंगं प्रसादस्त्वत एव सः ॥ ९ ॥ अर्चनाद्वारतो लिंगमर्पणद्वारतः स्वयं ॥ प्रसाद इति भक्तयायं एक एवोपचर्यते ॥ १० ॥ अन्नं पदार्थरूपं तत्करणं कल्पना समाख्याता ॥ अर्पणमन्नविलोपो ह्यादानं ग्रहणमित्यतो विद्धि ॥ ११ ॥ वृत्तं ॥ यद्भाजनस्थं विनिवेद्यमानमन्नादिकं भाण्डगतं तदंशं ॥ लिंगार्पितं भाजनसुस्थितं चेद्भाण्डस्थितं चैव समर्पितं स्यात् ॥ १२ ॥ घृतात्मकं यन्नवनीतमाद्यं प्रतापितं वन्हिमुखे निजं स्यात् ॥ यथा तथा लिंगमुखार्पितं यद्भवेत्प्रसादात्मकमन्नमाद्यं ॥ १३ ॥ रौप्ये यथालोकय शुक्तिकायां लुप्ते स्वयं शिष्यत एव या सा ॥ तद्वत्प्रसादस्य पदार्थभावे लुप्ते

---

लक्षण परिशेप आहे; व विकल्परहित असून उत्तम शुद्ध आहे. याचा प्रभाव स्वाभाविक आहे. ( ९ ) " लीयते० " ( अर्थ ) ज्या लिंगामध्यें अन्न वगैरे पदार्थ लीन होत असून त्याच ठिकाणीं जातात. याकरितां प्रसादत्वानें तें शिवलिंग आहे; ह्मणून त्याला प्रसाद ह्मणतात. ( १० ) " अर्चना० " ( अर्थ ) पूजेला द्वार असल्यामुळें त्याला लिंग असें ह्मणतात अर्पणाला द्वार असल्यामुळें त्याला प्रसाद असें ह्मणतात. ( हा प्रसाद एकच त्याला औपचारिक नांव आहे. ) ( ११ ) " अन्नं० " ( अर्थ ) अन्न हें पदार्थरूप असून त्याचें करणें ( अन्न करणें ) ही कल्पना ह्मणून सांगितलें आहे. त्याचें अर्पण केल्यानंतर अन्नाचा लोप होतो; नंतर त्याला अर्पण असें नांव येतें. त्याचें आदान ( अर्पण ) करण्यांत येत असल्यामुळें त्याला ग्रहण असें ह्मणतात. याकरितां तूं हें जाण. ( १२ ) " यद्भाज० " ( अर्थ ) लिंगभाजनामध्यें असलेली व इष्टलिंगास समर्पण केलेली जी अन्नादि वस्तु असेल, त्यां वस्तूंतला भाग भांडामध्यें असेल तर त्याचाच अंश होईल. ( ह्मणजे शिवाला नैवेद्य दाखविण्याकरितां एखाद्या शिवपात्रांत अन्नादिक पदार्थ आणल्यानंतर बाकी स्वयपाकाच्या भांडींत राहिलेला पदार्थही त्यानैवेद्याचा अंशच होतो. त्याला अन्न असें ह्मणूं नये. असें तात्पर्य आहे. ) शिव भाजनामध्यें असलेला पदार्थ इष्टलिंगाला अर्पण केल्यानंतर भांडींत असलेला पदार्थही अर्पण केल्याप्रमाणेंच आहे; असें समजावें. ( १३ ) " घृतात्मकं० " ( अर्थ ) घृतस्वरूप असलेलें लोणी एकदां अग्नीवर ठेवून तापविल्यानंतर पुनः तें लोणी होऊं शकेल काय? त्याप्रमाणें एकदां शिवलिंगाला पदार्थ अर्पण केल्यानंतर त्या प्रसादाला पुनः अन्न असें नांव येईल काय? ( १४ ) " रौप्ये० " ( अर्थ ) शुक्तिकेच्या ठिकाणीं ( शिंपीच्या ठिकाणीं ) असलेलें रौप्यरूपीं भ्रमात्मक ज्ञान लुप्त झाल्यानंतर खरें ज्ञानच राहून जसें जातें, तसें पदार्थ भावाचा लोप झाल्यानंतर बाकी त्या ठिकाणीं प्रसाद भावच कायम राहतो. ( शिंपीला अज्ञानानें रुपें असें अगोदर भ्रांतीनें ह्मणत असतो; पुढें शिंपच आहे

स्वयं शिष्यत एव वस्तु ॥ १४ ॥ नोच्छिष्टभावो न निषिद्धभावः साक्षात्प्रसादे परमे पवित्रे ॥ भोगे प्रसादस्य कृतं श्रृणु त्वं भुक्ते च तस्मिन्न हि संभवोऽस्य ॥१५॥ प्रसाद उच्छिष्टनिषिद्धभावो घटेत चेन्नैव भवेत्प्रसादः ॥ अभावतश्चास्य न चास्ति लिंगं गुरुर्न चास्ति क्रमतो निपातः ॥ १६ ॥ रोगार्थमौषधं सेव्यं दोषार्थं चात्मनस्तथा ॥ सेव्यः शिवप्रसादोऽयमिति शैवी परा स्थितिः ॥ १७ ॥ वृत्तम् ॥ असंस्कृतात्मेंद्रियभूतकायैरलिंगिभिः स्वार्थपरैः सकामैः ॥ दृष्टं श्रुतं स्पृष्टमथोपभुक्तं घ्रातंयदुच्छिष्टमिति प्रसिद्धं ॥ १८ ॥ अतींद्रियैरविषयैरकामैः षट्स्थलात्मभिः ॥ यद्भुक्तं तद्धि नोच्छिष्टं न निषिद्धं न दूषितं ॥ १९ ॥ वृत्तम् ॥ आचाराह्वयलिंगमस्य वपुरात्मा गौरवं लिंगकं प्राणः स्याच्छिवलिंगमिंद्रियसमूहस्तद्धदेव स्वयं ॥ प्रोक्तं यच्चरलिंगमेषविषयप्रासादलिंगं तथा तृप्तिः षट्स्थलरूपिणस्तव

---

असें कळल्यानंतर पुनः तिला रूपें असें आपण ह्मणूं काय? त्याप्रमाणें एकदां शिवलिंगाला अन्नादिक वस्तु अर्पण केल्यानंतर त्या प्रसादाला अन्न असें कधींही नांव येत नाहीं. ) ( १५ ) " नोच्छिष्टभावो० " ( अर्थ ) श्रेष्ठ व पवित्र अशा प्रसादाच्या ठिकाणीं उच्छिष्ट भाव नाहीं; व निषेध भावही नाहीं. प्रसादाचा उपभोग केल्यानंतर व प्रसाद जेवल्यानंतर त्या प्रसादाच्या ठिकाणीं उच्छिष्ट भाव उत्पन्न होत नाहीं. हें खरें आहे; तें ऐकून हृदयांत ठेव. ( १६ ) " प्रसाद० " ( अर्थ ) प्रसादाच्या ठिकाणीं उच्छिष्ट भाव आणि निषेध भाव संभवत असेल तर तो प्रसादच होत नाहीं. ज्याला प्रसादाचा अभाव असेल; त्याला लिंग नाहीं; आणि गुरु नाहीं. अर्थात क्रमानें त्याला गुरु, लिंग जंगमांचा अभाव असल्यामुळें नरक प्राप्ति होते. ( १७ ) " रोगार्थं० " ( अर्थ ) रोग जाण्याकरितां औषधाचें सेवन करावें; तसें आपले दोष ( पाप ) जाण्याकरितां शिवप्रसाद घ्यावा; अशी श्रेष्ठ शिवभक्तांची स्थिति आहे. (१८) " असंस्कृता० " ( अर्थ ) आत्मा, इंद्रियें, भूत ( पंचमहाभूत ) शरीर यांचा संस्कार ( दीक्षा ) ज्यानीं केला नाहीं; अशा स्वार्थपरायण कामुक अलिंगि लोकांनीं जें पाहिलें असेल; जें ऐकिलें असेल; ज्याचा स्पर्श केला असेल; ज्याचा उपभोग घेतला असेल; ज्याचा वास घेतला असेल, ते सर्व पदार्थ उच्छिष्ट आहेत, असें प्रसिद्ध आहे. ( १९ ) " अतींद्रियै० " ( अर्थ ) इंद्रियांचें उल्लंघन केलेलें, ( इंद्रिय ताब्यांत ठेवलेलें ) विषयापासून दूर असलेलें, इच्छेचा त्याग केलेलें, षट्स्थल स्वरूप ( षट्स्थल ब्रह्मीं माहेश्वर ) अशा महात्म्यांनीं जेवलेलें तें उच्छिष्ट नव्हे, निषिद्ध नव्हे; व दूषितही नव्हे. ( २० ) " आचारा० " ( अर्थ ) हें तुझें षट्स्थल स्वरूपी शरीर आचारलिंग होय, तुझा आत्मा गुरुलिंग होय; तुझे प्राण शिवलिंग होय. तसेंच तुझीं इंद्रियें चरलिंग होय. हे तुझे विषय प्रसादलिंग होय. तसेंच तुझी तृप्ति महालिंग होय. असें

किमाचक्षे महालिंगकं ॥ २० ॥ मुसलोलूखलचुल्लीघटेक्षुतिलयंत्रमुखसमुद्भूतं ॥ न किमपि दूष्यति लोके दूष्यति गुरुलिंगजंगममुखोत्थं ॥ २१ ॥ अत्र तंत्रान्तरे ॥ स्त्रीभिः सहैव भुंजन्ते न दोष इति मानवाः ॥ मद्भक्तानां प्रसादान्नं न गृण्हंति दुरात्मनः ॥ २२ ॥ आर्या ॥ ओदनसूतकमादावन्ते चोच्छिष्टसूतकं द्वितयं ॥ हित्वा शिवप्रसादं भुनक्ति यस्स प्रसादवान्भवति ॥ २३ ॥ सूतकं पातकं प्रोक्तं पातकं किल्विषं महत् ॥ तस्मात्सूतकमाद्यं तं हित्वा भोगं समाचरेत् ॥ २४ ॥ आचारेण च गुरुणा शिवेन चरमूर्तिना प्रसादेन ॥ महता घ्रातं पीतं दृष्टं स्पृष्टं श्रुतं स्मृतं भज स्वमतं ॥ २५ ॥ वृत्तं ॥ भाण्डो देही भाजनं चेंद्रियाणि जीवात्मायं द्रव्यरूपो यदन्नं ॥ भक्त्या लिंगायार्पयित्वा परस्मै शेषीभूतं तं प्रसादं भजस्व ॥ २६ ॥ योगजागमे ॥ स सुखज्ञः स योगीशः स एवागमतत्ववित् ॥ शिवार्पितधिया स स्वेष्विंद्रियेषु य आचरेत् ॥ २७ ॥ शिवरहस्ये ॥ लिंगार्पितपदार्थैस्तु

---

सांगितलें आहे. आतां यांत विशेष काय सांगूं? (२१) "मुसलो०" (अर्थ) मुसळ, उखळ, चूल, कुंभाराचें यंत्र, उसाचा रस काढण्याचें यंत्र, तिळाचा घाणा यांच्या तोंडांत दिलेले ते ते पदार्थ लोकांत दूषित होतात काय? मग गुरु, लिंग, जंगम यांच्या तोंडांत उद्भवलेलें उच्छिष्ट होतें असें मूर्ख लोक मात्र ह्मणतात. (२२) याविषयीं तंत्रांतरांत सांगितलें कीं,– "स्त्रीभिः" (अर्थ) दुष्ट मानव आपल्या बायकांबरोबर बसून जेवतात, परंतु तें उच्छिष्ट ह्मणत नाहींत. परंतु ते नीच लोक माझ्या भक्तांचें प्रसादान्न मात्र उच्छिष्ट बुद्धीनें घेत नाहींत. (२३) "ओदन०" (अर्थ) प्रथम आणि शेवटीं अन्नाचें सूतक आणि उच्छिष्ट सूतक हें दोन सोडून शिवप्रसाद जो घेतो; तो प्रसादी होतो. (२४) "सूतकं०" (अर्थ) सूतक हें पातकांत गणिलें आहे. पातक ह्मणजे मोठें किल्बिष होय. याकरितां प्रथम शेवटीं सूतकें दोन्हीं सोडून निवळ प्रसादाचें सेवन करावें. (२५) "आचारेण०" (अर्थ) आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, चरलिंग, प्रसादलिंग, महालिंग यांनीं वास घेतलेला पदार्थ, पान केलेला पदार्थ, पाहिलेला पदार्थ, स्पर्श केलेला पदार्थ, ऐकिलेला पदार्थ, स्मरण केलेला पदार्थ हे सर्व षट्स्थल स्वरूप आहेत; असें समजून स्वीकार कर. (२६) "भांडो०" (अर्थ) देही, (जीव) भांड; भाजन (शिवपात्र) इंद्रिय, जीवात्मा, आणि द्रव्यरूप अन्न हे सर्व भक्तीनें श्रेष्ठ इष्टलिंगाला अर्पण करून राहिलेला पदार्थ तो प्रसाद आहे; असें समजून त्याचा स्वीकार कर. (२७) योगजागमांत सांगितलें कीं, "स सुखज्ञः" (अर्थ) आपापल्या इंद्रियांच्या ठिकाणीं शिवार्पण बुद्धीनें जो आचरण करील, तो सुख जाणणारा होय, तो योगीश्वर होय, तोच आगमांतील तत्वें जाणणारा होय. (२८) शिवरहस्यांत सांगितलें कीं, "लिंगार्पित०" (अर्थ) इष्टलिं-

संभोगी लिंगसंयुतः ॥ अनर्पितपरित्यागी प्रसादीति निगद्यते ॥ २८ ॥ तत्रैव ॥ पूजका बहवः संति भक्ताः शतसहस्रशः ॥ मत्प्रसादस्य योग्यास्तु द्वित्रयो नैव पंचषट् ॥ २९ ॥ एवं गुरुलिंगजंगमानां प्रसन्नप्रसादस्वीकर्तुः प्रसादिनोऽङ्गालिंगितगुरुमाहात्म्यं यथेत्याकांक्षायामनंतरं गुरुमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ३० ॥ अथर्वणवेदे ॥ कदंबगोलकाकारो विश्वस्यातिहितः वपुर्धत्ते जगद्धितार्थं वेदादि निगमैः प्रणवादिमंत्रैः क्रियादिकर्मणे आत्मायं बोधः स रुद्रः स चरः द्विभुजः द्व्यक्षः द्विपादेकशिरा एको रुद्र आचार्यरूपः ॥ ३१ ॥ तथाच वीरागमे ॥ ललाटलोचनं चांद्रीं कलामपि च दोर्द्वयं ॥ अन्तर्निधाय वर्तेऽहं गुरुरूपो महेश्वरि ॥३२॥ लैंग्ये ॥ स्पर्शादप्यधिकं मन्ये गुरुपादसरोरुहं ॥ स्पर्शश्च कुरुते स्वर्णं गुरुरात्मसमं हि तत् ॥ ३३ ॥ एवं सर्वांगेषु गुरुमाहात्म्यस्थिरीकृतप्रसादिनो मनसि स्थिरी-

---

गानें युक्त असलेला मानव इष्टलिंगाला अर्पण केलेल्या पदार्थांचा उपभोग घेत असून अर्पण केलेल्या पदार्थांचा त्याग करील तर तो प्रसादी, म्हणवितो. ( २९ ) तेथेंच सांगितलें कीं, " पूजका० " ( अर्थ ) पूजा करणारे पूजारी पुष्कळ आहेत, भक्त, हजारों लक्षावधि आहेत, परंतु माझ्या प्रसादाला योग्य असे दोघे किंवा तिघे किंवा पांच सहा आहेत किंवा नाहींत, हें समजत नाहीं. ( ३० ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें गुरुलिंग जंगमांच्या प्रसंन स्वरूप प्रसादाचा स्वीकार करणाऱ्या प्रसादीच्या अंगाला आलिंगन दिलेलें गुरूचें माहात्म्य कसें आहे? ( गुरूचें माहात्म्य ऐकिलेल्या प्रसादीला ) अशी आकांक्षा आली तर गुरु माहात्म्यस्थल सांगतात. ( ३१ ) अथर्वण वेदांत सांगितलें कीं, " कदंब गोलकाकारो० " ( अर्थ ) कळंबाच्याकळीप्रमाणें गोलाकार असलेला जगाला अतिशय हितकर, असा तो एकटा रुद्र वेदादि आगमांनी व प्रणवादि मंत्रांनी क्रियादिकर्मांकरितां ( क्रियादि दीक्षाकर्मांकरितां ) आत्मस्वरूप असून ज्ञानस्वरूप असून जगाच्या हिताकरितां शरीर धारण करतो. तोच जंगम होय. त्याला दोन पाय असून दोन हात असतात. दोन डोळे असतात. असा तो एकटा रुद्र आचार्यरूप आहे. ( ३२ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " ललाट० " ( अर्थ ) हे पार्वति, कपाळावरचा डोळा, चंद्राची कोर, दोन हात हे सर्व आंत आच्छादन करून घेऊन गुरूच्या रूपानें मी संचार करतों. ( ३३ ) लिंगपुराणांत सांगितलें कीं, " स्पर्शादप्यधिकं० " ( अर्थ ) परिसापेक्षां गुरुपाद कमल अधिक आहे; असें मी मानतों. कारण परिस लोहाचें सोनें करतें: आणि गुरूचें पाय आपल्यासारखें ( शिवस्वरूप ) करतात. ( ३४ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें सर्वांगामध्यें गुरु माहात्म्य स्थिर केलेल्या प्रसादीच्या मनामध्यें लिंगमाहात्म्य स्थिर कसें व्हावें ? अशी आकांक्षा केली असतां लिंगमाहात्म्य-

कृतलिंगमाहात्म्यं यथेत्याकांक्षायामनंतरं लिंगमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ३४ ॥ सामवेदे ॥ यस्यान्तःस्थानि भूतानि यस्मात्सर्वं प्रवर्तते ॥ यमाहुस्तत्परं तत्वं स देवः स्यान्महेश्वरः ॥ ३५ ॥ तथैवोक्तं ब्रह्माण्डपुराणे ॥ चराचरात्मकमिदं यत्र विश्वं विलीयते ॥ उत्पद्यते यतो भूयस्तल्लिंगं परमिष्यते ॥ ३६ ॥ किंच वीरागमे ॥ लिंगमध्ये जगत्सर्वं त्रैलोक्यं सचराचरं ॥ लिंगबाह्यं परं नास्ति तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥ ३७ ॥ एवं मनसि स्थिरीकृतलिंगमाहात्म्यवतः प्रसादिनः ज्ञानांतरावस्थितजंगममाहात्म्यं यथेत्याकांक्षायामनंतरं जंगममाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ३८ ॥ " छांदोग्योपनिषदि " ॥ आत्मैवेदं सर्वमिति स वा एष एतं पश्यन्नेतं मन्वान एतं विजानन् आत्मरतिरात्मक्रीड आत्ममिथुन आत्मानंदः स स्वराट् भवति तस्य सर्वेषु लोकेषु कामचरो भवति ॥ ३९ ॥ यजुर्वेदे ॥ देवानां देवो अतिथिः ॥ ४० ॥ किंच ऋग्वेदारण्ये ईश्वरोऽतिथिरिव चरतो तदीहाहस्म ॥४१॥

---

स्थल सांगतात. ( ३५ ) सामवेदांत सांगितलें कीं, " यस्यांतःस्थानि० " ( अर्थ ) ज्याच्या पोटांत सर्व प्राणी राहत असून ज्याच्यापासून या जगाची सृष्टि होते; आणि ज्याला परतत्व म्हणतात; तो देव साक्षात् तूं महेश्वरच होय. ( ३६ ) तसेंच ब्रह्मांडपुराणांत सांगितलें कीं, " चराचरा० " ( अर्थ ) जीवजडस्वरूप हें जग ज्या ठिकाणीं लीन होतें; आणि पुनः ज्यापासून उत्पन्न होतें; तें श्रेष्ठ शिवलिंग परतत्व होय. ( ३७ ) आणि वीरागमांत सांगितलें कीं, " लिंगमध्ये० " ( अर्थ ) चराचर सर्व जग शिवलिंगामध्यें लीन होतें. शिवलिंगाच्या बाहेर कांहींही नाहीं. याकरितां शिवलिंगाची पूजा करावी. ( ३८ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें लिंगमाहात्म्य मनामध्यें स्थिर केलेल्या प्रसादीच्या ज्ञानामध्यें स्थिर होऊन राहिलेलें जंगम माहात्म्य कसें; अशी आकांक्षा आली तर जंगममाहात्म्यस्थल सांगतात. ( लिंगमाहात्म्यज्ञान पूर्णपणें संपादन केलेल्या प्रसादीनें आपल्या ज्ञानानें जंगम माहात्म्य कसें स्थिर केलें असेल, अशी कल्पना आली तर जंगम माहात्म्यस्थल सांगतात. ) ( ३९ ) छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं, " आत्मैवेदं० " ( अर्थ ) हें सर्व जग परब्रह्मच आहे, असें जाणून तें परब्रह्मस्वरूप जंगमच आहे; असें पाहणारा महात्मा याच परतत्वाचें चिंतन करीत, व याच परतत्वाचा साक्षात्कार करीत आणि परतत्वाच्या ठिकाणीं रति ( प्रेम ) ठेवून परमात्म्याशींच क्रीडा करीत परतत्वच सुख देणारें आहे, असें समजून त्या आत्म्याच्या आनंदांतच निमग्न होईल तर तो महात्मा जंगमस्वरूपी सुखाचा अधिपति होतो; आणि तो सर्व लोकांमध्यें निर्विघ्नपणें मनसोक्त संचार करतो. ( ४० ) यजुर्वेदांत सांगितलें कीं, " देवानां० " ( अर्थ ) तिथ्यादि नियमरहित असा तो महात्मा जंगम ब्रह्मादि देवांचा स्वामी होय. ( ४१ ) आणि ऋग्वेदांत सांगितलें कीं, " ईश्वरोऽतिथिरिव० " ( अर्थ ) ईश्वरच जंगमलिंग होऊन

तथैवोक्तं वीरागमे ॥ सर्वलोकोपकाराय यो देवः परमेश्वरः ॥ चरत्यतिथिरूपेण नमस्ते जंगमात्मने ॥ ४२ ॥ एवं जंगममाहात्म्यं ज्ञात्वा तत्प्रसादं स्वीकृत्य सुखीभूतप्रसादिनः सदाचारवर्तनेन दृश्यमानभक्तमाहात्म्यं कथमित्याकांक्षायामनंतरं भक्तमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ४३ ॥ "बृहदारण्यकोपनिषदि" ॥ शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति ॥ ४४ ॥ तथा वीरागमे ॥ मद्भक्तजनमाहात्म्यं को वा जानाति तत्वतः ॥ जानेऽहं त्वं च जानासि नंदी जानाति वा गुहः ॥ ४५ ॥ किंच ॥ शिवधर्मोत्तरे ॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वाप्यंत्यजोऽपि वा ॥ शिवभक्तः सदा पूज्यः सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ ४६ ॥ वीरागमे ॥ पातके समनुप्राप्ते शिवभक्तगृहं व्रजेत् ॥ याचयेदन्नममृतं तदलाभे जलं पिबेत् ॥ ४७ ॥ एवं भक्तत्वेन भूतमाहात्म्यं स्वगतत्वेनाभिन्नं सत् प्रसादिनः बाह्याभ्यंतरयोः परिणामप्रवेशभूतपरमानंदमाहात्म्यं कथमित्याकां-

---

संचार करतो. असा अर्थ येथें सांगितला आहे. ( ४२ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, "सर्वलोकोपकाराय" ( अर्थ ) सर्व लोकांच्या उपकाराकरितां तो देव परमेश्वर अतिथीच्या रूपानें ( जंगमाच्या रूपानें ) संचार करतो. त्या जंगमस्वरूपी तुला नमन असो. ( ४३ ) "एवं०" ( अर्थ ) याप्रमाणें जंगममाहात्म्य जाणून जंगमाचा प्रसाद घेऊन सुखी झालेल्या प्रसादीच्या सदाचाराच्या वर्तनानें दिसणारें भक्तमाहात्म्य कसें असतें; अशी आकांक्षा आली असतां भक्तमाहात्म्यस्थल सांगतात. ( ४४ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, "शांतो दांत०" ( अर्थ ) शम ( शांति ) गुणानें युक्त, दमगुणानें युक्त, ( इंद्रियनिग्रह केलेला ) विषयोपभोगापासून पराङ्मुख झालेला क्षमाशील असलेला, एकाग्रचित्त झालेला, महात्मा आपल्यांत ठिकाणीं परवस्तु पाहून सर्व जगाला आपल्यासारखेंच ( परब्रह्मस्वरूपच ) पाहतो. ( ४५ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, "मद्भक्त०" ( अर्थ ) हे पार्वति, माझ्या भक्तांचें माहात्म्य खऱ्या रीतीनें कोण जाणतो? मी एक जाणतो; तूं एक जाणतेस, नंदी सध्या जाणतो, षण्मुख जाणतो किंवा नाहीं, हें संशय आहे. ( ४६ ) आणि शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, "ब्राह्मणः" ( अर्थ ) ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, वैश्य असो, शूद्र असो, अंत्यज असो तो शिवभक्त असून कोणत्याही स्थितींत असो तो सर्वदा पूज्य आहे. (४७) वीरागमांत सांगितलें कीं, "पातके०" ( अर्थ ) पातकांचा स्पर्श झाल्याबरोबर शिवभक्तांच्या घरीं जावें तेथें अमृतस्वरूपी अन्न मागावें; तें नाहीं मिळालें तर त्यांच्या येथें नुसतें पाणी तरी पिवून यावें. ( ४८ ) "एवं०" याप्रमाणें भक्तपणामुळें अनुभविलेलें माहात्म्य आपल्या ठिकाणीं असल्यामुळें तें ऐक्यानें राहून प्रसादीच्या बाह्याभ्यंतरांमध्यें ( बाहेर व आंत ) त्याच्या परिणामानें प्रवेश केलेल्या परमानंदमाहात्म्य

क्षायामनंतरं शरणमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ४८ ॥ " श्वेताश्वतरोपनिषदि " ॥ सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितं ॥ सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं बृहत्[1] ॥ ॥ ४९ ॥ तथा शिवयोगप्रदीपिकायां ॥ वृत्तम् ॥ धन्यानि तानि नगराणि निरामयानि नित्योत्सवानि विजयोत्तरभूपतीनि ॥ एकोऽपि यत्र शिवयोगसमाहितात्मा पद्भ्यां पवित्रयति पावनपादुकाभ्यां ॥ ६० ॥ एवं सर्वांगेषु परमानंदवान्प्रसादी स्वस्वीकृतपरिणामप्रसादमाहात्म्यं कथमित्याकांक्षायामनंतरं प्रसादमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ६१ ॥ मैत्रेयोपनिषदि ॥ चित्तस्य हि प्रसादेन हंति कर्म शुभाशुभं ॥ प्रसन्नात्मात्मनि स्थित्वा सुखमव्ययमश्नुते ॥ ६२ ॥ किंच यजुर्वेदे ॥ रुद्रेणात्तममृतं देवाद्यैर्भोक्तुकामा वेदाश्च कामयन्ते ॥ ५३ ॥ किंच ॥ मुण्डकोपनिषदि ॥ निर्माल्यमेव सदा भक्षयेत् चण्डालो नैव चण्डालः पुल्कसो नैव पुल्कसः ॥ ६४ ॥ तथा सूतसंहितायां ॥ प्रसादे सति कीटो वा पतंगो वा नरोऽथ वा ॥ देवो वा

---

कसें? अशी आकांक्षा आली असतां शरणमाहात्म्यस्थल सांगतात. ( ४९ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " सर्वेंद्रिय गुणा० " ( अर्थ ) सर्व इंद्रियांच्या गुणांला प्रकाश देणारा असून सर्व इंद्रियांना सोडून अलिप्तपणें राहिला आहे. सर्व जगाला शिक्षा देणारा असून सर्व जगावर अनुग्रह करणारा आहे. व सर्व जगाचा तो आप्त असून सर्व लोकांकडून शरण असें म्हणवून घेतो. ( ६० ) तसेंच शिवयोगप्रदीपिकेंत सांगितलें कीं. " धन्यानि० " ( अर्थ ) शिवयोगानें ज्याचें मन एकाग्र झालें आहे, असा तो एकटा महात्मा पवित्रकर पादुका घातलेल्या आपल्या पायांनी ज्या नगरांला पवित्र करतों; तीं नगरें धन्य होत. आणि त्या नगरांमध्यें रोग होत नाहींत, त्याठिकाणीं निरंतर उत्सव होतात. व त्याठिकाणीं उत्तरोत्तर विजयी राजे होतात. ( ५१ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें श्रेष्ठ आनंदाचा उपभोग घेणारा प्रसादी आपण आपल्या प्रसादाचा स्वीकार केल्यानंतर त्याच्या परिणामाच्या प्रसादाचें माहात्म्य कसें? अशी आकांक्षा आल्यानंतर प्रसादमाहात्म्यस्थल सांगतात. ( ६२ ) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, " चित्तस्य० " ( अर्थ ) प्रसादाच्यायोगानें मनांतील सुकृत दुष्कृत व ( शुभाशुभ कर्में ) नष्ट होतात. प्रसन्नांतःकरणाचा होऊन परब्रम्ह्याच्या ठिकाणीं राहून नाशरहित सुखाचा उपभोग घेतो. ( ५३ ) आणि यजुर्वेदांत सांगितलें कीं, " रुद्रेणात्त० " ( अर्थ ) साक्षात् श्रीरुद्रानें अनुभविलेल्या प्रसादाचा अनुभव देवादिक घेऊं इच्छितात. वेदही इच्छितात. ( ५४ ) आणि मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " निर्माल्य० " ( अर्थ ) नेहमी शिव प्रसादाचाच उपयोग घ्यावा. तर तो चंडाल असून चंडाल नव्हे. पुल्कस असून पुल्कस तो होत नाहीं. ( ५५ ) तसेंच सूतसंहितेंत सांगितलें कीं, " प्रसादे० " श्रीशिवाचा प्रसाद झाला असतां किडा असो, पक्षी असो,

---

१ सुहृत् पाठान्तरम्.

दानवो वापि लभते ज्ञानमुत्तमं ॥ ९९ ॥ तत्रैव ॥ वृत्तम् ॥ शिवप्रसादेन समो न विद्यते शिवप्रसादादधिकं न विद्यते ॥ शिवप्रसादेन शिवस्य सन्निधिः शिवप्रसादेन विशुद्धताऽऽत्मनः ॥ ९६ ॥ सत्यं सत्यं पुनः सत्यमुद्धृत्य भुजमुच्यते ॥ प्रसादादेव सर्वेषां सर्वसिद्धिर्महेशितुः ॥ ९७ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे प्रसादिस्थलं नाम तृतीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

मानव असो, देव असो, दानव असो, तो उत्तम ज्ञान मिळवितो. ( ५६ ) तेथेंच सांगितलें कीं, " शिवप्र० " ( अर्थ ) शिवप्रसादासारखी दुसरी वस्तु नाहीं; शिवप्रसादापेक्षां श्रेष्ठ वस्तु नाहीं; शिवप्रसादाच्यायोगानें मन ज्याचें शुद्ध झालें आहे; तो शिवसंनिधीस जातो. ( ५७ ) " सत्यं० " ( अर्थ ) वर हात करून पुनः पुनः खरें खरें सांगतों कीं,– श्रीशिवाच्या प्रसादाच्यायोगानें सर्वसिद्धि होते.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिविवरण नांवाच्या कैवल्यसारांतील प्रसादिस्थल नांवाचें तिसरें प्रकरण संपलें.

# चतुर्थ प्रकरणं.

श्रीशिवाय नमः ॥ एवं प्रसादिस्थलमनुष्ठाय प्रसन्नप्रसादसमरसीभूतप्रसादी अनुभवमुखेनानुष्ठाय सामरस्यप्राप्तिमान्कथमित्याकांक्षायामनंतरं प्राणलिंगिस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ ननु प्राणलिंगमित्यत्र प्राणे लिंगमित्याधारार्थो वा प्राणस्य लिंगमिति संबंधार्थो वा प्राण एव लिंगमित्येकाश्रयत्वं वा कस्य प्राणलिंगत्वं किंच प्राणशब्दस्यानेकार्थवाचकत्वात् " तथा मृगेंद्रे ॥ चित्याति वाहिके शक्तौ प्राणशब्दः कलासु च " ॥ रेचकपूरकात्मकप्राणवायुसंबंधस्य मंत्रात्मकस्यापि प्राणलिंगत्वं सूक्ष्मशरीरांशेषु श्रोत्रादींद्रियेषु प्रवर्तमानस्याचारादिषड्विधलिंगस्यापि प्राणलिंगत्वं ॥ हृदयकमलकर्णिकामध्यस्थितसूर्यचंद्राग्निमण्डलत्रयसंबंधस्यापि प्राणलिंगत्वं चेतस्यविनाभूतत्वेनाभिन्नतया वर्तमानस्य परमसूक्ष्मनादस्यापि प्राणलिंगत्वं ॥

---

# प्रकरण ४ थें.

श्रीशिवाय नमः ॥ १ ॥ " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें प्रसादिस्थलाचें अनुष्ठान करून ( प्रसादाचा अनुभव घेऊन ) प्रसन्न झालेल्या प्रसादाच्या ठिकाणीं समरस झालेल्या प्रसादी हा अनुभवाच्या द्वारानें आचरण करून सामरस्याची प्राप्ति कशी करून घेतो? अशी आकांक्षा आली असतां प्राणलिंगिस्थल सांगतात. ( २ ) " ननु प्राणलिंगमित्यत्र " ( अर्थ )—शंकाकार येथें अशी शंका घेतो कीं—अहो, " प्राणलिंग० " याठिकाणीं—प्राणेलिंगं—असें सप्तमी तत्पुरुष करून आधारार्थ सांगतां? किंवा—प्राणस्यलिंगं—असें षष्ठीतत्पुरुष करून संबंधार्थ सांगतां? अथवा—प्राण एव लिंगं—असें अवधारणा करून एकाश्रयत्व सांगतां? आणि प्राणलिंगत्व कोणाला सांगतां आणि प्राणशब्दाला पुष्कळ अर्थ आहेत. तसेंचमृगेंद्रांत सांगितलें कीं,—" चित्याति " (अर्थ) चैतन्याच्या ठिकाणीं, कलादि क्षित्यंत तात्त्विकशक्तीच्या ठिकाणीं, व बलात्मक परशक्तीच्या ठिकाणीं प्राणशब्द आहे. प्राण या शब्दाला इतके अर्थ आहेत. ) " रेचक० " ( अर्थ ) रेचक पूरक स्वरूप प्राण वायूशीं संबंध असलेल्या नादबिंदुकलात्मक मंत्र स्वरूपाला प्राणलिंगत्व आहे. सूक्ष्म शरीराचें अंशभूत अशा श्रोत्रादि इंद्रियांच्यां ठिकाणीं असलेल्या आचारादि सहा प्रकारच्या लिंगांलाही प्राणलिंगत्व आहे. " हृदय कमल० " ( अर्थ ) हृदयकमलांतील कर्णिकेच्या मध्यभागीं असलेल्या सूर्य, चंद्र, अग्नि यांच्या मंडलत्रयाच्यासंबंधालाहीं प्राणलिंगत्व आहे. " चेतस्यविनाभूत० " ( अर्थ ) मनाला सोडून राहत नसल्यामुळें अभेदपणानें राहिलेल्या परम सूक्ष्म नादाच्या ठिकाणींही प्राणलिंगत्व आहे. " एतस्मा० " ( अर्थ ) याप्रमाणें आधार, संबंध, अभेद या स्वरूपानें प्राणलिंगाची स्थिति त्या त्या ठिकाणीं आहे. तर प्राणलिंगत्व कोणाला निश्चयानें सांगतां? अशी शंका आली तर सांग-

एतस्मादाधारसंबंधभेदात्मना प्राणलिंगस्य स्थितिरिति चेन्न ॥ २ ॥ उक्तप्राणलिंगचातुर्विध्यमपि न संभवति ॥ तस्य सूक्ष्मांगगोचरत्वेनासत्यतापत्तेः ॥ ३ ॥ किंच अंगत्रयमध्ये एकांगस्य लिंगत्वमेव भज्येत तथाभूतांगांशे संसारोऽपि न निवर्तेत इच्छाविपयीभूतेष्टलिंगस्यैव ध्यानगोचरत्वेन प्राणलिंगत्वात् तस्मादिष्टलिंगप्रतिबिंबमेव सूक्ष्मांगगोचरं सत्प्राणलिंगमिति मंतव्यं ॥ ४ ॥ तथा " श्वेताश्वतरोपनिषदि " ॥ यत एव बिंबं हृदयोपलिप्तं तेजोमयं भ्राजते तत्सुधान्तं ॥ ५ ॥ " मुण्डकोपनिषदि " ॥ अन्तः शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोपाः ॥ ६ ॥ तथा वीरागमे ॥ प्राणिना धृतलिंगं तत्प्राणस्थाने विनिक्षिपेत् ॥ यस्तु भेदेन जानाति न च लिंगं न चार्चनं ॥ ७ ॥ तत्रैव ॥ इष्टलिंगमविश्वस्य प्राणलिंगं न पश्यति ॥ दर्पणप्रतिबिंबानां यथा रूपं तथा भवेत् ।८। पुनस्तत्रैव ॥ सर्वतत्वमयः प्राणः सर्वज्ञानमयः शिवः ॥ अनयोर्योगमेवैतत्प्राणलिंग-

---

तात कीं; अरे, तसें नव्हे; ऐक. ( ३ ) " उक्त प्राण० " ( अर्थ ) प्राणलिंगाविषयीं चार जे प्रकार सांगितले; त्यांत एकालाही प्राणलिंगत्व संभवत नाहीं. " तस्य० " ( अर्थ ) मागें सांगितलेले चारी प्रकार सूक्ष्म शरीराला गोचर होत असल्यामुळें असत्यतारूप दोप येईल. ( ४ ) " किंच० " ( अर्थ ) आणखी अंगत्रयांमध्यें एकांगालाच लिंगत्व नाहींसें होईल. " तथा भूत० " ( अर्थ ) तशा तऱ्हेच्या अंगांशाच्या ठिकाणीं संसारनिवृत्ति होणार नाहीं. कारण आपल्या इच्छेला विपय झालेलें इष्टलिंगचं ध्यानगोचर होत असल्यामुळें त्यालाच प्राणलिंगत्व येईल " तस्मा० " ( अर्थ ) याकरितां इष्टलिंगाचें प्रतिबिंबच सूक्ष्मांगाला गोचर होऊन प्राणलिंग होतें; असें मानावें. ( ५ ) तसेंच श्वेताश्वतरोपनिपदांत सांगितलें कीं,– " यत एव० " ( अर्थ ) ज्या इष्टलिंगापासून हृदयामध्यें व्यापिलेलें प्राणलिंगस्वरूप बिंबचैतन्य असेल तें त्या इष्टलिंगाला अमृतस्वरूप येईपर्यंत प्रकाशतें. ( ६ ) मुंडकोपनिपदांत सांगितलें आहे कीं, " अंतःशरीरे० " ( अर्थ ) पापाचा नाश करून घेतलेले यतीश्वर सूक्ष्म शरीरामध्यें निर्मल, प्रकाशरूप, इष्टलिंग, कलारूप असें प्राणलिंग पाहतात. ( ७ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " प्राणि ना० " ( अर्थ ) प्राण्यानें. ( मानवानें ) धारण केलेलें इष्टलिंग प्राणाच्या स्थानावर ठेवावें. जो मानव इष्टलिंग प्राणलिंगामध्यें भेद मानतो; त्याचें तें लिंग नव्हे; आणि त्याची ती पूजाही नव्हे. ( ८ ) तेथेंच सांगितलें कीं, " इष्टलिंग० " ( अर्थ ) इष्टलिंगावर ज्याचा विश्वास नाहीं तो प्राणलिंगाला पाहत नाहीं. आरशांत असलेल्या प्रतिबिंबाचें रूप आरशांत पाहिल्याशिवाय जसें समजत नाहीं, त्याप्रमाणें हेंही समजावें. ( ९ ) पुनः तेथेंच सांगितलें कीं, " सर्वतत्वमयः " ( अर्थ ) प्राण सर्व तत्वमय असून शिव सर्व ज्ञानमय आहे. या दोघांच्या योगालाच प्राणलिंग म्ह-

मिहोच्यते ॥ ९ ॥ किंच शैवरत्नाकरे ॥ प्राणलिंगी स विज्ञेयः प्राग्रूपस्य ह्यनित्यतां ॥ विचार्य सर्वज्ञानाख्यलिंगे सर्वं सदा मृशन् ॥ १० ॥ एवं प्राणलिंगसंबंधवतो लिंगप्राणिनः प्राणलिंगपूजाक्रमः कथमित्याकांक्षायामनंतरं प्राणलिंगार्चनास्थलमित्युच्यते ॥ ११ ॥ " अथर्वशीर्षोपनिषदि " ॥ प्राणेष्वन्तर्मनसो लिंगमाहुर्यस्मिन् क्रोधो या च तृष्णा क्षमा च ॥ तृष्णां हित्वा हेतुजालस्य मूलं बुध्या चिंत्य स्थापयित्वाथ रुद्रे ॥ १२ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ प्राणलिंगं मनोग्राह्यं भवेत्सकलनिष्कलं ॥ तत्प्राणेष्वन्तर्मनसो लिंगमाहुरिति श्रुतिः ॥ १३ ॥ किंच " बृहदारण्यकोपनिषदि " ॥ लिंगं मनो यत्र निषक्तं प्राप्यरात्तं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययं तस्माल्लोकात्पुनरेत्यस्मै लोकाय कर्मण इत्यनुकामयमानोऽथ कामयमानो यो कामो निष्काम आप्तकाम आत्मकामो न तस्य प्राणा उत्क्रामन्ति

---

णतात. ( १० ) आणि शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " प्राणलिंग० " ( अर्थ ) पूर्व रूपाच्या ठिकाणीं अनित्यत्व मानून ( पूर्वरूप सर्व अनित्य आहे; असें समजून ) चांगल्या विचारानें सर्व ज्ञान लिंगाचें ठिकाणीं ( प्राण लिंगाचे ठिकाणीं ) सर्वदा सर्व विचार करतो; त्यालाच प्राणलिंगी ह्मणावें. ( ११ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें प्राणलिंगाचा संबंध करणाऱ्या लिंगप्राणीचा ( प्राणलिंगीचा ) प्राणलिंग पूजाक्रम कसा असतो? अशी आकांक्षा केली असतां प्राणलिंगार्चनस्थल सांगतात. ( १२ ) अथर्वशीर्षोपनिषदांत सांगितलें कीं, " प्राणे० " ( अर्थ ) प्राणाच्या आंत मनामध्यें लिंग आहे, असें सांगतात. ज्या लिंगामध्यें क्रोध, तृष्णा, ( आशा ) अक्षमा, ( असहनशीलपणा ) वगैरे आहेत त्या कारणसमूहाला मूल कारण झालेल्या अशा आशेचा त्याग करून बुद्धीनें ध्यान करून शिवाच्या ठिकाणीं तें ध्यान कायम ठेवावें. ( १३ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं, " प्राणलिंगं मनो० " ( अर्थ ) सकल निष्कल स्वरूप तें प्राणलिंग मनाला ग्राह्य ( स्वीकार करावयास योग्य ) आहे, असें " तत्प्राणेष्वंतर्मनसोलिंगमाहु० " ही श्रुति सांगते. ( १४ ) आणि बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " लिंगं मनो० " ( अर्थ ) मनोरूप लिंग हें ज्या प्रदेशामध्यें संबद्ध झालें आहे; ( मन जेथें गुंतलें आहे, ) त्या कर्मांचा स्वीकार येथें केला आहे. हा ( जीव ) येथें कोणतें व काय कर्म करतो; त्या कर्मांमुळें तो लोकांमध्यें पुनः फिरत राहतो. ( जगांत पुनः त्या कर्मांच्या योगानें जन्मास येतो. ) जो कोणी मानव मनामध्यें अभिलाष धरून तें साधण्याकरितांच कर्म करीत असेल तर त्या कर्मानें त्या लोकाला जाऊन तेथें आपली इच्छा पूर्ण करून घेतो, परंतु तें कर्म सरल्यानंतर पुनः जन्मास येतो. जो मानव निरभिलाषानें ( इच्छा न करितां ) केवळ ब्रह्मप्राप्तीकरितांच कर्म करतो, तो प्राणोत्क्रमण झाल्यानंतर परब्रह्मस्वरूप होऊन सर्व मनोरथ पूर्ण करून घेऊन शेवटीं ब्र-

ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति ॥ १४ ॥ किंच ॥ मुण्डकोपनिषदि ॥ हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलं ॥ तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥ १५ ॥ एवं प्राणलिंगार्चनारतस्य लिंगलीनसकलकरणस्य प्राणलिंगिनः लिंगसमाधिभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शिवयोगसमाधिस्थलमित्युच्यते ॥ १६ ॥ मैत्रेय्योपनिषदि ॥ वृत्तम् ॥ समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ॥ न शक्यते वर्णयितुं गिरा सदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते ॥ १७ ॥ किंच ॥ तत्तरीयोपनिषदि ॥ नीवारशूकवत्तन्वी पीता भास्वत्यणूपमा ॥ तस्याः शिखाया-मध्ये तु परमात्मा व्यवस्थितः ॥ १८ ॥ किंच ॥ मुण्डकोपनिषदि ॥ प्राणो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ॥ अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥१९॥ तथा योगसारे ॥ जीवः प्राणपरिस्पंदः परात्मा लिंगमीरितं ॥ उभयोरैकतावस्था सा समाधिः प्रकीर्तिता ॥ २० ॥ किंच ॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ सर्वज्ञानं सर्व-

---

ह्मच होतो. ( १५ ) आणि मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे कीं, " हिरण्मये " ( अर्थ ) सुवर्णमय, श्रेष्ठ उत्कृष्ट कोशामध्यें ( कळांमध्यें रजोगुणाच्या पलीकडचें, कलातीत जें परब्रह्मच आहे; तें निर्मळ असून ज्योतिरूप आहे. अशा त्या परब्रह्मरूपाला आत्मवेत्ते लोक जाणतात. ( १६ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें प्राणलिंगाच्या पूजेंत रत असलेल्या व लिंगामध्येंच इंद्रियें लपलेलीं ज्याचीं आहेत; अशा प्राणलिंगीचा लिंगाच्या ठिकाणीं समाधि भेद कसा होतो? अशी आकांक्षा आली तर शिवयोगसमाधिस्थल सांगतात. ( १७ ) मैत्रेयोपनिषदांत सांगतात कीं, " समाधि० " ( अर्थ ) समाधीच्या योगानें ( एकाग्र मन केल्यानें ) आणवादि मलापासून दूर असलेल्या व परमात्म लिंगाच्या ठिकाणीं प्रवेश केलेल्या मनाला जें कांहीं सुख होतें; तें सुख अमुकच तऱ्हेचें आहे, असें वाणीनें वर्णन करावयास होत नाहीं. तें सुख स्वतः अंतःकरणानेंच घ्यावयास योग्य आहे. ( अंतःकरणालाच तें सुख समजतें ) (१८) आणि तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें कीं,— " नीवार० " (अर्थ) एखाद्या गवताच्या कुसाप्रमाणें पिवळ्या रंगाच्या अणुसदृश शिखेच्या मध्यभागीं परमात्मलिंग विशेषेंकरून राहिलें आहे. ( १९ ) आणि मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, ' प्राणे० ' ( अर्थ ) प्राण धनुष्य असून आत्मा बाण आहे, आणि परब्रह्म त्या बाणाचा नेम आहे. तर विशेष सावधगिरीनें अचूक नेम मारावा. बाणाप्रमाणें तन्मय ( ब्रह्ममय ) व्हावें. ( २० ) तसेंच योगसारांत सांगितलें कीं " जीवः " ( अर्थ ) प्राणाची हालचाल ह्मणजे जीव होय, आणि लिंगच परमात्मा आहे, असें सांगितलें आहे. या दोहोंचें ऐक्य करणें यालाच समाधि ह्मणतात. ( २१ ) आणि अचिंत्यविश्वसादाख्यांत ह्मटलें आहे कीं, पूर्ण ज्ञानस्वरूप, सर्व जगाची सृष्टि करणारें, प्रकृतीच्या पलीकडे असलेलें, शिवस्वरूप परब्रह्म कमळाच्या देठांतल्या केसराप्रमाणें प्रकाशणारें आहे. त्या परब्रह्म व-

कार्यं परात्परतरं शिवं ॥ बिसतन्तुनिभज्योतिर्भावयेद्योगवित्तमः ॥ २१ ॥ तथाच वीरागमे ॥ शृणु देवि प्रवक्ष्यामि भवत्प्रश्नस्य निर्णयं ॥ इदमात्मरहस्यं च मनोधर्मव्यवस्थितं ॥ २२ ॥ आधारस्थानमाद्यं स्यात्स्वाधिष्ठानं द्वितीयकं ॥ नाभिस्थानं तृतीयं स्यादुदरं तु चतुर्थकं ॥ २३ ॥ हृदयं पंचमं स्थानं कण्ठः षष्ठ उदीरितः ॥ भ्रूमध्यं सप्तमं स्थानं शून्यमष्टममुच्यते ॥ २४ ॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च शक्तिरेको गुरुः शिवः ॥ सदाशिवः क्रमादेषां स्थानानामधिपा इमे ॥ २५ ॥ आधाराज्जायते वर्णाश्रमधर्मादिकक्रिया ॥ मायाव्यसनमोहादिस्त्वाधिष्ठानाद्भवत्यथ ॥ २६ ॥ नाभिस्थानाद्भवत्येव तामसत्वमदादिकं ॥ क्षुत्पिपासादिका धर्मा उदरस्थानसंभवाः ॥ २७ ॥ हृदयस्थानसंभूतं भक्तिशांतिदयादिकं ॥ शब्दशक्तिविरक्त्याद्याः क्रियाः कंठसमुद्भवाः ॥ २८ ॥ ज्ञानप्रज्ञाप्रभावादिकर्म भ्रूमध्यसंभवम् ॥ निश्चितत्वसदानन्दौ शून्यस्थानसमुद्भवौ ॥ २९ ॥ धर्मस्थानं द्वयं त्वेषां मायास्थानं तथा द्वयं ॥ भक्तिस्थानं द्वयं चैव विरक्तिश्च तथा द्वयं ॥ ३० ॥ संसारो

---

स्तूचें ध्यान योग जाणणाऱ्या श्रेष्ठ योग्यानें करावें. ( २२ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " शृणु० " ( अर्थ ) हे देवि, तुझ्या प्रश्नाचा निर्णय सांगतों ऐक. मी काय सांगणार आहे; तें केवळ मनांतच ठेवण्यासारखें असून आपल्याठिकाणीं मोठ्या सावधगिरीनें गुप्त ठेविलें पाहिजे. ( २३ ) " आधारस्थान " ( अर्थ ) आधारस्थान पहिलें असून स्वाधिष्ठान दुसरें आहे. मणिपूरकस्थान तिसरें असून उदर चौथें आहे. ( २४ ) " हृदयं० " ( अर्थ ) हृदय पांचवें स्थान असून कंठ सहावें स्थान आहे. भिवयाचा मध्यभाग सातवें स्थान असून शून्यस्थान आठवें आहे. ( २५ ) " ब्रह्मा० " ( अर्थ ) ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, शक्ति, ईश्वर, गुरु, शिव, सदाशिव हे सर्व देव अनुक्रमानें मागें सांगितलेल्या स्थानांचे अधिपति होत. ( २६ ) " आधारा० " ( अर्थ ) आधारस्थानापासून वर्णाश्रम धर्मादिकांच्या क्रिया होतात. स्वाधिष्ठानापासून माया, व्यसन, मोह, वगैरे होतात. ( २७ ) " नाभिस्था० " ( अर्थ ) नाभिस्थानापासून तमोगुणप्रचुर मद अहंकार वगैरे होतात. उदरस्थानापासून भूक तहान वगैरे धर्म होतात. ( २८ ) " हृदय० " ( अर्थ ) हृदयस्थानापासून भक्ति, शांति, दया वगैरे उत्पन्न होतात. शब्दशक्ति, विरक्ति वगैरे क्रिया कंठस्थानापासून उत्पन्न होतात. ( २९ ) " ज्ञान० " ( अर्थ ) प्रज्ञा, ज्ञान, प्रभाव वगैरे क्रिया भ्रूमध्यापासून उत्पन्न झाल्या आहेत. निश्चितत्व सदानंद वगैरे शून्यस्थानापासून उत्पन्न झाले आहेत. ( ३० ) " धर्म० " ( अर्थ , या आठ स्थानांमध्यें आधार स्वाधिष्ठान हीं दोन स्थानें धर्मस्थान होत. मणिपूरक व उदर हीं स्थानें मायास्थान होत. हृदय व कंठ हीं स्थानें भक्तिस्थान होत. भ्रूमध्य व शून्य हीं स्थानें विरक्तिस्थान होत. ( ३१ ) " संसारो० " ( अर्थ ) पहिल्या चारस्था-

जायते सम्यगाद्यस्थानचतुष्टयात् ॥ निःसंसारित्वमेवं स्यादूर्ध्वस्थानचतुष्टयात् ॥ ३१ ॥ अधमं मध्यमं चादिद्वयमन्योन्यसंगतं ॥ ऊर्ध्वद्वयं तथा युक्तमुत्तमं चोत्तमोत्तमं ॥ ३२ ॥ आदिस्थानादिषट्कं स्याच्छक्तिबीजसमन्वितं ॥ ततः शून्यस्थानयुगं शक्तिबीजविवर्जितं ॥ ३३ ॥ स्कांदे ॥ उपरिष्ठादथ ज्ञेयं कैलासनिलयाव्हयं ॥ तत्पदं ब्रह्मरंध्राख्यं तन्निरालंबनं स्मृतं ॥ ३४ ॥ एवं शिवयोगसमाधिनिष्ठप्राणलिंगिनः मनसि मनोमूर्तिरूपेण स्थितलिंगस्य सहजभावः कथमित्याकांक्षायामनंतरं लिंगनिजस्थलमित्युच्यते ॥ ३५ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो न भांति कुतोऽयमग्निः तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ ३६ ॥ तथैवोक्तं सूतसंहितायां ॥ स्वयं ज्योतिरिति प्राह श्रुतिः साध्वी महेश्वरं ॥ तस्य भासा सर्वमिदं विभातीत्यपि चाह हि ॥ ३७ ॥ वृत्तम् ॥ वेदान्तवाक्योत्थपरात्मविद्यां शिवस्य लिंगं कथयंति केचित् ॥ विचारजन्यामपि सत्यविद्यां ब्रुवंति चान्ये परमस्य लिंगं ॥ ३८ ॥

---

नांपासून संसाराची प्राप्ति होते. पुढच्या चार स्थानांपासून संसार दूर होतो. ( ३२ ) " अधमं० " ( अर्थ ) स्वाधिष्ठानस्थानाशीं मिसळलेलें आधारस्थान अधमस्थान होय. शक्तिस्थानासह मिसळलेलें मणिपूरकस्थान मध्यमस्थान होय. तसेंच पुढें सांगितलेलीं स्थानें परस्पर मिसळलेलीं असलीं तर हरकत नाहीं. विशुद्धिस्थानाशीं मिसळलेलें अनाहतस्थान उत्तमस्थान होय. शून्यस्थानाशीं मिसळलेलें मध्यस्थान उत्तम होय. ( ३३ ) " आदिस्थानादि० " ( अर्थ ) आदिस्थानादि सहा स्थानें शक्तिबीजानें युक्त आहेत. नंतर शून्यस्थान युग्म हें ( हीं दोन स्थानें ) शक्तिबीजानें रहित आहे. ( ३४ ) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " उपरिष्ठा० " ( अर्थ ) सर्व स्थानांच्या वरच्याभागीं कैलासनिलय नांवाचें स्थान आहे. त्या स्थानाला ब्रह्मरंध्रस्थान ह्मणतात. या स्थानाला कशाचाही आधार नाहीं. ( ३५ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें शिवयोगसमाधींत तत्पर असलेल्या प्राणलिंगीच्या मनांत मनोमूर्तीच्या रूपानें राहिलेल्या लिंगाला सहजभाव कसा येतो ? अशी आकांक्षा आली असतां लिंगनिजस्थल सांगतात. ( ३६ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " न तत्र० " ( अर्थ ) त्या परशिवलिंगाच्या ठिकाणीं सूर्याचा प्रकाश पडत नाहीं. चंद्र व तारका प्रकाशत नाहींत. विजांचा प्रकाश तेथें पडत नाहीं. मग अग्नीचा प्रकाश कोठून पडणार ? सर्वांला प्रकाश देणाऱ्या त्या शिवलिंगाच्या प्रकाशानें हें सर्व जग प्रकाशतें. ( ३७ ) तसेंच सूतसंहितेंत सांगितलें कीं, " स्वयं० " ( अर्थ ) महेश्वर हा स्वयंप्रकाश आहे; असें श्रुति सांगते. त्याच्या प्रकाशानें हें सर्व जग प्रकाशतें. असेंही त्या श्रुतीनें सांगितलें आहे. ( ३८ ) " वेदांत० " ( अर्थ ) वेदांतशास्त्रांतील वाक्यापासून उत्पन्न झालेल्या परशिवज्ञानाला शिवलिंग असें कांहीं लोक ह्मणतात. कांहीं लोक त्या शिवलिंगाला विचारतर्कांनीं उत्पन्न झालेलें प्रत्यक्ष ज्ञान असें ह्मणतात.

शिवस्य लिंगं शिवलिंगमन्ये मुनीश्वरा वेदविदो वदंति ॥ स्वयं प्रकाशस्य न युज्यते यत्तश्च शंभुः स्वयमेव लिंगं ॥ ३९ ॥ एवं लिंगं निजज्ञानवतः प्राणलिंगिनः सर्वावयवलिंगभावक्रमः कथमित्याकांक्षायामनंतरमंगलिंगस्थलमित्युच्यते ॥ ४० ॥ " तैत्तरीयोपनिषदि " असन्नेव स भवति असद्ब्रह्मेति वेद चेत् अस्ति ब्रह्मेति चेद्वेद सन्तमेनं ततो विदुरिति तस्यैष एव शारीर आत्मा ॥ ४१ ॥ तथा शंभुप्रभायां ॥ यल्लिंगं शुद्धदेहस्थं मल्लिंगं लिंगसंयुतं ॥ तल्लिंगं विदितं येन स भवेदंगलिंगवान् ॥ ४२ ॥ तत्रैव ॥ यत्र लिंगे वरारोहे त्रैलोक्यं सचराचरं ॥ तल्लिंगं पूजितं येन स भवेदंगलिंगवान् ॥ ४३ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे प्राणलिंगस्थलं नाम चतुर्थं प्रकरणं समाप्तम् ॥

---

( ३९ ) " शिवस्य० " ( अर्थ ) वेदार्थ जाणणारे दुसरे कांहीं मुनिश्रेष्ठ शिवलिंगाला शिवाचें चिन्ह असें ह्मणतात. स्वयंप्रकाश शिवाला असें ह्मणणें हें योग्य दिसत नाहीं. कारण शिव हा स्वतः आपणच लिंगस्वरूप आहे. ( ४० ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें शिवलिंगाचें खरें ज्ञान असलेल्या प्राणलिंगीचा आपल्यासर्व अवयवांमध्यें लिंगभावाचा क्रम कसा ? अशी आकांक्षा आल्यानंतर अंगलिंगस्थल सांगतात. ( ४१ ) तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें कीं, " असन्नेव० " ( अर्थ ) ब्रह्मस्वरूप खोटें आहे; असें ज्ञान ज्याचें असेल; तो असत्स्वरूपच होतो. व ब्रह्मस्वरूप सत्स्वरूप आहे; ( परब्रह्म ) आहे; ) असें ज्ञान ज्याचें असेल तो सत्स्वरूप होतो; असें ज्ञाते सांगतात. त्या परशिवाला हा आत्माच अंगस्वरूप होऊन राहिला आहे. ( ४२ ) तसेंच शंभुप्रभेंत सांगितलें कीं, " यल्लिंगं० " ( अर्थ ) शुद्ध अशा आत्म्याच्या अंगामध्यें असलेलें, व चिन्ह असें न ह्मणविलेलें लिंगज्ञानासह असलेलें, जें ज्ञेयरूप ( जाणावयास योग्य ) असें लिंग असेल; तें लिंग ज्यानें जाणिलें आहे; तो अंगलिंगी होय. ( ४३ ) तेथेंच सांगितलें आहे कीं, " यत्र० " ( अर्थ ) हे सुंदरि, पार्वति, ज्या शिवलिंगाचे ठिकाणीं चराचर जग आहे; त्या लिंगाची पूजा ज्यानें केली आहे; तो अंगलिंगी होय.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यानें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील प्राणलिंगिस्थल नांवाचें चौथें प्रकरण संपलें.

---

# पंचमं प्रकरणं.

श्रीशिवाय नमः ॥ एवं प्राणलिंगिस्थलमनुष्ठाय लिंगलीनसर्वावयववान् प्राणलिंगी सुज्ञानसुखेनानुष्ठाय समरसीभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शरणस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि " ॥ तं महादेवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥ २ ॥ " किंच " प्रश्नोपनिषदि " ॥ अहं परंब्रह्म वेद नातः परमस्तीति ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति नमः परमपुरुषेभ्यो नमः परमपुरुषेभ्यः ॥ ३ ॥ तथा स्कांदे ॥ चिंतयामि शिवं केन जातं शिवमयं मनः ॥ पयोनिमग्नवपुषः पयस्तृष्णा न जायते ॥ ४ ॥ किंच वासिष्ठे ॥ कल्पान्तपवना वांतु यांतु चैकत्वमर्णवाः ॥ तपंतु द्वादशादित्या नास्ति निर्मनसः क्षतिः ॥५ ॥ एवं शरणस्थले महाज्ञानेन स्वस्वरूपविज्ञाता शरणः स्वस्य ज्ञानस्य गोचरीभूततमोनिरसने कृते सत्यनंतरं तामसनिरसनस्थलमित्युच्यते ॥ ६ ॥ " मैत्रेयोपनिषदि " ॥ स वा एषोऽभिभूतः प्राकृतैर्गुणैरित्यतोऽभिभूतत्वा-

---

# प्रकरण ५ वें.

श्रीशिवायन मः ॥ १ ॥ " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें प्राणलिंगिस्थलाचें अनुष्ठान करून लिंगाच्या ठिकाणीं सर्व आपलीं अवयवें लीन केलेला प्राणलिंगी सुज्ञानमुखानें अनुष्ठान करून समरस झालेल्या भेदाचा कसा होतो? अशी आकांक्षा आली असतां शरणस्थल सांगतात. ( २ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " तं महादेव० " ( अर्थ ) मोक्षाची इच्छा करणारा असा मी आपल्याच बुद्धीनें प्रकाशणाऱ्या त्या महादेवाला शरण जातों. ( ३ ) आणि प्रश्नोपनिषदांत सांगितलें कीं, " अहं परं० " ( अर्थ ) मी ब्रह्मस्वरूप आहें; त्या परब्रह्मवस्तूशिवाय दुसऱ्याला जाणत नाहीं. असा भाव मनांत धरून त्या परशिवाची पूजा करणारे शरण त्या शिवाला प्रार्थना करतात कीं; हे शिवा, आमचा पिता तूं आहेस, जो तूं आह्मांला अविद्येच्या पलीकडच्या कांठाला नेतोस, अशी प्रार्थना करून परशिवाची पूजा जे करतात; त्या महापुरुषांना नमस्कार असो, त्या परमऋषींना नमस्कार असो. ( ४ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " चिंतयामि० " ( अर्थ ) मन हें शिवस्वरूप झाल्यामुळें त्या शिवाचें चिंतन करितों, उदकामध्यें त्याचें शरीर बुडालेलें आहे; ह्मणून त्याला पाण्यावर इच्छा होत नाहीं. ( ५ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " कल्पांतपवना० " ( अर्थ ) प्रळयकाळचे वारे वाहोत; समुद्र सर्व एक होवोत, बारा सूर्य एकदम प्रकाश आपला पाडोत; परंतु शिवाचिंतनांत मन असक्त केलेल्या शरणाचें मनच नसल्यामुळें त्याला कशापासूनही भीति नाहीं. ( ६ ) " एवं० " (अर्थ) याप्रमाणें शरणस्थलांत महाज्ञानानें आपलें स्वरूप जाणणारा शरण आपल्या ज्ञानाला गोचर अशा अज्ञानाचा नाश केल्यानंतर तामसनिरसनस्थल सांगतात. ( ७ ) मैत्रेयोप-

स्स मूढत्वं प्रयाति स मूढत्वादात्मस्थं प्रभुं भगवन्तं कारयितारं नापश्यत् ॥ ७ ॥ तथा शिवधर्मोत्तरे ॥ मलमज्ञानमित्युक्तं संसारांकुरकारणं ॥ तत्तमस्तेन तमसा युक्तो यस्तामसः स्मृतः ॥ ८ ॥ किंच ॥ सिद्धांतशेखरे ॥ ज्ञानहीनगुरुं प्राप्य कुतो मुक्तिमवाप्नुयात् ॥ भिन्ननावाश्रितः सिन्धोर्यथा पारं न गच्छति ॥ ९ ॥ एवं ज्ञानगोचरीभूततमो निरस्य शरणः सुज्ञानं निर्दिश्य स्थैर्यं गते सत्यनंतरं निर्देशस्थलमित्युच्यते ॥ १० ॥ "श्वेताश्वतरोपनिषदि" नित्यो नित्यानां चेतन श्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ॥ तमात्मस्थं ये अनुपश्यंति धीरास्तेषां शांतिः शाश्वती नेतरेषां ॥ ११ ॥ तदेतदिति मन्यन्ते निर्देश्यं परमं सुखं ॥ कथं नु तद्विजानीयां किमु भाति विभाति वा ॥ १२ ॥ तथा स्कांदे ॥ शंकया भक्षितं सर्वं त्रैलोक्यं सचराचरं ॥ सा शंका भक्षिता येन स वीरो भुवि दुर्लभः ॥ १३ ॥ किंच योगपट्टसहस्रिकायां ॥ गुरुश्च गुणवान् प्राज्ञः परानंदावभासकः

---

निषदांत सांगितलें कीं, "स वा एषो०" ( अर्थ ) तो हा आत्मा प्रकृतिसंबंधी गुणांनी पराभूत झालेला असल्यामुळें अज्ञानदशेला पावतो. अर्थात् अज्ञानी झालेला असल्यामुळें आपल्याच ठिकाणीं असलेल्या परशिवतत्वाला पाहत नाहीं. तसेंच ( ८ ) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, "मलमज्ञान०" ( अर्थ ) अज्ञान हें संसाराचीं अंकुरें फुटावयाला कारण आहे. ह्मणूनच अज्ञानाला मल अशी संज्ञा आहे. त्या मल नांवाच्या अज्ञानाला तम असेंही ह्मणतात त्या तमानें जो युक्त आहे; त्याला तामस असें ह्मणतात ( ९ ) आणि सिद्धांतशेखरमध्यें सांगितलें कीं, "ज्ञानहीनं०" ( अर्थ ) ज्ञानहीन गुरूचा आश्रय केला असतां मुक्ति कोठून येईल बरें? फुटक्या नांवेंत बसलेला मानव समुद्राच्या पलीकडे जाऊं शकेल काय? ( १० ) "एवं०" ( अर्थ ) याप्रमाणें ज्ञानगोचर झालेलें तम ( अज्ञान ) निघून गेल्यावर शरण उत्तम ज्ञानी होऊन स्थिर झाल्यानंतर निर्देशस्थल सांगतात. ( ११ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें आहे कीं, "नित्यो०" ( अर्थ ) जो नित्य पदार्थांमध्यें नित्य आहे; चेतनांमध्यें जो चेतन आहे; बहु पदार्थांमध्यें जो एक आहे, जो सर्व मनोरथ पूर्ण करतो, त्या आत्मस्थ ( आत्म्याच्या ठिकाणीं असलेल्या ) परतत्वाला मोठमोठे धीर पाहतात. त्या धीरांना मोठें शाश्वत सुख मिळतें; इतरांना मिळत नाहीं. ( १२ ) 'तदेतदिति० ( अर्थ ) पाहावयास व सांगावयास अशक्य असें तें उत्कृष्ट सुख हेंच आहे, असें जाणतात? परंतु तें सुखाचें ज्ञान मला होईल? किंवा नाहीं? ( १३ ) तसेंच स्कांदपुराणांमध्यें सांगितलें आहे कीं, "शंकया०" ( अर्थ ) संशय या वरतूनें सर्व चराचर जग खाऊन टाकिलें आहे. परंतु ती शंका ( संशय ) ज्यानें खाल्ली आहे; असा तो वीर जगामध्यें दुर्लभ आहे. ( ज्याला संशय फार येतात; त्याला जगांत प्रत्येक वस्तु सदोष वाटते. ज्याला संशय नाहीं त्याला कोठेंही भीति नाहीं. ) ( १४ ) आणिं योगपट्टसाहस्रिकेंत सांगितलें कीं, "गुरुश्च०" ( अर्थ )

॥ तत्ववित्तत्वसंपन्नो मुक्तिदो न तु चापरः ॥ १४ ॥ किंच योगार्णवे ॥ वृत्तम् ॥ मीनः स्नानपरः फणी पवनभुङ्मेषस्तु पर्णाशनो नीराशी स तु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः ॥ भस्मोद्धूलनतत्परः खलु खरो ध्यानानुरक्तो बकः सर्वं निष्फलितं विवेकरहितं ज्ञानप्रधानं तपः ॥ १९ ॥ तत्रैव ॥ स्वस्थानं च परित्यज्य परस्थानं समाश्रिताः ॥ स्त्रीहेमभुक्तिलाभस्य आशाद्गच्छंति प्राणिनः ॥१६॥ प्राणिमार्गं परित्यज्य सन्मार्गं लिंगसंयुतः ॥ शिवज्ञानवतां पुंसां संगमिच्छति गच्छति ॥ १७ ॥ एवं सुज्ञानं निर्दिश्य स्वस्वरूपं ज्ञात्वा ज्ञानरूपसर्वांगशरणस्य महाज्ञानमेव चारित्रं तदतिरिक्तदुःशीलचारित्रं नास्तीति दर्शिते सत्यनंतरं शीलसंपादनस्थलमित्युच्यते ॥ १८ ॥ " कठवल्ल्युपनिषदि " ॥ तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गव्हरेष्ठं पुराणं ॥ अध्यात्मयोगाधिगमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥१९॥ तथैवोक्तं कूर्मपुराणे ॥ परस्य शिवतत्वस्य जिज्ञासामधिकृत्य यत् ॥ ईप-

---

सद्गुणी ज्ञानी गुरु हा श्रेष्ठ आनंद दाखवितो, तत्वसंपन्न तत्ववेत्ता तो गुरूच मुक्ति देतो; दुसरा देऊं शकत नाहीं. ( १५ ) आणि योगार्णवांत सांगितलें कीं, " मीनः स्नानपरः " ( अर्थ ) मासा हा नेहमीं पाण्यांत राहतो, सर्प नेहमीं वारा खातो, मेंढा नेहमीं पान खातो, चातक नेहमीं उपवास करतो, उंदीर नेहमीं गुहेंत ( बिळांत ) निजतो, गाढव नेहमीं अंगाला राख लावतो, बक नेहमीं ध्यान करतो, परंतु ज्यांत ज्ञान नाहीं; असें तें तप व्यर्थ होय. तपश्चर्येला मुख्यत्वेंकरून ज्ञान लागतें. ( १६ ) ( ज्ञानपूर्वक कर्म केलें तर फल मिळतें. ज्ञानाशिवाय केलेलें कर्म निष्फळ आहे, असें यांतलें तात्पर्य होय. तेथंच सांगितलें आहे कीं, " स्वस्थान० " ( अर्थ ) मानव हे आपलें स्थान सोडून दुसऱ्यांच्या ( दात्यांच्या ) स्थानाचा आश्रय करतात. ( मानव आपली जागा सोडून कांहीं तरी मिळेल या आशेनें दुसऱ्या दात्याच्या आश्रयाला जाऊन राहतात. ) स्त्री, सोनें, अन्न हीं मिळविण्याच्या आशेनें दुसऱ्याच्या आश्रयाला जातात. ( १७ ) " प्राणिमार्ग० " ( अर्थ ) शिवलिंगाचा संयोग केलेला मानव इतर जीवांचे रस्ते सोडून शिवज्ञानी पुरुषांचा सहवास करूं इच्छितो; आणि त्याकरितांच तो जात असतो. (१८) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें सुज्ञान सांगून स्वस्वरूप जाणून ज्ञानरूप शरीर ज्याचें झालें आहे; अशा शरणाचें महाज्ञानचें चरित्र असून त्याशिवाय दुःशीलरूप चरित्र नाहीं; असें दाखविल्यानंतर शीलसंपादनस्थल सांगतात. ( १९ ) कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं, " तं दुर्दर्श" ( अर्थ ) पाहण्यास अशक्य, गुप्त, सर्व ठिकाणीं व्याप्त, दहराकाशांत राहिलेला, सुषिरामध्यें असलेला, अनादिसिद्ध, अशा त्या शिवाला बुद्धिमान धीर पुरुष अध्यात्मयोगाच्या वागणुकीनें जाणून सुखदुःखांचा त्याग करतो. ( २० ) तसेच कूर्मपुराणांत सांगितलें कीं, " परस्प० " ( अर्थ ) सर्व तत्वांमध्यें श्रेष्ठ तत्व अशा

णासु च वैराग्यं तच्छीलं परमं स्मृतं ॥ २० ॥ किंच शैवपुराणे ॥ व्रतं शिवैक-विषयं नियमश्च सनातनः ॥ शीलमित्युच्यते सद्भिर्येन शीली भवेत्पुमान् ॥ २१ ॥ किंच लैंग्ये ॥ शिव एव परं ज्योतिर्नान्यत्किंचन विद्यते ॥ इति यश्च स्थिरीभा-वस्तच्छीलं परमं विदुः ॥ २२ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीर-शैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालविवरणाख्यकैवल्यसारे शरणस्थलं नाम पंचमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

शिवतत्वाची जिज्ञासा करूं इच्छिणाऱ्यानें धनेषणा, दारेषणा, पुत्रेषणा यां ईषणत्रयामध्यें वैराग्य स्वीकारिलें असतां त्याच्या शीलाला श्रेष्ठ शील असें ह्मणतात. ( २१ ) आणि शैवपुराणामध्यें सांगितलें कीं, " व्रतं० " ( अर्थ ) शिवविषयक व्रतालाच व्रत ह्मणतात. आणि शिवविषयक नियमालाच नियम ह्मणतात. अशा व्रत करणाऱ्यांच्या शीलालाच सज्जन लोक शील असें ह्मणतात. तें शील ज्याच्या ठिकाणीं आहे, त्याला शीली ह्मण-तात. ( २२ ) आणि लिंगपुराणांत सांगितलें कीं, " शिव एव० " ( अर्थ ) शिवच परं-ज्योति आहे, दुसरें कोणतेंही नाहीं; याप्रमाणें जो स्थिर भाव असेल, त्याला शील असें ह्मणतात.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनें रचलेल्या परमवीर-शैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील शरणस्थल नांवाचें पांचवें प्रकरण संपलें.

---

# षष्ठं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः ॥ एवं शरणस्थले महाज्ञानेन सकलसंशयं निवर्त्य निजस्वरूपं साक्षात्कृत्य परमानंदस्वरूपशरणः स्वस्य ज्ञानं विस्मृत्य तद्विस्मरणमपि विनाश्य महालिंगैक्यगतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमैक्यस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ " उत्तरतापनीयोपनिषदि " ॥ अथ लिंगान् संहृत्य तेजसा शरीरत्रयं संव्याप्य तदधिष्ठानमात्मानं संज्वाल्य तत्तेज आत्मा चैतन्यरूपं बलमवष्टभ्य गुणैरैक्यं संपाद्य महास्थूलं महासूक्ष्मं महाकारणं संहृत्य मात्राभिर्होत्रनुज्ञात्रनुज्ञाविकल्परूपं चिन्तयन् विमृशेत् ॥ २ ॥ किंच कैवल्योपनिषदि ॥ न भूमिरापो मम नास्ति वन्हिर्न चानिलो मेऽस्ति न चांबरं च॥ एवं विदित्वा परमात्मरूपं गुहाशयं निष्कलमद्वितीयम् ॥ समस्तसाक्षिन् सदसद्विहीनं प्रयाति शुद्धः परमात्मरूपम् ॥ ३ ॥ तथा देविकालोत्तरे ॥ अहमेको न मे कश्चिन्नाहमन्यस्य कस्यचित् ॥ न तं पश्यामि यस्याहं तं न पश्यामि यो मम ॥ ४ ॥ वासिष्ठे ॥ विलीनाशेषवाह्यार्थबुद्धेरभ्यासयोगतः ॥

---

# प्रकरण ६ वें.

श्रीशिवायनमः ॥ १ ॥ " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें शरणस्थलामध्यें महाज्ञानानें सर्व संशयाची निवृत्ति करून घेऊन निजस्वरूपाचा साक्षात्कार करून घेऊन परमानंदस्वरूप शरण हा आपलें ज्ञान विसरून तें विस्मरणहीं नष्ट करून महालिंगैक्य गत भेदाचा ( महालिंगाशीं सामरस्य पावलेला ) कसा होतो? अशी आकांक्षा आल्यानंतर ऐक्यस्थल सांगतात. (२) उत्तरतापनीयोपनिषदांत सांगितलें कीं, " अथ लिंगान् " ( अर्थ ) शरणस्थलानंतर आचारादि लिंगांचा उपसंहार करून आत्मतेजानें स्थूल, सूक्ष्म, कारण यां शरीरत्रयाला चांगल्या तन्हेनें व्यापून त्या शरीरत्रयाला अधिष्ठानभूत आत्म्याला प्रज्वलित करून ( केल्यानंतर ) तो तेजोरूप आत्मा चैतन्यस्वरूप सामर्थ्याला आक्रमून सत्वादिगुणांनी ऐक्य संपादनकरून तेजोरूपस्थूल सूक्ष्म कारण शरीरांचा उपसंहार करून तेजोमय पंचतन्मात्रांनी होतृ, अनुज्ञातृ अनुज्ञा विकल्परूपाचें चिंतन करीत विचार करतो. ( ३ ) आणि कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं,— मला भूमि नाहीं, उदक नाहीं, अग्नि नाहीं, वायु नाहीं, आकाश नाहीं, असें मनांत जाणून हृदय गुहेमध्यें असलेला, कलारहित असलेला, सहायरहित असलेला, सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं साक्षी होऊन राहिलेला, सदसत्पदार्थांच्या पलीकडे असलेला असा जो परमात्मा आहे, त्या परमात्म्याचें स्वरूप जो जाणतो, तो शुद्ध होऊन परपदाला जातो. ( ४ ) तसेंच देवीकालोत्तरांत सांगितलें कीं, मी एकटा असून मला कोणी नाहीं, आणि मी कोणाचा कोणी नाहीं. ज्याचा मी आहें. त्याला मी पाहत नाहीं व जो माझा आहे, त्याला मी पाहत नाहीं. ( ५ ) वासिष्ठांत सांगितलें कीं, " विलीनाशेष " ( अर्थ ) रोजच्या अभ्यासा-

॥ जीवस्य ब्रह्मताप्राप्तिर्मुक्तिरित्यभिधीयते ॥ ६ ॥ किंच शिवाद्वैते ॥ अखण्ड-परिपूर्णेशस्वात्मसंभावनोर्जितः ॥ स्वप्नेऽप्यभेदनभ्रान्तो यस्स ऐक्य इहोदितः ॥६॥ एवं महालिंगसमरसीभूतलिंगैक्ये पट्स्थलसंपन्नसर्वाचारलीनभावः कथमित्याकांक्षायामनंतरं सर्वाचारसंपत्तिस्थलमित्युच्यते ॥७॥ " छांदोग्योपनिषदि " ॥ एवमेवेहाचार्यवान्पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्यै सुहृदः साधु कृत्यं द्विषंतः पापकृत्यं यथा पुष्करपलाश आपो न श्लिप्यंते एवमेव विदितपाप्मानं कर्म न श्लिप्यते ॥ ८ ॥ तथा वासिष्ठे ॥ गच्छतस्तिष्ठतश्चैव जाग्रतः स्वपतोऽपि वा ॥ सर्वाचारगता पूजा नित्यमाध्यात्मिका त्वियं ॥ ९ ॥ किंच ॥ पट्साहस्रिकायां ॥ परामृतरसास्वादनिर्भरानंदसुंदरः ॥ निराकारोऽखिलाचारचरणैकान्ततत्परः ॥ १० ॥ एवं सर्वांगलीनसर्वाचारसंपदो लिंगैक्यस्य महालिंगमेव भाजनं तन्महालिंगस्यापि लिंगैक्य एव भाजनं भूत्वा नामद्वयं विलीय एकभाजनीभूतभेदः

---

च्यायोगानें बाहेरचे सर्व विषय बुद्धीच्याठिकाणीं लीन केलेल्या जीवाला जा ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते; तिलाच मुक्ति असें ह्मणतात. ( ६ ) आणि शिवाद्वैतांत सांगितलें कीं, " अखड० " ( अर्थ ) अखंड अशा पूर्ण ईशाला स्वप्नामध्येंही अभेदभावानें समजून तल्लीन जो होतो, त्याला ऐक्य असें ह्मणतात. ( ७ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें महालिंगाशीं समरस झालेल्या लिंगैक्याच्या ठिकाणीं पट्स्थलसंपन्न होऊन सर्वाचारांचा लीनभाव कसा करतो; अशी आकांक्षा आली असतां सर्वाचारसंपत्तिस्थल सांगतात. (८) छांदोग्योपनिषदांत सांगितलें आहे कीं, " एव० " ( अर्थ ) याप्रमाणें याठिकाणीं गुरूनें युक्त असलेला पुरुष जाणतो. त्या ज्ञात्याला जोपर्यंत संसारापासून मोक्ष ( सुटका ) होत नाहीं, तोपर्यंतच त्याला कालक्षेप करावा लागतो. नंतर परशिवानंदरूप संपत्तीचा लाभ त्याला होतो. नंतर सुहृद लोक त्याचें सत्कृत्य घेतात, आणि वैरी लोक त्याचें पापकृत्य घेतात. जसें कमळाच्या पानाला पाणी स्पर्श करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें संसारांतील दोष जाणणाऱ्या पुरुषाला कर्म शिवत नाहीं. ( ९ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, " गच्छत० " ( अर्थ ) जात असो, उभा असो, जाग्रत असो, निजलेला असो, त्याच्या ठिकाणीं असलेली पूजा ती सर्वाचारगत होय. तिला आध्यात्मिक पूजा ह्मणतात. ( सर्व आचारांला पावलेली पूजा होय. ) ( १० ) आणि पट्साहस्रिकेंत सांगितलें कीं, " परामृत० " ( अर्थ ) श्रेष्ठ अमृतस्वरूप शिवानंदसुखाचा पूर्ण अनुभव घेतल्यामुळें सुंदर दिसणारा, निराकार, असा शरण हा सर्व आचार करण्याकरितां एकांत ठिकाणीं तत्पर होऊन राहतो. ( ११ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें सर्वांगाच्या ठिकाणीं सर्व आचारसंपत्ति लीन करून घेतलेल्या लिंगैक्याला महालिंगच भाजन होय, त्या महालिंगाला लिंगैक्यच भाजन होऊन दोन्ही नांवें लीन करून तो एक भाजनभेदाचा कसा होतो ?

कथमित्याकांक्षायामनंतरमेकभाजनस्थलमित्युच्यते ॥ ११ ॥ "मुण्डकोपनिषदि" ॥ कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्वएकीभवंति ॥ १२ ॥ तथा सूत्रार्णवे ॥ प्रभुणा भवता यस्य जातं हृदयमेलनं ॥ प्राभवीणां विभूतीनां परमेकः सभाजनं ॥ १३ ॥ किंच ॥ शिवसूत्रे ॥ विद्भाजनं भाजनेभ्यो बाह्येभ्यो हि विशिष्यते ॥ वस्तु यद्भूतमेतत्स्यादितरे नैवमित्यतः ॥ १४ ॥ एवं महालिंगे प्राप्तैकभाजनलिंगैक्यः तन्महालिंगं च समरसभावेन परमानंदसुखे सुखीभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं सहभोजनस्थलमित्युच्यते ॥ १५ ॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ यो वेद निहितं गुहायां परमे व्योमनि सोऽश्नुते सर्वान् कामान्सह ब्रह्मणा विपश्चितेति ॥ १६ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ एवं लिंगार्पितं सर्वमिति यो वेत्ति तत्वतः ॥ सोऽश्नुते सकलान्कामान् विपश्चिद्ब्रह्मणा सह ॥१७॥ किंच ॥ "कठवल्ल्युपनिषदि" ॥ येन रूपं रसं गंधं शब्दान् स्पर्शांश्च मैथुनान् ॥ एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ॥ १८ ॥ तथैवोक्तं ॥ येन गंधान् रसान् रूपं स्पर्शांश्छब्दान् रतिक्रियां

---

अशी आकांक्षा आली तर एकभाजनस्थल सांगतात. ( १२ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, "कर्माणि०" ( अर्थ ) सर्व कर्में, विज्ञानस्वरूप आत्मा ( शरण ) नाशरहित पराशिवलिंगाच्या ठिकाणीं समरस होतात. ( १३ ) तसेंच सूत्रार्णवांत सांगितलें कीं "प्रभुणा" ( अर्थ ) हे शिवा, प्रभु अशा तुझ्यासह ज्याचें चित्त मिळून गेलें आहे; तो एकटाच प्रभुसंबंधीं सर्व संपत्तीला भाजन ( पात्र ) होतो. ( १४ ) आणि शिवसूत्रांत सांगितलें कीं "विद्भाजनं०" ( अर्थ ) बाह्य भाजनांपेक्षां ज्ञानभाजन हें श्रेष्ठ आहे. कारण ही भासत असलेली प्रपंचरूप वस्तु ज्ञानभाजनालाच पात्र आहे. सर्वाश्रय झालेले बाकीचे तसे नाहींत. ( १५ ) "एवं०" ( अर्थ ) याप्रमाणें महालिंगाच्या ठिकाणीं एक भाजन झालेला लिंगैक्य हा त्या महालिंगाशीं समरसभावानें परमानंद सुखामध्यें सुखीभूत भेदाचा कसा होतो ? अशी आकांक्षा आल्यानंतर सहभोजनस्थल सांगतात ( १६ ) तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें कीं "यो वेद०" ( अर्थ ) परमाकाशरूप गुहेमध्यें सन्निहित झालेल्या वस्तूला जो जाणतो, तो ज्ञानरूप परब्रम्ह्यासह सर्व भोग भोगतो. ( १७ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं "एवं०" ( अर्थ ) याप्रमाणें हें सर्व लिंगार्पित आहे असें जो जाणतो, तो ज्ञानरूपी परब्रम्ह्यासह सर्व भोग भोगतो. ( १८ ) आणि कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं "येन" ( अर्थ ) ज्या परब्रह्मस्वरूपानें जो ज्ञानी रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श, रतिसंपर्क हे सर्व जाणतो, तर त्याला या लोकांत बाकीचें कोणतें राहिलें ? ( १९ ) तसेंच पुनः वातुलागमांत सांगितलें कीं, "येन" ( अर्थ ) ज्या परब्रह्मस्वरूपाच्या योगानें जो ज्ञानी गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द,

एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ॥ १९ ॥ तत्रैव ॥ लिंगदेही शिवात्म्यैको लिंगाचारी न लौकिकः ॥ सर्वं लिंगमयं प्रोक्तं लिंगेन सह सोऽश्नुते ॥ २० ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीर-शैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे अंगस्थलनिरूपणे ऐक्यस्थलनिरूपणं नाम षष्ठं प्रकरणं समाप्तम् ॥

---

रतिसुख हे सर्व जाणतो. त्याला या लोकांत बाकीचें कोणतें राहिलें ? ( २० ) तेथेंच पुनः सांगितलें कीं " लिंगदेही " ( अर्थ ) शिवलिंगाशीं समरस झालेला, शिवस्वरूप झालेला तो लिंगाचारी लौकिक कांहीं नव्हे. त्याला सर्व लिंगमयच झालेलें असें सांगि-तलें आहे; तर तो लिंगासह सर्व भोग भोगतो.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनें रचलेल्या परमवीर-शैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील अंगस्थल-निरूपणांतील ऐक्यस्थलनिरूपण नांवाचें साहावें प्रकरण संपलें.

# उत्तरार्धे प्रथमं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः ॥ एवं चतुश्चत्वारिंशदंगस्थलविशिष्टपट्स्थलांगशरणस्य मनःस्थले स्थैर्यंगतलिंगस्थलविचारः कथमित्याकांक्षायामनंतरं दीक्षागुरुस्थलमित्युच्यते ॥ तत्रापि प्रथमादिष्टभक्तस्थलान्तर्गत गुरुकारुण्याश्रितभक्तस्याचारलिंगं पुनस्तस्यैव गुरुलिंगजंगमरूपेण त्रैविध्यं प्रथममंगस्थल एव प्रतिपाद्य तद्भेदोपदेशार्थं लिंगपट्स्थलमुपन्यस्यति ॥ भक्तोपास्यमानाचारलिंगमेव गुरुलिंगजंगमरूपेण त्रिविधं भवति पुनस्तदेव प्रत्येकं प्रत्येकं त्रिविधं त्रिविधं भवति ॥१॥ तथाच ॥ भक्त एव गुरुत्रयमपि त्यागांगभोगांगयोगांगस्वरूपत्वेनानुसंधाय त्रिविधगुरुकारुण्यात् त्रिविधांगे त्रिविधलिंगं च संबध्य क्रमेण तथाविधलिंगचैतन्यरूपं स्वयचरपररूपजंगममेवेति निश्चित्य तज्जंगममेव प्राणस्तदेव मंत्र तन्मंत्रोच्चारणपरश्च भक्तः त्रिविधजंगमस्य दासोऽहंभावेन स्थातव्यः ॥ २ ॥ ननु पूर्वं इमे लिंगमंगमित्यत्र कुंडलिन्याद्युपाधिरहितस्य परमशिवस्य लिंगत्वमुक्त्वा अविद्याद्युपाधिरहितस्यात्मन एव अंगत्वं

---

# उत्तरार्ध १ प्रकरण.

श्रीशिवाय नमः ॥ १ ॥ " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें ४४ अंगस्थलांनींयुक्त पट्स्थलांगांनींयुक्त असलेल्या शरणाच्या मनस्थलांत स्थिरपणा पावलेल्या लिंगस्थलाचा विचार कसा होईल, अशी आकांक्षा आल्यानंतर दीक्षागुरुस्थल सांगतात. त्यांतूनही प्रथम सांगितलेल्या भक्तस्थलांत अंतर्गत झालेल्या व गुरु कारुण्याचा आश्रय केलेल्या भक्ताच्या आचारलिंगाला व पुनः त्या अंगस्थलामध्येंच त्या आचारलिंगाला गुरु, लिंग, जंगमरूपानें त्रैविध्य ( तीन प्रकार ) प्रतिपादन करून त्यांतील भेदांचा उपदेश करण्याकरितां लिंगपट्स्थलांचा उपदेश करतो. भक्ताला उपासना करावयास योग्य असें तें आचारलिंगच गुरु, लिंग, जंगम यां रूपानें तीन प्रकारचें होतें. नंतर पुनः तेंच प्रत्येक प्रत्येक तीन तीन प्रकारचें होतें. तसेंच ( २ ) " भक्त एव० " ( अर्थ ) भक्तच दीक्षागुरु, शिक्षागुरु, ज्ञानगुरु या गुरुत्रयाला ( तीन तऱ्हेच्या गुरूंला ) त्यागांग, भोगांग' योगांग, यां स्वरूपानें अनुसंधान करून तीन प्रकारच्या गुरुकारुण्यापासून त्रिविध अंगस्थलामध्यें त्रिविधलिंगस्थलाचा संबंध करून क्रमानें तशातऱ्हेचें लिंगचैतन्यरूप स्वय, चर, पर, जंगम हेंच आहेत, असा निश्चय करून तें जंगमलिंगच प्राण आहे, तेंच मंत्र आहे, असा निश्चय करून मंत्रोच्चार करण्यांत तत्पर अशा भक्तानें त्रिविध जंगमांचा दास मी आहें, अशा भावानें राहावें. ( ३ ) " ननु० " ( अर्थ ) शंकाकार येथें शंका अशी घेतो कीं, अहो, प्रथम " इमे लिंगमंग " या ठिकाणीं कुंडलिनीशक्ति वगैरे उपाधींनी रहित अशा परशिवाला लिंगत्व सांगून अविद्या वगैरे उपाधींनी रहित अशा आत्म्यालाच अंगत्व सांगितलें.

प्रतिपादितमिदानीं तु शिवयोगीश्वरस्यांगित्वमभिप्रेत्य तदीयेषु क्रियादिदीक्षात्रयशुद्धेषु अंगत्रयेषु लिंगत्रयं द्योततइत्युक्तत्वात् एकस्यैवात्मनस्तत्रांगत्वकथनमत्रांगित्वकथनं च विरुध्यते ॥ ३ ॥ किंच अंगशब्दस्य देहवाचकत्वं वा जीववाचकत्वं वाऽप्राधान्यवाचकत्वं वा न प्रथमः विभुत्वादात्मनः कार्यात्मकजडवस्तुवत्सांशत्वं न घटते न द्वितीयः "अमिति ब्रह्मसन्मात्रं गच्छतीति गमुच्यत" इति वचनाद्देहाद्देहांतरं प्रति संसरतोऽहंकारादितत्वयुक्तस्य जीवस्य सकलतत्वातीतेन लिंगेन सह संबंधायोगात् न तृतीयः ॥ संबंधरूपां क्रियां प्रति संबंधिनोरुभयोरपि मुख्यत्वादंगत्रयसंबंधत्वेन आत्मन अंगित्वादेकस्यैव लिंगस्य संबंधायोगात् ॥ लिंगांगसंबंध एव न घटत इति चेत् लोके कान्ताकान्तसामुद्रनादेयजलादिसंबंधित्वे समानेऽप्येकस्य मुख्यत्वमन्यस्यामुख्यत्वं यथा तथैव लिंगांगसंबंधे संबंधं प्रति सृष्ट्यादिद्वारेणानादिप्रवृत्तत्वाल्लिंगस्य मुख्यत्वं ॥ दीक्षानंतरप्रवृत्तत्वेनामुख्यत्वान्मुमुक्षुरंगत्वात्तस्याप्यंगरूपस्य मुमुक्षोर्लिंगात्मकेन परशिवेन सह संबंधोऽप्यंगत्रयदीक्षात्रय

---

परंतु आतां शिवयोगीश्वरांचे ठिकाणीं अंगित्वाचा अंगिकार करून तत्संबंधीं व क्रियादि दीक्षात्रयानें शुद्ध झालेल्या अंगत्रयामध्यें लिंगत्रय प्रकाशतें; असें सांगितल्यामुळें एकाच आत्म्याला अंगत्व सांगणें आणि अंगित्वही सांगणें ह्मणजे परस्पर विरोध येत नाहीं काय? (४) आणखी दुसरें असें कीं, अंगशब्द देहवाचक आहे? किंवा जीव वाचक आहे? किंवा अप्राधान्यवाचक आहे? असें विचारिलें असतां प्रथम विचारलेला अर्थ (देह वाचक हा) बरोबर होत नाहीं; कारण आत्मा हा पूर्ण असल्यामुळें कार्यरूप जड वस्तूप्रमाणें सांशत्व संभवत नाहीं. आतां दुसरा अर्थही (जीववाचक हा) बरोबर नाहीं कारण "अमिति ब्रह्मसन्मात्रं गच्छतीति गमुच्यते" या वचनावरून या देहांतून दुसऱ्या देहाला जाणाऱ्या अहंकारादिकांनींयुक्त असलेल्या जीवाला सकल तत्वापलीकडे असलेल्या लिंगाशीं संबंध कधीहीं जुळत नाहीं. आतां तिसरा अर्थही बरोबर नाहीं कारण संबंधरूप क्रियेला दोन्हीसंबंधीं (संबंध असलेले दोन्हीं पदार्थ) मुख्य असल्यामुळें अंगत्रयाचा संबंध असलेला आत्मा हा अंगीं असल्यामुळें एकट्या लिंगाचा संबंध अंगीला जुळत नाहीं. अर्थात याच्यावरून आह्मी असें ह्मणतों कीं लिंगांगसंबंधच संभवत नाहीं, अशी शंका आली तर सांगतात कीं "लोके कांताकांत" (अर्थ) जगामध्यें स्त्री आणि पुरुष, व समुद्राचें पाणी आणि नदीचें पाणी यांच्यामध्यें जो संबंध आहे, तो परस्पर एक असला तरी त्यांमध्यें एक मुख्य असून दुसरें गौण आहे, असें दृष्टीस पडतें; तसें लिंगांगाच्या संबंधामध्यें असलेल्या एका संबंधाला सृष्ट्यादिकांच्या द्वारानें अनादिकालापासून प्रवृत्त असल्यामुळें लिंगाला मुख्यत्व येतें (लिंगाच्यासंबंधाला मुख्यत्व येतें) दीक्षा झाल्यानंतर प्रवृत्त होत असल्यामुळें त्याला (अंगाच्या संबंधाला) मुख्यत्व येत नाहीं,

लिंगत्रयोपाधिना भवतीति त्रिप्रकारः ॥ ४ ॥ तत्र जातिकुलाद्यभिमानाश्रयस्थूलशरीरोपाहितस्यांगसंज्ञकस्यात्मन एव इष्टलिंगेन सह संबंधः ॥ त्रिंशत्तत्वात्मकसूक्ष्मशरीरव्याप्तात्मनः प्राणलिंगेन सह संबंधः शुद्धाशुद्धभोगसाधनशुद्धाशुद्धमायाविभेदनेन तनुकरणाद्यंकुरोत्पादनकारणस्य ज्ञानक्रियारूपस्यात्मनोऽज्ञताव्यापादनकारणस्य स्वयमकारणकोऽप्यनादिनिबिडकारणस्यांजनस्योपरितया वर्तमानस्यात्मनश्च निर्विकारनिजचैतन्यरूपेण महालिंगेन सहानवच्छिन्नात्मकः परमसंबंधः इति त्रिविधसंबंधोऽस्यांगित्वस्यौपचारिकत्वादंगसंज्ञकस्यात्मनः लिंगसंज्ञकेन शिवेन सह संबंधमिति युक्तं ॥ ५ ॥ " कठवल्युपनिषदि " ॥ श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वंतोऽपि बहवो यं न विद्युः आचार्योऽस्य वक्ता कुशलोऽपि लब्धः आचार्यो ज्ञाता कुशलोऽनुशिष्टः ॥ ६ ॥ तथा योगसारे ॥ शुद्धां यः शांभवीं दीक्षां करोति गुरुरुत्तमः ॥ तस्मै दद्यात्स्वमात्मानं पूज्यो वंद्यः स सद्गुरुः ॥ ७ ॥ तथा स्वायंभुव-

---

म्हणूनच मुमुक्षु हा अंग असल्यामुळें अंगरूपीं त्या मुमुक्षूलाहीं लिंगरूपीं परशिवासह संबंध तर अंगत्रय, दीक्षात्रय, लिंगत्रयरूपी उपाधीनें होतो, असे तीन प्रकार होतात. ( ५ ) " तत्र " ( अर्थ ) ( त्यांतल्या तीन प्रकारामध्यें ) जाति कुलादिकांच्या अभिमानाला आश्रय दिलेल्या स्थूलशरीररूप उपाधि असलेल्या अंग नांवाच्या आत्म्यालाच इष्टलिंगाशीं संबंध होतो. त्रिंशत्तत्वात्मक ( तीस तत्वें ज्यांत आहेत, अशा ) सूक्ष्मशरीरासह व्यापिलेल्या आत्म्याला प्राणलिंगाशीं सह संबंध होतो. शुद्धाशुद्ध भोगांस साधन झालेल्या, व शुद्धाशुद्ध मायेच्या विभेदानें अनुकरण वगैरे ( शरीर वगैरे ) अंकुराच्या उत्पत्तीला कारण अशा ज्ञानक्रियारूपीं आत्म्याच्या ( स्वताच्या ) अज्ञानाला दूर करण्याविषयीं कारण झालेल्या व स्वतः कारणरहित असचा तरी अनादि दाट कारण झालेल्या मायेच्या पलीकडे असलेल्या आत्म्याला विकाररहित निजचैतन्यरूप महालिंगाशीं सह विच्छेदरहित उत्कृष्ट संबंध होतो. याप्रमाणें तीन प्रकारचा संबंध अंगित्वाला औपचारिक असल्यामुळें अंगनांवाच्या आत्म्याला लिंगनांवाच्या शिवाशीं सह संबंध होतो, म्हणून जें सांगितलें; तें बरोबर आहे. ( ६ ) कठवल्युपनिषदांत सांगितलें कीं, " श्रवणायापि० " ( अर्थ ) ऐकण्याकरितां पुष्कळांनीं यत्न केले तरी जो शिव मिळत नाहीं; आणि ऐकिलें तरी पुष्कळ लोक त्या शिवाला जाणत नाहींत. शिवतत्व सांगणारा गुरु चतुर जरी असला तथापि शिष्यही चतुर असावा लागतो. आचार्य ( गुरु ) हा जाणता असून कुशल असला तर तो उपदेश करावयास योग्य होतो. ( ७ ) तसेंच योगसारांत म्हटलें आहे कीं,—" शुद्धां० " ( अर्थ ) जो श्रेष्ठ गुरु शुद्ध शिवदीक्षा देतो; त्या गुरुला आपला आत्मा समर्पण करावा. तो गुरु पूज्य असून वंद्य आहे. ( ८ ) तसेंच स्वायंभुवसूत्रांत सांगितलें कीं, " स्वदेशिक० " ( अर्थ ) गुरुला शरण गेल्या

सूत्रे ॥ स्वदेशिकमनुप्राप्य दीक्षाविच्छिन्नबंधनः ॥ प्रयाति शिवसायुज्यं निर्ममो निरुपप्लवः ॥ ८ ॥ किंच सुज्ञानोत्तरसूत्रे ॥ तत्वैरेभिर्निबद्धात्मा सर्वधर्मैश्च संयुतः ॥ नान्येन शक्यते मोक्तुं मुक्त्वा दीक्षां शिवात्मिकां ॥ ९ ॥ किंच मतंगपारमेश्वरे ॥ वृत्तं ॥ दीक्षानलप्लुष्टमलस्य जन्तोः स्वात्म्यं बलं व्यक्तिमुपैति योगात् ॥ शक्त्या विभोश्चुंबितहृत्प्रदेशो नान्येन पुंसो विनिवृत्तिमेति ॥ १० ॥ किंच स्वायंभुवसूत्रे ॥ अनेन क्रमयोगेन परां केवलतां गतः ॥ अनाद्यशुद्धिशून्यत्वात्प्राप्नोति न भवांतरं ॥ ११ ॥ किंच वातुलतंत्रे ॥ तनुत्रयगतानादिमलत्रयमसौ गुरुः ॥ दीक्षात्रयेण निर्दग्ध्वा लिंगत्रयमुपादिशत् ॥ १२ ॥ एकमेव परं लिंगमंगेऽस्मिन्सुप्रतिष्ठितं ॥ सर्वतो मुखमाभाति नामरूपक्रियात्मना ॥ १३ ॥ इष्टलिंगं तु बाह्यांगे प्राणलिंगं तथान्तरे ॥ भावलिंगं सदैवात्मसंगेऽस्मिन्सुप्रतिष्ठितं ॥१४॥ एवमुपदेशार्थं दीक्षागुरुस्वरूपप्राप्तलिंगस्य शिक्षामुखेन बोधस्वरूपप्राप्तिभेदः कथ-

---

नंतर गुरूनें दिलेल्या दीक्षेच्या योगानें बंधनें सगळीं तुटून जातात, नंतर तो (शिष्य) ममतारहित, व उपद्रवरहित होऊन शिवसायुज्याला जातो. ( ९ ) आणि सुज्ञानोत्तरसूत्रांत सांगितलें कीं, " तत्वै० " ( अर्थ ) शिवस्वरूप दीक्षेशिवाय आत्मज्ञान वगैरेनें व इतर सर्व धर्मांनीं युक्त असलेला व सर्व यां तत्वांनीं बांधला गेलेला आत्मा मुक्त होण्यास समर्थ होत नाहीं. ( १० ) आणि मतंगपारमेश्वरांत सांगितलें कीं, "दीक्षा०" ( अर्थ ) दीक्षारूप अग्नीनें ज्याचे मल परिपक्व झाले आहेत, अशा मानवाचें आपलें दृक्क्रियारूप सामर्थ्य शिवयोगानें अभिव्यक्त होतें. व ज्याचा हृदयाचा प्रदेश शिवाच्या अनुग्राहक शक्तीनें चुंबिलेला आहे: ( ज्यावर शिवाचा अनुग्रह झालेला आहे ) तो मुक्त होतो; आणि तो दुसऱ्या कशानेंही पुनः जन्माला येत नाहीं. " ( ११ ) आणि स्वायंभुवसूत्रांत सांगितलें कीं, " अनेन० " ( अर्थ ) कर्मक्षय, मलपरिपाक, शक्तिपात, गुरूपसदन वगैरे क्रमांनीं युक्त शिवदीक्षेनें उत्कृष्ट मोक्षाला पावलेला मानव आदिरहित मलांनीं शून्य झालेला असल्यामुळें जन्मांतराला जात नाहीं. ( १२ ) आणि वातुलागमांत सांगितलें कीं, " तनुत्रय० " ( अर्थ ) स्थूल, सूक्ष्म, कारण शरीरांमध्यें असलेल्या आणवादि मलत्रयाला वेधा, मांत्री, क्रिया या दीक्षात्रयानें जाळून हा गुरु त्रिविध लिंगाचा उपदेश करतो. १३ " एकमेव० " ( अर्थ ) या अंगस्थलांमध्यें चांगल्या तऱ्हेनें प्रतिष्ठित झालेलें इष्टलिंग एकच असून तें आहे. तें इष्टलिंग सर्वतोमुख होऊन नामरूपक्रियास्वरूपानें प्रकाशते. ( १४ ) " इष्टलिंगं० " ( अर्थ ) इष्टलिंग हें बाह्य स्थूलशरीरावर प्रतिष्ठित झालेलें असून प्राणलिंग हें सूक्ष्मशरीरावर प्रतिष्ठित झालेलें असतें. आणि भावलिंग हें सर्वदा आत्म्याच्या सहवासामध्यें प्रतिष्ठित झालेलें असतें. ( १५ ) " एवमुपदेशार्थ० " ( अर्थ ) याप्रमाणें उपदेशा-

मित्याकांक्षायामनंतरं शिक्षागुरुस्थलमित्युच्यते ॥ १६ ॥ "यजुर्वेदोपनिषदि" ॥ वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति सत्यं वद ॥ धर्मं चर॥ स्वाध्यायान्मा प्रमदः भूत्यै न प्रमदितव्यं ॥ मातृदेवो भव ॥ पितृदेवो भव ॥ आचार्यदेवो भव ॥ अतिथिदेवो भव॥ यान्यनवद्यानि कर्माणि॥ तानि सेवितव्यानि ॥ नो इतराणि ॥ यान्यस्माकꣳसु-चरितानि ॥ तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ॥ एप आदेश एप उपदेशः ॥१६॥ तथा वीरागमे ॥ तल्लिंगं जंगमात्मेति बहुशो जंगमैः कृतः ॥ सम्यग्बोधश्च-तत्पूजा शिक्षेति कथिताऽनघे ॥ १७ ॥ किंच शिवाद्वैते ॥ पूर्वपक्षतया येन विश्वमाभास्य भेदतः ॥ अभेदोत्तरपक्षान्तर्नीयते तं स्तुमः शिवं ॥ १८ ॥ चं-द्रावलोकने ॥ कुलाचाररताः संति बहवो गुरवो मुने ॥ कुलाचारविहीनस्तु गु-

---

करितां दीक्षागुरूच्या स्वरूपाला पावलेल्या लिंगाला शिक्षामुखानें बोधस्वरूपाला पाव-लेला भेद कसा येतो ? अशी आकांक्षा आल्यानंतर शिक्षागुरुस्थल सांगतात. ( १६ यजुर्वेदोपनिषदांत सांगितलें कीं, "वेदमनूच्या०" ( अर्थ ) आचार्य हा प्र-थम ज्ञानोपदेश करून नंतर शिष्याला अनुशासन करतो. तें असें कीं, हे शि-ष्या, तूं खरें बोल, धर्मानें वाग, स्वाध्यायाला चुकवूं नकोस, ऐश्वर्याला भुलूं नकोस. + पूर्वाश्रय निरस्त माहेश्वराला + "माताच पार्वती देवी पिता योऽयं महे-श्वरः ॥ जातिभेदः सतां नास्ति शिवसंस्कारभक्तिमान्" या वातुलागम वचनाला अनुसरून श्री पार्वतीदेवीला मातोश्री समजून तिच्या सेवेंत तत्पर रहा. त्याचप्रमाणें वरच्या वचनाला अनुसरून साक्षात् श्रीशिवाला पिता समजून त्याच्या सेवेंत तत्पर रहा. "आचिनोति च शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि ॥ स्वयमाचरते यस्मादाचार्यस्तेन कथ्यते" या वासिष्ठ वचनाला अनुसरून गुरूला देव समजून रहा. "सर्वलोकोपकाराय यो देवः परमेश्वरः ॥ चरत्यातिथिरूपेण नमस्ते जंगमात्मने" या वीरागम वचनाला अनुसरून जंगमाला ईश्वर समजून रहा. जीं निर्दोष कर्में असतील, तींच कर्में कर, शिवागमांत न सांगितलेलीं इतर कर्में करूं नका, जीं आमचीं शिवचरित्रें असतील, तींच ऐकत जा, शिवचरित्रांशिवाय इतर चरित्रें ऐकूं नको; हाच तुला माझा उपदेश आहे. हाच तुला माझा उपदेश आहे ( १७ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, "तल्लिंग०" ( अर्थ ) पापसंहार करणारे हे देवि, तें दीक्षागुरुनांवाचें लिंग जंगमस्वरूप असें प्रायशः जंगममूर्तींनीं चांगला बोध केला आहे. त्या करितां पूजेला योग्य शिक्षागुरु असें सांगितलें आहे. ( १८ ) आणि शिवाद्वैतांत सांगितलें कीं, "पूर्वपक्षतया०" ( अर्थ ) पूर्वपक्षाच्या वेळेला परस्पर भेदभावानें जगाचा आभास दाखवून उत्तरपक्षाच्या वेळीं वीरशैवशास्त्राच्या सिद्धांताच्या रीतीनें अभेद दाखवून जग कोठें लीन होतें; हें ज्यानें दाखविलें; त्या शिवाला नमस्कार असो. ( १९ ) चंद्रावलोकनांत सांगितलें कीं,

स्तरेकोऽपि दुर्लभः ॥ १९ ॥ तथा योगशतके ॥ वृत्तम् ॥ न स्याज्जन्म यथा तथा गुरुवरः सेव्यः स नोड्डीशवन्नो नाव्यागमतर्कतंत्रहतधीर्नोबाह्यविज्ञानवित् ॥ शिष्यान्तर्गतसंशयच्छिदमलं स्वं स्वेन विज्ञापयन्नास्ते यस्तु गुरुः स धन्य उदितो नान्यः स्वमौढ्यप्रदः ॥ २० ॥ किंच तंत्रसारे ॥ सुंदरः सुमुखः स्वच्छः सुलभः सर्वतंत्रवित् ॥ असंशयः संशयछिन्निरपेक्षो गुरुर्मतः ॥ २१ ॥ एवं शिक्षागुरुस्वरूपं प्राप्तलिंगं सुज्ञानकटाक्षोन्मीलननिमित्तेन ज्ञानगुरुस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायमनंतरं ज्ञानगुरुस्थलमित्युच्यते ॥ २२ ॥ " मुण्डकोपनिषदि " ॥ तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशांतचित्ताय शमान्विताय ॥ येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्वतो ब्रह्मवियां ॥ २३ ॥ तथैवोक्तं वीरागमे ॥ स्वपूर्वजन्मसत्कर्म-

---

" कुलाचाररताः " (अर्थ) हे मुनीश्वरा, कुलाचारांत रत असलेले गुरु पुष्कळ सांपडतील, परंतु कुलचारांपासून वेगळा राहिलेला गुरु एकही सांपडत नाहीं. (२०) तसेंच योगशतकांत सांगितलें कीं, " नस्याज्जन्म० " पुनः आपल्याला जन्म कधींहीं येऊं नये, अशा तऱ्हेचा गुरु पाहून त्याची सेवा करावी. उड्डीशाप्रमाणें करूं नये. भरतशास्त्र, इतर आगम, तर्कशास्त्र पूर्वपक्षीय मीमांसाशास्त्र यांनीं ज्याची वुद्धि नष्ट झाली आहे; तशा गुरूची सेवा करूं नये. बाह्य (विषय) ज्ञान असलेल्या गुरूची सेवा करूं नये. जो गुरु शिष्याच्या मनांतील संशय दूर करतो, व आणवादिमलरहित स्वस्वरूपज्ञान करून देतो; तो गुरु करावा. तोच गुरु धन्य होय. या शिवाय इतर गुरु केला असतां त्या गुरूपासून त्याचें अज्ञान मात्र मिळेल. (२१) आणि तंत्रसारांत सांगितलें कीं, " सुंदरः० " (अर्थ) गुरु करावयाचा असेल तर पुढें सांगितल्याप्रमाणें करावा. सुंदर असून त्याचें तोंड चांगलें असावें. स्वच्छ असून सुलभ असावा. सर्वतंत्र (शिवागम) जाणणारा असून संशयरहित असावा. संशय दूर करणारा असून आशारहित असावा. असा गुरु श्रेष्ठ आहे, असें सर्व संमत आहे. (२२) " एवं " (अर्थ) शिक्षागुरुस्वरूप पावलेलें लिंग सुज्ञानरूपी कटाक्ष उघडून पाहिलेल्या निमित्तानें ज्ञानगुरुस्वरूप पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानगुरुस्थल सांगतात. (२३) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " तस्मै० " (अर्थ) गुरूला शरण आलेला, चांगल्या तऱ्हेनें मन शांत केलेला. शमगुणानें युक्त असलेला, त्या शिष्याला विद्वान गुरूनें ज्या ज्ञानानें नाशरहित, सद्रूप, परशिवाला जाणिलें असेल, ती परब्रह्मविद्या यथार्थ रीतीनें त्यानें सांगावी. (२४) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " स्वपूर्व० " (अर्थ) पूर्व जन्मामध्यें केलेल्या आपल्या सत्कर्मांनीं शिवपूजा, शिवभक्ति, आपणच मनामध्यें काय उत्पन्न होते, तिला स्वानुभाव असें

वासनाभिः शिवार्चना ॥ शिवभक्तिः स्वयं चित्ते स्वानुभाव इति स्मृतः ॥२४॥ तथा वासिष्ठे ॥ दुर्वारसंशयध्वान्तनिरोधित्वे चिदंशुमान् ॥ गुरुश्च ज्ञानमेवोक्तः स्वानुभूत्यात्मतत्ववित् ॥ २५ ॥ किंच शिवधर्मोत्तरे ॥ ज्ञानमूलं गुरुः प्रोक्तः सः प्रशस्तः प्रवर्तकः ॥ ज्ञानेन तु महासिद्धो भवेद्योगीश्वरस्थितिः ॥ २६ ॥ एवं त्रिविधगुरुस्वरुपैक्यीभूतलिंगमेव शरणांगे इष्टलिंगस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं क्रियालिंगस्थलमित्युच्यते ॥ २७ ॥ " अथर्वशिरउपनिषदि " ॥ रुद्र एकत्वमाह रुद्रं शाश्वतं वै पुराणं इष्टमूर्जं तपसानुयच्छते ॥ २८ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ सकलं दृक्कलाग्राह्यमिष्टलिंगस्थलं महत् ॥ इष्टावाप्तिकरं साक्षादनिष्टपरिहारकं ॥ २९ ॥ इष्टमूर्जं स्वभक्तानामनुयच्छति सर्वदा ॥ इष्टलिंगमिति प्राह तस्मादाथर्वणी श्रुतिः ॥ ३० ॥ एवमंगाभ्यस्तक्रियालिंगे भावे पूर्णे सत्यनंतरं भावलिंगस्थलमित्युच्यते ॥ ३१ ॥ " श्वेताश्वतरोपनिषदि " ॥ भावग्राह्यमनिलाख्यं भावाभावकरं शिवं ॥ कलसर्गकरं देवं ये विदुस्ते जहुस्तमः ॥ ३२ ॥ तथैवोक्तं

---

ह्मणतात. ( २५ ) तसेंच वासिष्ठामध्यें सांगितलें कीं, " दुर्वार:० " ( अर्थ ) स्वानुभवानें आत्मतत्व जाणणारा गुरूच अनिवार संशयरूपी अज्ञानांधःकार निवारण करण्याविषयीं चिद्रूपी किरण असलेला ज्ञानसूर्य होय. ( २६ ) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, " ज्ञानमूलं० " ( अर्थ ) गुरु हा ज्ञानाला कारण आहे, असें सांगितलें आहे. तो गुरु ज्ञान देतो, असें वर्णन करितात. ज्ञानानेंच मोठा सिद्धपुरुष होतो; योगीश्वर होतो; अशी मर्यादा आहे. ( २७ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविधगुरुस्वरूपैक्य पावलेलें लिंगच शरणांगस्थलांत इष्टलिंगस्वरूप पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर क्रियालिंगस्थल सांगतात. ( २८ ) अथर्वशिरउपनिषदांत सांगितलें कीं, " रुद्र० " ( अर्थ ) श्री शिवाच्या ठिकाणीं एकत्व सांगितलें आहे; शिवतत्व हें शाश्वत असून अनादिसिद्ध आहे इष्ट असें क्रियालिंग असून पूज्य आहे, असें तें शिवतत्व तपश्चर्येनें मिळतें. ( २९।३० ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, "सकलं०" (अर्थ) श्रेष्ठ असें इष्टलिंगस्थल सावयव ( अवयवसहित ) होऊन नेत्रेंद्रियानें स्वीकार करावयास योग्य होऊन इष्टार्थ देणारें होऊन प्रत्यक्ष अनिष्ट परिहार करणारें होऊन आपल्या भक्तांना इष्ट मनोरथ सर्वदा देतें. याकरितां त्याला इष्टलिंग असें आथर्वणी श्रुति सांगते. ( ३१ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें अंगाभ्यास केलेल्या क्रियालिंगाच्या ठिकाणीं भाव पूर्ण झाला असता भावलिंगस्थल सांगतात. ( ३२ ) श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितलें कीं, " भाव० " ( अर्थ ) अंतःकरणानें स्वीकार करावयास योग्य, व वर्णनामाला अतीत असलेलें, सदसद्व्यवहारकारक, मंगलकर, ब्रह्मादिकल्पाची सृष्टि करणारें, अशा जोतिर्मयलिंगाला जे योगीश्वर जाणतात, ते अज्ञान सोडतात. ( ३३ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " निष्कलं० " ( अर्थ ) भावलिंग हें अंतःकरणाला

वातुले ॥ निष्कलं भावलिंगं स्याद्भावग्राह्यं परात्परं ॥ सन्मात्रं भावलिंगं स्यादिति निश्चा महात्मनां ॥ ३३ ॥ किंच महाभारते ॥ न काष्ठे विद्यते देवो न शिलायां न कर्दमे ॥ भावे तु विद्यते देवस्तस्माद्भावेन भाव्यते ॥ ३४ ॥ एवं भावपूर्णसद्भावरूपलिंगे महाज्ञानस्वरूपप्राप्तौ सत्यामनंतरं ज्ञानलिंगस्थलमित्युच्यते ॥ ३५ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ॥ ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्वस्ततस्तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥ ३६ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ परात्परं तु यत्प्रोक्तं ज्ञानलिंगं तदुच्यते ॥ भावनातीतमव्यक्तं परं ब्रह्म शिवाभिधं ॥ ३७ ॥ किंच स्कांदे ॥ अपि संत्यक्तसर्वार्था नियमार्थं हि योगिनः ॥ संभाव्य ज्ञानलिंगं हि रमन्ते हृदयान्तरे ॥ ३८ ॥ किंच सिद्धान्तशेखरे ॥ आनंदलक्षणा तृप्तिर्निरुपाधितया स्थिता ॥ तदुत्थानंदसांद्रत्वं ज्ञानलिंगं तु तृप्तिदं ॥ ३९ ॥ एवं त्रिविधलिंगस्वरूपैकीभूतलिंगं शरणस्य स्वभाव-

---

ग्राह्य ( स्वीकार करावयास योग्य ) असून श्रेष्ठापेक्षां श्रेष्ठ आहे. कलारहित असून भावलिंग हें सत्वस्वरूप आहे. याप्रमाणें महात्म्यांनीं निश्चय केला आहे. ( ३४ ) आणि महाभारतांत सांगितलें कीं, " न काष्ठे० " ( अर्थ ) लांकडांत शिव नाहीं, दगडांत शिव नाहीं, चिखलांत शिव नाहीं, भावांत मात्र शिव आहे, याकरितां अंतःकरणानें शिवतत्व मिळविलें पाहिजे. ( ३५ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें भावपूर्ण सद्भावरूपलिंगाच्या ठिकाणीं महाज्ञानस्वरूपाची प्राप्ति झाली ह्मणजे नंतर ज्ञानलिंगस्थल सांगतात. ( ३६ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " न चक्षुषा० " डोळ्यांला तो शिव दिसत नाहीं, वाणीला सांपडत नाहीं, इतर ब्रह्मादि देवांना सांपडला नाहीं, तपश्चर्येनें मिळत नाहीं, कर्मानें मिळत नाहीं, तर ज्ञानप्रसादानें शुद्धसत्व होऊन निष्कल शिवाचें ध्यान केलें असतां तो ध्यानी शिवाला पाहतो. ( ३७ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " परात्परं० " ( अर्थ ) सर्व श्रेष्ठ वस्तूंपेक्षां जें श्रेष्ठ आहे, त्याला ज्ञानलिंग ह्मणतात. हें ज्ञानलिंग भावनेच्याही पलीकडे असून अव्यक्त आहे. यालाच परब्रह्म असें ह्मणत असून शिवतत्व असेंही ह्मणतात. ( ४८ ) आणि स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " अपि० " ( अर्थ ) योगी लोक सर्व विषयांचा त्याग करून आचाराकरितांच ज्ञानलिंगाला हृदयाच्या मध्यभागीं ध्यान करून क्रीडा करतात. ( ३९ ) आणि सिद्धांतशेखरांत सागितलें कीं, " आनंद० ( अर्थ ) आनंद नांवाचीं तृप्ति उपाधिरहित आहे, त्या तृप्तीनें उत्पन्न झालेल्या घनानंदाला ज्ञानलिंग ह्मणतात, तें ज्ञानलिंग परमतृप्ति देतें. ( ४० ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविधलिंगस्वरूपैक्य पावलेलें ज्ञानलिंग शरणाच्या स्वभावगुणीं निश्चल भेद कसा होतो ?

गुणे निश्चलीभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं स्वयस्थलमित्युच्यते ॥ ४० ॥ " अथर्वशिखोपनिषदि " ॥ सम्यक् समस्तानपि पदान् जयति स्वयं ब्रह्म भवत्येष सिद्धिकरः ॥ ४१ ॥ तथैवोक्तं वीरागमे ॥ आत्मलिंगपरिज्ञानानंदी[1] स शिवलांछनः बाह्यकर्मपरित्यागी स स्वयं लिंगमुच्यते ॥ ४२ ॥ तथा स्कांदे ॥ ध्यानं शैवं तथा भिक्षा नित्यमेकान्तशीलता ॥ यतश्चत्वारि कर्माणि पंचमं नोपपद्यते ॥ ४३ ॥ सूतसंहितायां ॥ दातॄनपि जनान् भक्तान् याचित्वार्थं सुदुर्लभं ॥ क्षुभितस्तदभावेन क्षोभयेन्न कदाचन ॥ ४४ ॥ किंच वासिष्ठे ॥ विधिना शिवभावेन सत्कृत्य भयभक्तितः ॥ आददीत मुनिर्दत्तं तद्भैक्ष्यममृतं भवेत् ॥ ४५ ॥ शिवधर्मोत्तरे ॥ तदेवाश्रद्धया दत्तं नाददीत कदाचन ॥ अनन्यमानसः शान्तः शिवविद्यां जपेत्सदा ॥ ॥ ४६ ॥ किंच वासिष्ठे ॥ सर्वत्र समताशून्यः सर्वत्र समतायुतः ॥

---

अशी आकांक्षा आल्यानंतर स्वयस्थल सांगतात. ( ४१ ) अथर्वशिखोपनिषदांत सांगितलें कीं, " सम्यक्० " ( अर्थ ) चांगल्या रीतीनें सर्व ब्रह्मादि पदांला आपण जिंकून तो स्वयजंगम परब्रह्मस्वरूप होतो. हा स्वयजंगम सर्वसिद्धिकर आहे. ( ४२ ) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " आत्म० " ( अर्थ ) प्राणलिंगाच्या ज्ञानानें आनंद पावलेला तो स्वयजंगम शिवलांछनांनीं युक्त असतो; आणि बाह्य कर्मांचा त्याग करून तो वीरमोहेश्वर स्वयलिंग असें ह्मणवून घेतो. ( ४३ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " ध्यानं० " ( अर्थ ) शिवध्यान, भिक्षा, निरंतर एकांतवास करणें' नियमितपणा हीं चार कर्मेंच आहेत पांचवें कर्म कधींही जगांत उपपन्न होत नाहीं ( मिळत नाहीं ) ( ४४ ) सूतसंहितेंत सांगितलें कीं, " दातॄन्० " ( अर्थ ) दानशूर भक्तजनांकडे जाऊन न मिळण्यासारखी वस्तु मागून ती वस्तु नाहीं मिळाली ह्मणजे त्यामुळें आपण क्षुभित होऊन त्या दात्याला कधींही क्षोभवूं नये. ( ४५ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " विधिना० " ( अर्थ ) शिवाच्या ठिकाणीं भाव ठेवून भयभक्तीनें विधिपूर्वक सत्कार करून भिक्षा वाढावी. ती भिक्षा याच प्रकारानें सत्कारपूर्वक मुनीनें घ्यावी. तें भैक्ष्य त्याला अमृताप्रमाणें होतें. ( ४६ ) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, " तदेवाश्रद्धया० " ( अर्थ ) तेंच भैक्ष्य अश्रद्धेनें दिलें तर कधींही घेऊं नये. दुसरीकडे मन न ठेवितां शांतपणें शिवविद्येचा जप सर्वदां करावा ( ४७ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " सर्वत्र० " ( अर्थ ) सर्वत्र समत्व न ठेवणारा, सर्वत्र समत्व ठेवणारा, वृक्षाच्या मुळाशीं झोपडी बांधलेला असून केवळ मोक्षाचीच इच्छा करणारा तो

---

१ ( पाठान्तरं ) नंदीशः शिवलांछनः

॥ वृक्षमूलनिकेतश्च मुमुक्षुरिह शस्यते ॥ ४७ ॥ तथा स्कांदे ॥ सर्वारंभपरित्यागो भैक्ष्यास्यं वृक्षमूलिता ॥ निष्परिग्रहताद्रोहः समतायोगिवर्तनं ॥ ४८ ॥ एवं स्वभावे निश्चलीभूतलिंगं भक्तिं निमित्तीकृत्य संचारभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं चरस्थलमित्युच्यते ॥ ४९ ॥ परमहंसोपनिषदि ॥ जटां धृत्वा चीरवासाश्च भूत्वा लोकान्वहन्येव चरत्यथ स्वयं ॥ ५० ॥ ऋग्वेदे ॥ चरैवेति चरैवेति चरन्वै मधु विंदति ॥ ५१ ॥ किंच "परमहंसोपनिषदि" एकशाटी परिवृतो मुण्डोदरपात्री भिक्षार्थं ग्रामं प्रविशेदासायं प्रदक्षिणेनाविचिकित्सत् सावर्णिकं भैक्ष्यचर्यमभिशस्तपतितवर्ज्यं ॥ ५२ ॥ यजुर्वेदे ॥ इमान् लोकान् कामाग्निकामरूप्यनुसंचरन्नेतत्सामगायन्नास्ते ॥ ५३ ॥ तथैवोक्तं वीरागमे ॥ शिव-

---

सर्वांस वंद्य होतो. (४८) तसेच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, "सर्वारंभ०" (अर्थ) सर्व व्यवहार सोडलेला, भिक्षान्न खाणारा, वृक्षमूलाचा आश्रय करणारा, परिवार सोडलेला, हिंसा न करणारा, समदृष्टि असणारा असा तो मानव योगी ह्मणवून घेतो. योग्यांची वागणूक याप्रमाणें असते. (४९) "एवं०" (अर्थ) याप्रमाणें स्वभावामध्यें निश्चल झालेलें लिंग भक्तीला निमित्त करून संचारभेद कसा होतो? अशी आकांक्षा आल्यानंतर चरस्थल सांगतात. (५०) परमहंसोपनिषदांत सांगितलें कीं, "जटां०" (अर्थ) जटा धारण करून चीरवस्त्र नेसून लोकांचा भार घेऊन चरजंगमस्वतः जगांत फिरत असतो. (५१) ऋग्वेदांत सांगितलें कीं, "चरैवेति" (अर्थ) याप्रमाणें संचार कर, याप्रमाणें संचार कर, संचार करीतच तो चरजंगम अमृत (मोक्ष) पावतो. आणि (५२) परमहंसोपनिषदांत सांगितलें कीं, "एकशाटी०" (अर्थ) एकशाटी अंगावर घेऊन शिर मुंडून पोटच एक पात्र हातांत घेऊन भिक्षेकरितां गांवांत शिरावें, संध्याकाळपर्यंत मनांत जुगुप्सा (निंद्यभाव) न आणितां फिरावें. "शिवसंस्कारसंपन्ने जातिभेदं न कारयेत्" या शिवरहस्य वचनाला अनुसरून समान (सजाती यांच्या घरीं वर्णाच्या येथें "दंभलोभादिनिर्मुक्तः संतुष्टः संचरेत्सदा ॥ निंदितेभ्योपि नादद्याद्भिक्षां भिक्षारतो मुनिः" या सूतसंहिता वचनाला अनुसरून निंदा करणारे व पतित यांचीं घरें सोडून बाकीच्या घरीं भिक्षा मागावी. (५३) यजुर्वेदांत सांगितलें कीं, "इमान्" (अर्थ) या लोकांमध्यें इच्छित अन्न मागत स्वेच्छेनें येईल तें रूप घेऊन संचार करीत "हाउहाउअहमंनं अहमन्नः अहमन्नं अहमन्नादो अहमन्नादो अहमन्नादः" ही सामश्रुति गात "हा" नांवाचा शिवात्मक प्रसादमंत्र व "उ" नांवाचा चिच्छक्ति मंत्र गात शिवयोगीश्वर जगांत फिरतो. (५४) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, "शिवलिंगा०"

लिंगादभेदात्मा तन्निक्षिप्तेंद्रियव्रजः ॥ स्वेच्छाविहारी स्वानंदः स चरं लिंगमुच्यते ॥ ५४ ॥ तथा वातुले व्रत्तम् ॥ अतत्वसंसारविनाशनेन वा श्रुतिप्रमाणेन च तर्कवर्त्मना ॥ प्रबोधमानस्य शिवस्य तं पुनः स्वमेव गायन् विचरेत्स्वलीलया ॥ ५६ ॥ किंच योगसारे ॥ स्वेच्छया चरते क्षोणीं भुंजानो विषयानपि ॥ अकर्तान्तर्बहिःकर्ता स योगी राजयोगिराट् ॥ ५६ ॥ किंच शिवयोगदीपिकयां ॥ पुण्यक्षेत्रेषु सर्वेषु संचरन्नात्मवृत्तये ॥ याचमानो जनान् साधून् न जातु क्लेशयेत्कृशान् ॥ ५७ ॥ तथा वातुलतंत्रे ॥ यथा मध्वाददानोऽपि भृंगः पुष्पं न बाधते ॥ तथा माधुकरीं भिक्षामाददीत गृहाधिपात् ॥ ५८ ॥ एवं भक्त्यर्थं संचरितचरलिंगस्य परापरनिर्गमनं कथमित्याकांक्षायामनंतरं परस्थलमित्युच्यते ॥ ५९ ॥ हंसोपनिषदि ॥ आशांबरो न नमस्कारो न स्वधाकारो न निंदास्तुतिर्यादृच्छिको भिक्षुर्नावाहनं न विसर्जनं च मंत्रं न ध्यानं नोपासितं च न लक्ष्यं न पृथ-

---

( अर्थ ) शिवलिंगाशीं व आत्म्याशीं अभेद मानणारा, श्री शिवतत्वाच्या ठिकाणीं सर्व इंद्रियें ठेवलेला, स्वेच्छेनें विहार करणारा, आपल्याच ठिकाणीं आनंद मानणारा, होऊन जो जगांमध्यें फिरतो, त्याला चरजंगम ह्मणतात. ( ५५ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " अतत्व० " ( अर्थ ) परमार्थ रहित संसाराचा नाश करून वेदप्रमाणानें व तर्कमार्गानें शिवाच्या ज्ञानप्रमाणानें त्या शिवाचें गायन करीत लीलेनें शिवयोगीश्वर जगांत फिरतो. ( ५६ ) आणि योगसारांत सांगितलें कीं, " स्वेच्छया " ( अर्थ ) स्वेच्छेनें भूमीवर फिरतो, त्यानें विषयोपभोग घेतला तरी आंतून तो अकर्ता असून बाहेर मात्र कर्त्याप्रमाणें दिसतो, असा तो योगी योग्यांमध्यें राजा ह्मणवून घेतो. ( ५७ ) आणि शिवयोगदीपिकेंत सांगितलें कीं, "पुण्यक्षेत्रेषु०" ( अर्थ ) आपल्या उपजीविकेकरितां सर्व पुण्यक्षेत्रांमध्यें संचार केला तरी लोकांजवळ भिक्षा मागतांना गरीब साधु लोकांना कधींही दुखवूं नये. ( ५८ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " यथा " ( अर्थ ) फुलांतला मकरंद घेणारा भुंगा जसा फुलांला न दुखवितां आंतला आस्वाद तेवढा घेतो, त्याप्रमाणें गृहपतीला न दुखवितां माधुकरी भिक्षा घ्यावी. ( ५९ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें भक्तीकरितां संचार करणाऱ्या चरलिंगाला परापर निर्गमन कसें ? अशी आकांक्षा आली असतां परस्थल सांगतात. ( ६० ) हंसोपनिषदांत सांगितलें कीं, " आशां० " ( अर्थ ) शिवयोगीश्वर हा दिगंबर होऊन नमस्कार स्वधाकाररहित होऊन निंदास्तुतिरहित होऊन दैवेच्छेनें मिळालेल्या पदार्थावर संतोष मानून आवाहनविसर्जनाची अपेक्षा न करतां मंत्राची इच्छा न धरतां ध्यान न करतां उपास्यरहित होऊन लक्ष्यपदार्थ सोडून प्रत्येक प्रत्येक ठिकाणीं नियमित

गपृथक् सर्वत्रानिकेतस्थितिरेव भिक्षुः ॥ ६० ॥ तथैवोक्तं ॥ वीरागमे ॥ सदाशिवस्य तत्वस्य यदधिष्ठानमुत्तमं ॥ स्थावरं लिंगमेवैतत्परलिंगमुदीरितं ॥६१॥ तथा भगवद्गीतायां ॥ तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ॥ अनिकेत स्थिरमतिर्भक्तिमान् यः स मे प्रियः ॥ ६२ ॥ वातुलेऽपि ॥ लिंगं शिवो भवेत्क्षेत्रमंगं संयोग आश्रयः ॥ तस्माल्लिंगांगसंयुक्तो योऽपि सोऽत्याश्रमी भवेत् ॥ ६३ ॥ किंच देविकालोत्तरे ॥ हेतुर्नास्ति फलं नास्ति नास्ति कर्म स्वभावतः ॥ असद्भूतमिदं सर्वं नास्ति लोको न लौकिकः ॥ ६४ ॥ नात्र पूजा नमस्कारो न जपो ध्यानमेव च ॥ केवलं ज्ञेयमित्युक्तं वेदितव्यं न किंच न ॥ ६५ ॥ किंच योगार्णवे ॥ वर्णाश्रमाभिमानेन श्रुतेर्दासो भवेन्नरः ॥ अभिमानविहीनश्चेद्वर्तते श्रुतिमूर्धनि ॥ ६६ ॥ सूतसंहितायां ॥ यस्य वर्णाश्रमाचारो गलितः स्वात्मदर्शनात् ॥ स वर्णानाश्रमान्सर्वानतीत्य स्वात्मनि स्थितः ॥ ६७ ॥ तंत्रांतरे ॥ त्यक्तसंसारकलवः कलावानपि निष्कलः ॥ यस्सचित्तोऽप्यचित्तस्तु स जीवन्मुक्त

---

स्थिति न ठेवतां संचार करतो, तोच भिक्षु असें ह्मणवून घेतो. (६१) तसेंच वीरागमांत सांगितलें कीं, " सदाशिवस्य० " (अर्थ) सदाशिवतत्वाला अधिष्ठान झालेलें श्रेष्ठ स्थावरलिंग जें असेल, त्यालाच परलिंग असें ह्मणतात. (६२) तसेंच भगवद्गीतेमध्यें सांगितलें कीं " तुल्य० " (अर्थ) निंदास्तुतिसमान मानणारा, मौन करणारा, सर्वदा कोणत्याही पदार्थानें संतुष्ट असणारा, एका ठिकाणीं न राहणारा, स्थिरबुद्धि असलेला, भक्तियुक्त असा जो असेल, तो मला प्रिय आहे. (६३) वातुलागमांत सांगितलें कीं " लिंगं० " (अर्थ) लिंग शिव असून अंग हें क्षेत्र आहे; या दोहोंच्या संयोगाला आश्रय ह्मणतात. याकरितां जो लिंगागसंयोग करणारा असेल, त्याला अत्याश्रमी असें ह्मणतात. (६४) आणि देवीकालोत्तरांत सांगितलें कीं, " हेतुर्नास्ति० " (अर्थ) हेतु नाहीं, फल नाहीं, स्वभावतः कर्म नाहीं, हें सर्व जग खोटें असून लोक नाहीं, आणि लौकिक नाहीं. (६५) " नात्र० " (अर्थ) या जगांत पूजा नाहीं, नमस्कार नाहीं, जप नाहीं, ध्यान नाहीं, परंतु एक ज्ञेयवस्तु (समजून घेण्यास योग्य) मात्र आहे. त्या परवस्तूशिवाय दुसरें कांहीं समजून घ्यावयाचें नाहीं. (६६) आणि योगार्णवांत सांगितलें कीं, " वर्णाश्र० " (अर्थ) वर्णाश्रमांचा अभिमान धरला तर मनुष्य श्रुतीचा दास होतो. अभिमान सोडला तर मात्र श्रुतीच्या मस्तकावर वागतो. (६७) सूतसंहितेंत सांगितलें कीं " यस्य० " (अर्थ) स्वस्वरूप परशिवाच्या दर्शनानें ज्याचा वर्णाश्रमाचार गलित (नाहींसा) झाला आहे, तो वर्णाश्रमाचारांपलीकडे स्वस्वरूपाच्या ठिकाणींच राहतो. (६८) तंत्रांतरांत सांगितलें कीं, " त्यक्त० " (अर्थ) संसारांतील कला ज्यानें सोडिल्या आहेत, कदाचित् कलायुक्त

उच्यते ॥ ६८ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे आचारलिंगस्थलं नाम प्रथमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

असून निष्कल आहे, त्याचें मन असून नसल्यासारखें आहे. तो जीवन्मुक्त म्हणवून घेतो.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील लिंगस्थलनिरूपणांतील आचारलिंगस्थलनिरूपण नांवाचें पहिलें प्रकरण संपलें.

# द्वितीयं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः ॥ एवं जंगमलिंगस्थलत्रितयैकीभूतलिंगं वीरमाहेश्वरस्य सत्क्रियायामागमस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं क्रियागमस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ अथ परजंगमस्थलशिरोमणित्वेन परिपूर्णाचारलिंगस्वरूपं तदवान्तरभेदांश्च सम्यगुपदिश्य तदनंतरं परजंगमैकशरणत्वेन कृतकृत्यस्य माहेश्वरस्य शरणभूतपरजंगममेव गुरुस्तस्यैव नवविधस्थलत्वेन चोपास्यत्वं प्रतिपादयितुं तदधिकारिणो माहेश्वरस्यागमलिंगत्रैविध्येन व्रतशीलाचारनिष्ठरूपादिकं माहेश्वरस्थलप्रतिपादिताचारनिष्ठत्वेनैव लिंगनिष्ठान्वितत्वं कायलिंगत्रैविध्यावग्रहणं पूर्वाश्रयाद्यष्टमूर्त्यन्तनिरासकत्वं चाचारलिंगत्रैविध्येन सर्वगतनिरासकत्वं च शिवजगन्मयत्वं च प्रतिष्ठाप्य तस्मिन् लिंगे भक्तदेहिकलिंगमिति निश्चयमधिगत्य नवविधगुरुलिंगविचारः कर्तव्यः ॥ २ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ तदेतत्सत्यमंत्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यन् तानि त्रेतायां बहुधा संततानि तान्याचरत नियतं सत्यकामा एष वः पंथाः सुकृतस्य लोके ॥ ३ ॥ तथा सिद्धांतशिखामणौ ॥

---

## उ. २ प्रकरण भाषांतर.

श्रीशिवाय नमः ॥ १ ॥ “ एवं० ” ( अर्थ ) तिन्हीं जंगमलिंगस्थल मिळून एक झालेलें लिंग वीरमाहेश्वराच्या सत्क्रियेमध्यें आगमस्वरूप पावलेला भेद कसा ? अशी आकांक्षा आल्यानंतर क्रियागमस्थल सांगतात. ( २ ) “ अथ ” ( अर्थ० ) नंतर पर जंगमस्थलाला शिरोमणि असल्यामुळें परिपूर्णाचारलिंगस्वरूपाला त्यांतील अवांतर भेदांला चांगल्या रीतीनें सांगन नंतर परजंगमच मुख्य शरण असल्यामुळें कृतार्थ झालेल्या माहेश्वराला शरण असें परजंगमच गुरु आहे, त्यालाच नवविधस्थलत्व ( तो गुरु नऊ प्रकारचा ) असल्यामुळें उपास्यत्व प्रतिपादन करण्याकरितां त्याला अधिकारी अशा माहेश्वराला त्रिविध आगमलिंगांनीं व्रत, शील, आचार वगैरे आणि माहेश्वरस्थलामध्यें सांगितलेल्या त्या दृढ आचारानें लिंगाच्या ठिकाणीं निष्ठा असणें, आणि त्रिविध कायलिंगाचें ग्रहण करणें, व पूर्वाश्रयादि अष्टमूर्तीपर्यंत निरास करणें, व त्रिविध आचारलिंगांनीं सर्वगतनिरासकत्व, शिवजगन्मयत्व, यांची प्रतिष्ठापना करून त्या लिंगाच्या ठिकाणीं भक्ताच्या देहावरील लिंग आहे, असा निश्चय पावून नवविध गुरुलिंगाचा विचार करावा. ( ३ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं “ तदेत० ” ( अर्थ ) ज्ञाते लोक मंत्रांमध्यें जीं कर्में पाहतात, तीं कर्में त्रेतायुगांत प्रायशः फल देत होतीं. याकरितां सत्स्वरूपाचा लाभ करून घेणारे ज्ञानीलोक हो, तीं कर्में चोंहोकडे सार्वकाळ करा. तुह्मांला जगांत सुकृताचा हा मार्ग आहे. तेंच हें कर्मचरित्र होय. असा निश्चय झाला आहे. तसेंच सिद्धांतशिखामणींत सांगितलें कीं, ( ४ ) “ प्रकाश० ” ( अर्थ ) अरणीपात्रांत लांकडावांचून अग्नि जसा जळूं शकत

प्रकाशते यथा नाग्निररण्यामिंधनं विना ॥ क्रियां विना तथान्तस्थो न प्रकाशी भवेच्छिवः ॥ ४ ॥ ऋग्वेदे ॥ अयं मे हस्तो भगवानयं मे भगवत्तरः अयं मे विश्वभेषजः अयं शिवाभिमर्शनः अयं माता अयं पिता अयं जीवातुरगमत् इदं तव प्रसर्पणं सुबंधवेहि निरहि ॥ ५ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ धारयेद्यस्तु हस्तेन लिंगाकारं शिवं सदा ॥ तस्य हस्तस्थितं विद्धि मत्पदं संपदां पदं ॥ ६ ॥ यजुर्वेदे ॥ तव श्रियै मरुतो मर्दयन्तः रुद्र यत्ते जनिम चारुचित्रं पदं यद्विष्णोः परमं निधाये ॥ ७ ॥ तथा तात्पर्यसंग्रहे ॥ वृत्तम् ॥ अर्थश्रिया शिवकरोऽपि विरज्यतस्ते श्रीशो यया त्वमसि दासतयाभियुक्तः ॥ अस्याः कृते जनिम चारुविचित्ररूपमभ्यर्चितं तव मरुद्भिरुदाहरंति ॥ ८ ॥ ऋग्वेदे ॥ त्रियंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं ॥ उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥ ९ ॥ तथा लैंग्ये ॥ त्रियंबकं यजेद्देवं सुगंधिं पुष्टिवर्धनं ॥ किं करिष्यति मां मृत्युर्मृत्यो-

---

नाहीं, त्याप्रमाणें क्रियेवांचून आंत असणारा शिव प्रकाशित होत नाहीं. ( ५ ) ऋग्वेदांत सांगितलें कीं " अयं० " ( अर्थ ) हा माझा हात अत्यंत पूज्य आहे. लिंगपीठ झालेला हा माझा डावा हात मायामय प्रपंचरूपी रोगाला औषध आहे. हा माझा हात शिवलिंगाचा स्पर्श करणारा आहे. हा माझा हात माता असून हा हात पिता आहे. हा हातच जीवनौषध होय. हे मित्रा शिवा, हें तुझें शिवलिंग जगाच्या उत्पत्तीला कारण आहे. तूं ये आणि मला सोडून राहूं नकोस. ( ६ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं " धारयेद्यस्तु० " ( अर्थ ) जो मानव आपल्या हातानें सर्वदा लिंगाकार शिवाचें धारण करतो, त्याच्या हातामध्यें संपत्तीचें मोठें स्थान असें माझें पद आहे, असें समज. ( ७ ) यजुर्वेदांत सांगितलें कीं, " तव० " ( अर्थ ) हे शंभो, जें सुंदर, व विष्णूच्या स्थानापेक्षां श्रेष्ठ स्थान आहे तें तुझें जनिम नांवाचें लिंग होय. त्या लिंगाची पूजा सर्व देव ऐश्वर्याच्या लाभाकरितां करतात. तें पद मीं पाहिलें. ( ८ ) तसेंच तात्पर्यसंग्रहांत सांगितलें कीं " अर्थःश्रिया० " ( अर्थ ) हे शिवा, तूं अर्थश्रीनें शुभकर जरी आहेस, तथापि विरक्तशील तुझ्याकरितां विष्णु दासभावानें युक्त होऊन राहिला आहे. या दास भावाकरितांच देव सर्व सुंदर तुझ्या शिवलिंगाची पूजा करतात, असें सांगतात. (९) ऋग्वेदांत सांगितलें कीं, " त्रियंबकं० " ( अर्थ ) तीन डोळे असणारा, सर्व पदार्थांमध्यें फुलांतील सुगंधाप्रमाणें राहणारा, प्रकृतिपुरुषांला पुष्टि देणारा, अशा शिवलिंगाची पूजा करून निश्चयानें मृत्युरूपी बंधनापासून पक्या वाळ्काप्रमाणें मुक्त होतो. ( १० ) तसेंच लिंगपुराणांत सांगितलें कीं " त्रियंबकं० " ( अर्थ ) डोळे तीन ज्याला आहेत, व सर्व पदार्थांमध्यें फुलांतील परिमलाप्रमाणें जो राहिला आहे, प्रकृतिपुरुषांला जो पुष्टि देतो, अशा देवाची पूजा मी करतो; मग मला मृत्यु काय करील ? नंतर मी

मृत्युरहं तथा ॥ १० ॥ एवं क्रियागमस्वरूपापन्नलिंगं माहेश्वरस्य भावागमस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भावागमस्थलमित्युच्यते ॥ ११ ॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ यं यदा यथोपासते तदेव भवति यद्भावं तद्भवति यथाकारी यथाचारी तथा भवति ॥ १२ ॥ तथा योगार्णवे ॥ ज्योतिरूपं शिवं पूर्णं विश्वतेजोऽतिवर्तिनं ॥ आशयं भासयन्तं च भावयन् तन्मयो भवेत् ॥१३॥ कामिकागमेऽपि ॥ अनिर्देश्यमनौपम्यं विधिविष्णुप्रमोहजित् ॥ महोदारं महालिंगं भावयेदनिशं बुधः ॥ १४ ॥ एवं निष्ठासंपन्नमेव भूत्वा भावसद्भावसन्निहितालिंगं माहेश्वरस्य ज्ञानागमस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञानागमस्थलमित्युच्यते ॥ १५ ॥ कैवल्योपनिषदि ॥ आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिं ॥ ज्ञाननिर्मथनाभ्यासात्पाशं दहति पंडितः ॥ १६॥ तथा चाग्नेयपुराणे ॥ शास्त्रसज्जनसत्कार्यैः सम्यक् संशिक्षितैर्बुधैः ॥ ज्ञानस्याभिगमः शश्वद्विज्ञेयो ज्ञानवर्त्मगैः ॥ १७ ॥ सूतसंहितायां च ॥ विकल्परहितं तत्त्वं ज्ञानमानंदमद्वयं ॥ ये

---

मृत्यूला देखील मृत्यु होतो. ( ११ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें क्रियागमस्वरूप पावलेलं लिंग माहेश्वराला भावागमस्वरूपाचा भेद कसा प्राप्त होतो ? अशी आकांक्षा आल्यानंतर भावागमस्थल सांगतात. ( १२ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " यं यदा० " ( अर्थ ) पराशिवलिंगाची उपासना जेव्हां जशी करतो, तशा रीतीनें तें परशिवलिंग फलद्रूप होईल. त्यावर जसा भाव ठेवील, त्याप्रमाणें त्याला फल मिळेल, कोणत्या आकारानें पूजा करील त्या आकारानें तें फळ देईल. ( १३ ) तसेंच योगार्णवांत सांगितलें कीं " ज्योतिरूपं० " ( अर्थ ) प्रकाशस्वरूप, पूर्ण, जगाचें तेज वाढविणारा, अंतःकरणांत भासणारा, अशा शिवावर जशी भावना ठेवावी, त्या भावाप्रमाणें त्या शिवाचें रूप बनतें. ( १४ ) कामिकागमांत सांगितलें कीं, " अनिर्देश्य० " ( अर्थ ) सांगावयास अशक्य, उपमारहित, विधिविष्णूचा मोह काढणारें, अतिशय उत्कृष्ट अशा शिवलिंगावर ज्ञानी मनुष्यानें भावना ठेवावी. ( १५ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें निष्ठासंपन्न होऊन भावसद्भावानें सन्निहित झालेलें शिवलिंग माहेश्वराला ज्ञानागमस्वरूपाचा भेद कसा प्राप्त होतो ? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानागमस्थल सांगतात. ( १६ ) कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं, " आत्मानं० " ( अर्थ ) आपल्या आत्म्याला अरणीपात्र करून प्रणवाला वरची अरणि करून ज्ञानरूपी रवीनें मंथन केलें असतां पंडित मानव पाश सर्व जाळून टाकतो. ( १७ ) तसेंच आग्नेयपुराणांत सांगितलें कीं, " शास्त्र० " ( अर्थ ) ज्ञानमार्गानें चालणाऱ्या मानवांनीं शास्त्र, सज्जन, सत्कार्य, चांगलें शिक्षण यांहीं ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन नेहमीं शिवसाक्षात्कार करून घ्यावा. ( १८ ) सूतसंहितेंत सांगितलें कीं, " विकल्प० " ( अर्थ ) विकल्प

पश्यंति विमुक्तास्ते जीवन्तोऽपि न संशयः ॥१८॥ किंच ॥ सिद्धान्तरहस्ये ॥ न शास्त्रोक्तैश्च नियमैर्नियम्य क्वापि कर्हिचित् ॥ ज्ञानेनाराधनं शंभोरिदमव्याकुलात्मनां ॥ १९ ॥ शिवधर्मेऽपि ॥ ज्योतिःस्मरणमात्रेण न क्षिणोति यथा तमः ॥ तथा सुज्ञानरहितैः क्रियाद्यैर्न शिवो भवेत् ॥ ॥ २० ॥ एवमागमलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं माहेश्वरस्य सर्वांगमथनेन लिंगकायसंबंधस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्यांकांक्षायामनंतरं सकायस्थलमित्युच्यते ॥ २१ ॥ बृहदारण्यकोपानपदि ॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥ किमिच्छन्कस्य कामाय शरीरमिह संज्वरेत् ॥२२॥ किंच ॥ छांदोग्योपनिषदि ॥ शरीरं भिक्षया वसनेनालंकारेण संस्कुर्वन्नेतेन ह्यमुं लोकं जेष्यन्तो मन्यन्ते ॥ २३ ॥ तथैवोक्तं त्रिकाण्डसारे ॥ नोचेत्स्थूलादिभिः कार्यैस्तद्धर्मैरपि यंत्रितः ॥ भक्तिं व्यवहरंस्तंद्ज्ञस्स सकाय इतीर्यते ॥ २४ ॥ किंच ॥ शंभुप्रभायां ॥ धार्यते येन कायेन लिंगाकारः शिवः सदा ॥ स एव

---

रहित, ज्ञानस्वरूप, आनंदरूप, सहायरहित अशा शिवतत्वाला जे पाहतात, ते जीवंत असले तरी मुक्तच होत, यांत संशय नाहीं. ( १९ ) आणि सिद्धांतरहस्यांत सांगितलें कीं " न शास्त्रोक्तैश्च० " ( अर्थ ) शास्त्रांत सांगितलेल्या नियमांनीं केव्हांही कोठेंही शिवतत्वदर्शन होत नाहीं. परंतु मन व्याकुळ न करितां श्रीशंभूची आराधना ज्ञानानें करावी. ( २० ) शिवधर्मांतही सांगितलें कीं " ज्योतिःस्मरण० " ( अर्थ ) प्रकाशाचें नुसतें स्मरण केलें तर जसा अंधार दूर जात नाहीं, त्याप्रमाणें उत्तम ज्ञान नसून नुसत्या क्रियादिकांनीं शिवस्वरूप कांहीं मिळत नाहीं. ( २१ ) " एव० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध आगमलिंग एक झालेलें लिंग माहेश्वराला सर्वांगमथनानें लिंग कायसंबंधस्वरूपाच्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर सकायस्थल सांगतात. ( २२ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " आत्मानं० " ( अर्थ ) माहेश्वर पुरुषानें मी ब्रह्मस्वरूप आहे असें परब्रम्ह्याला जाणिलें तर त्याच्या मनांत कोणती इच्छा राहील ? व कोणत्या अभिलाषाकरितां ह्मणून तो आपलें शरीर दंडन करील ? ( २३ ) आणि छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं, " शरीरं० " ( अर्थ ) भिक्षेनें, वस्त्रानें, अलंकारानें आपल्या शरीराला संस्कार देणारे माहेश्वर याच शरीरानें या लोकांत जय मिळवून शिवतत्वाला जाणतात. ( २४ ) तसेंच त्रिकांडसारांत सांगितलें कीं, " नोचेत्स्थूलादिभिः० " ( अर्थ ) निरवयवत्व नसेल तेव्हां (अवयवसहित असेल तेव्हां) स्थूल, सूक्ष्म, कारण वगैरे शरीरांनीं व त्या देहधर्मांनीं बद्ध जरी झालेले ( बांधले गेलेले असले ) तरी ज्ञानी मानव भक्तीनें कार्य करीत असले तर ते सकाय असें ह्मणून घेतात. ( २५ ) आणि शंभुप्रभेंत सांगितलें कीं, " धार्यते० " ( अर्थ ) ज्या देहावर लिंगधारण केलें आहे, त्याला देह असें ह्मणतात. आणि त्या मानवालाच स-

कायस्तेनैव कायवान् परिकीर्त्यते ॥ २५ ॥ तथा देविकालोत्तरे ॥ सर्वद्वंद्वविनिर्मुक्तः सततं जनवर्जितः ॥ अनेनैव शरीरेण सर्वज्ञः सन् प्रकाशते ॥ २६ ॥ वातुलेऽपि ॥ एवं लिंगशरीरं स्यात्परनिर्वाणलक्षणं ॥ तद्भावभावितं साक्षात्तच्चरित्रं पवित्रकं ॥ २७ ॥ एवं माहेश्वरस्य लिंगकायमथनेन निर्देहभावः कथमित्याकांक्षायामनंतरमकायस्थलमित्युच्यते ॥२८॥ छांदोग्योपनिषदि ॥ अस्य शरीरं वा वसंतं सखिप्रियाप्रियं स्पृशतोऽशरीरं वायुरभ्रं विद्युत्स्तनयित्नुरशरीराण्येतानि तद्यथैतान्यमुष्मादाकाशात्समुत्थाय परं ज्योतिरूपं संपाद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते ॥२९॥ किंच कैवल्योपनिषदि ॥ वेदैरनेकैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहं ॥ न पुण्यपापे मम नास्ति नाशो न जन्म देहेंद्रियबुद्धयोऽपि ॥ ३० ॥ तथैवोक्तं स्कांदे ॥ अत्यन्तदृढया भक्त्या शिवतत्त्वैकभावया ॥ गतदेहादिसंसक्तिरकाय इति गीयते ॥ ३१ ॥ किंच शैवरत्नाकरे ॥ तदिष्टलिंगं यद्धाम चिद्रूपस्य परात्मनः ॥ लीनोऽत्र लिंगे यत्कायो निर्देहः स महान् भवेत् ॥ ३२ ॥ एवमकायस्वरूपा-

---

काय असें ह्मणतात. ( २६ ) तसेंच देवीकालोत्तरांत सांगितलें कीं, " सर्वद्वंद्व० " ( अर्थ ) पुण्यपापादि द्वंद्वांपासून मुक्त झालेला, संतत लोकांच्या संगतीपासून दूर असलेला, असा माहेश्वर याच शरीरानें सर्वज्ञ होऊन प्रकाशतो. ( २७ ) वातुलागमांत सांगितलें कीं " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें लिंगरूपी शरीर श्रेष्ठ अशा मोक्षाला कारण झालेलें आहे. त्या लिंगाच्या भावनेनें पुनीत झालेलें साक्षात् त्या शरीराचें चरित्र परम पवित्र आहे. ( २८ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें माहेश्वराला लिंगशरीराच्या मथनानें निर्देहभाव कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर अकायस्थल सांगतात. ( २९ ) छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं " अस्य० " ( अर्थ ) स्नेहयुक्त, प्रियाप्रिय वस्तूचा स्पर्श करणाऱ्या या माहेश्वराचें वसतिस्थान असें हें शरीर असूनही अशरीरच होय. वायु, मेघ, वीज, मेघमाला, हे जसे शरीररहित आहेत, त्याप्रमाणें आकाश तत्वापासून त्या शरीराचें उल्लंघन करून परब्रह्म संपादन करून स्वस्वरूपानें चोहोंकडून प्रकाशतो. (३०) आणि कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं " वेदै० " ( अर्थ ) पुष्कळ वेदांनीं वेद्य ( जाणावयास योग्य ) मीच आहें, व वेदांतशास्त्र करणाराही मीच आहें, वेद जाणणारा मीच आहें, मला पुण्य पाप नाहीं, माझा नाश होत नाहीं, मला जन्म नाहीं, देह, इंद्रिय बुद्धि नाहींत, असें सांगितलें आहे. ( ३१ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं " अत्यंत० " ( अर्थ ) एका शिवतत्वावर चित्त ठेवून दृढ भक्तीनें देह इंद्रिय वगैरे ठिकाणीं आसक्ति न ठेविली तर त्याला अकाय असें ह्मणतात. ( ३२ ) आणि शैवरत्नाकरांत सांगितलें कीं " तदिष्टलिंग " ( अर्थ ) ज्ञानस्वरूपी परमात्म्याची जी मूर्ति असेल, त्याला इष्टलिंग असें ह्मणतात. त्या इष्टलिंगाच्या ठिकाणीं जें शरीर लपलें आहे, तें शरीर असलेला तो महापुरुष अकाय असें ह्मणवून घेतो. ( ३३ ) " एवं "

पन्नलिंगस्य सकलनिष्कलातीतकायभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं परकायस्थलमित्युच्यते ॥ ३३ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ त्रिपु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् ॥ तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः ॥ ३४ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ त्रिपु धामसु यद्भोग्यं भोक्ता यश्च प्रकीर्तितः ॥ उभयं प्रति यो वेद स भुंजानो न लिप्यते ॥ ३५ ॥ तथा स्वायंभुवसूत्रे ॥ शिवधामार्पितस्यास्य भोगभोक्तुर्न जातुचित् ॥ भोक्तृत्वमधिकारित्वं प्रतिकृत्यानुकारिता ॥ ३६ ॥ किंचादित्यपुराणे ॥ स्वेच्छाविग्रहिणः सर्वे स्वेच्छाचारा गणेश्वराः ॥ शिवेन सह ते भोगान् भुक्त्वा यांति शिवं पदं ॥ ३७ ॥ शैवरत्नाकरे ॥ चिदग्निप्लुष्टसंसारबीजांकुरकलेवरः ॥ चिल्लिंगालंबनं यश्च पराख्यांगी सचेरितः ॥ ३८ ॥ एवं कायलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं माहेश्वरस्य सद्धर्मचरित्रार्थमेकीभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं धर्माचारस्थलमित्युच्यते ॥ ३९ ॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति धर्मेण पापमपनुदति धर्मे

---

( अर्थ ) याप्रमाणें अकायस्वरूपानें युक्त अशा लिंगाला सकल निष्कलातीत भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर परकायस्थल सांगतात. ( ३४ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " त्रिपु० " ( अर्थ ) त्रिविध लिंगस्थानांमध्यें जी भोग्य वस्तु, ( भोग घ्यावयास योग्य वस्तु ) भोगणारा, व भोग सांगितले आहेत यां वस्तूंहून ज्ञानस्वरूपी मी सदाशिव विलक्षण असून सर्वसाक्षी आहें. ( ३५ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " त्रिपु० " ( अर्थ ) त्रिविध लिंगस्थानांमध्यें भोग्य, भोक्ता काय सांगितलें आहेत, त्यां भोग्य भोक्त्यांना जो जाणतो, तो विषयोपभोग घेणारा असला तरी त्यांपासून अलिप्त राहतो. ( ३६ ) तसेंच स्वायंभुवसूत्रांत सांगितलें कीं, " शिवधामा० " ( अर्थ ) शिवपदाच्या ठिकाणीं समर्पित झालेल्या भोगोपभोग घेणाऱ्या या शरणाला कधींही भोक्तृत्व, अधिकारिता, व जगत्पति शिवाच्या सृष्टिकार्यांमध्यें सहायता हे कांहीं नाहींत. ( ३७ ) आणि आदित्यपुराणांत सांगितलें कीं, " स्वेच्छा० " ( अर्थ ) सर्व गणेश्वर स्वेच्छेनें शरीर घेणारे असून स्वेच्छेनें संचार करणारे आहेत, आणि शिवासह भोगोपभोग घेऊन भक्तीच्या योगानें शिवपदाला जातात. ( ३८ ) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " चिद० " ( अर्थ ) ज्याच्या शरीरांतील संसाराच्या बीजांकुराला चिद्रूप अग्नीनें स्पर्श केला आहे, ज्ञानलिंगाचें अवलंबन ज्यानें केलें आहे, त्याला परकाय असें ह्मणतात. ( ३९ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध कायलिंग एक झालेलें लिंग माहेश्वराला सद्धर्म चरित्राकरितां एकीभूत भेद कसा प्राप्त होतो? अशी आकांक्षा आल्यानंतर धर्माचारस्थल सांगतात. ( ४० ) तैत्तरीयोपनिषदांत सांगितलें कीं, " धर्मो० " ( अर्थ ) धर्म हा सर्व जगाला आधार आहे. जगांत धर्म करणाऱ्याचा आश्रय लोक करतात.

सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदंति ॥ ४० ॥ वातुले ॥ आचारस्यापरित्यागः सुगृहीतस्य भक्तितः ॥ अपि प्राणात्ययेनायं स धर्माचार उच्यते ॥ ४१ ॥ किंचादित्यपुराणे ॥ धर्मो बहुविधः प्रोक्तो मुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥ तत्राक्षयः परो धर्मः शिवधर्मः सनातनः ॥ ४२ ॥ शैवपुराणेऽपि ॥ उपासीत शिवं शश्वद्धर्मेण विमलेन च ॥ शैवं पदमवाप्नोति परमानंदमव्ययं ॥ ४३ ॥ देविकालोत्तरे ॥ क्रिमिकीटपतंगांश्च तथा देवि वनस्पतीन् ॥ न नाशयेद्बुधो जीवान् परमार्थमतिर्यतः ॥४४॥ तथैव ॥ न मूलोत्पाटनं कुर्यात्पत्रच्छेदं विवर्जयेत् ॥ भूतपीडां न कुर्वीत पुष्पाणां च निकृंतनं ॥ स्वयं पतितपुष्पैस्तु कर्तव्यं शिवपूजनं ॥ ४५ ॥ एवं धर्माचारस्वरूपापन्नलिंगं माहेश्वरस्य मनःस्थले स्थिरीभूतसद्भावचारित्रं कथमित्याकांक्षायामनंतरं भावाचारस्थलमित्युच्यते ॥ ४६ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ वृत्तम् ॥ आरभ्यकर्माणि गुणान्वितानि भावांश्च सर्वान्विनियोजयेद्यः ॥ तेषामभावे कृतकर्मनाशः कर्मक्षये याति स तत्वतोऽन्यः ॥ ४७ ॥ तथा स्कांदे ॥ क्रियावतामपि सदा कुर्वं-

---

धर्मानें पाप नष्ट होतें. धर्माच्या ठिकाणीं सर्व जग प्रतिष्ठित झालें आहे. याकरितां धर्म श्रेष्ठ आहे, असें सांगतात. ( ४१ ) वातुलागमांत सांगितलें कीं, " आचारस्या० " ( अर्थ ) भक्तीनें आपण स्वीकारलेल्या आचाराचा त्याग प्राणत्यागाच्या वेळींही न केला तर त्याला धर्माचार असें ह्मणतात. ( ४२ ) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, " धर्मो० " ( अर्थ ) तत्वज्ञानी मुनींनी धर्म बहुप्रकार आहे, असें सांगितलें आहे. त्यांतमध्यें सनातन शिवधर्म हा अक्षय असून सर्वांत श्रेष्ठ धर्म आहे. ( ४३ ) शैवपुराणांत सांगितलें कीं, " उपासीत० " ( अर्थ ) नेहमीं निर्मळ धर्मानें शिवाची उपासना करावी. ह्मणजे तो अव्ययपरमानंददायक शैव पदाला जातो. ( ४४ ) देवीकालोत्तरांत सांगितलें कीं, " क्रिमि० " ( अर्थ ) हे देवि, क्रिमि, किडे, पक्षी, वनस्पति यांचा नाश ज्ञानी मानवानें करूं नये. कारण परमार्थाच्या ठिकाणीं बुद्धि त्याची गुंतलेली असते. ( ४५ ) " न मूलो० " ( अर्थ ) मुळी उपडूं नये, पानें तोडूं नये, प्राण्यांला पीडा देऊं नये, फुलें तोडूं नये. आपल्या आपण पडलेल्या फुलांनीं शिवपूजा करावी. ( ४६ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें धर्माचारस्वरूपानें युक्त लिंग माहेश्वराच्या मनस्थलांत स्थिरपणें सद्भाव चरित्राचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर भावाचारस्थल सांगतात. ( ४७ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " आरभ्य० " ( अर्थ ) गुणयुक्त कर्मांचा आरंभ करून सर्व भावांची योजना जो करतो, त्यानें सर्व भाव सोडलें असतां त्याच्या कर्मांचा नाश होतो. कर्मक्षय झाल्यानंतर तो निश्चयानें शिवतत्व पावतो. ( ४८ ) तसेंच स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " क्रियावता " ( अर्थ ) कर्म करणारे लोक सत्कर्म जरी करींत असले, तरी त्यांची भावना जर दृढ न-

तामपि सत्क्रियां ॥ विगुणाः स्युः क्रियाः सर्वा विना निश्चलभावनां ॥ ४८ ॥ लैंग्येऽपि ॥ भावशुद्धिस्तु शुद्धिः स्यात्तदाचारानशेपतः ॥ विशुद्धेनैव भावेन भावयेदनिशं बुधः ॥ ४९ ॥ वातुले ॥ क्रियाद्वैतं न कर्तव्यं भावाद्वैतं समाचरेत् ॥ क्रिया निर्वहते या तु भावशुद्धिस्तु शांकरि ॥ ५० ॥ निश्वासकारिकायां ॥ गोदोहमिपुपातं वा नयनोन्मीलमात्रकं ॥ सकृत्परपदे युक्तो न पुनर्भवमाप्नुयात् ।५१। एवं मनोमध्ये सद्भावचारित्रसंबंधिभूतलिंगं माहेश्वरस्य महाज्ञानचारित्रापन्नभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञानाचारस्थलमित्युच्यते ॥ ५२ ॥ छांदोग्योपनिपदि ॥ आत्मसत्यात्मसाक्षी च सत्ताधर्मः प्रतापवान् ॥ न स पापानि कुरुते यस्यात्मा भवति प्रियः ॥५३॥ तत्रैव ॥ सर्वभूतात्मभूतेभ्यः सम्यग्भूतानि पश्यतः॥ देवा हि मार्गे मुह्यन्ति पदज्ञानात्पदैपिणः ॥ ५४ ॥ तथैवोक्तं कामिकागमे ॥ ज्ञानातीतं परं

---

सली तर त्यांच्या सर्व क्रिया निष्फळ होतात. ( ४९ ) लिंगपुराणांत सांगितलें कीं " भाव० " ( अर्थ ) कोणतेही अचार केले तरी भाव शुद्धि असली तर सर्व शुद्धि होते याकरितां ज्ञात्यानें अहोरात्र शुद्ध भावानें भावना करावी. ( ५० ) वातुलागमांत सांगितलें कीं, " क्रिया द्वैतं० " ( अर्थ ) हे पार्वति, क्रियेमध्यें अद्वैत करूं नये. भावामध्यें अद्वैत करावें; अशी जी एक क्रिया करण्यांत येते, त्या क्रियेमध्यें भावशुद्धि असावी. ( ५१ ) निश्वासकारिकेंत सांगितलें कीं, " गोदोह० " ( अर्थ ) गायीची धार काढावयास जितकी वेळ लागते; तितक्या वेळेंत; किंवा बाण सोडल्यानंतर तो बाण इष्ट ठिकाणीं पडावयास जितका वेळ लागतो; तितक्या वेळेंत; किंवा पापणीला पापणी लागावयाला जितका वेळ लागतो, तितक्या वेळेंत एकवार तरी परपदाच्या ठिकाणीं युक्त झाला तर तो पुनः जन्माला येत नाहीं. ( ५२ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें मनामध्यें सद्भावचारित्रासह संबंध असलेलें लिंग माहेश्वराला महाज्ञान चारित्रासह प्राप्त झालेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानाचारस्थल सांगतात. ( ५३ ) छांदोग्योपनिपदांत सांगितलें कीं, " आत्मसत्या० " ( अर्थ ) आपल्या ठिकाणीं सत्यस्वरूप परमात्मलिंगच ज्याला साक्षी होऊन राहिला आहे, अशा व उत्तम ज्ञानाचारानें युक्त असलेल्या व कायिकादि प्रतापासह युक्त असलेल्या ज्या माहेश्वराला परमात्मा प्रिय होतो? तो माहेश्वर संसारांत पापकर्मे करीत नाहीं. (५४) तेथेंच सांगितलें कीं, " सर्व भूतात्म० " ( अर्थ ) सर्व प्राणिमात्रामध्यें चैतन्यस्वरूप शिवयोग्याच्या शरीरापासून सर्व प्राण्यांला पाहणाऱ्या माहेश्वराच्या ज्ञानमार्गामध्यें शिवपदीच्या ज्ञानापासून शिवपदाची इच्छा करणारे देवही मोहित होतात. ( ५५ ) तसेंच कामिकागमांत सांगितलें कीं, " ज्ञानातीतं० " ( अर्थ ) ज्ञानाच्या पलीकडे असलेलें, सर्व तत्वांमध्यें श्रेष्ठ असलेलें, चोहोंकडे मुख असलेलें, अशा केवल आत्मस्वरूपाच्या ठि-

तत्वं केवलं सर्वतोमुखं ॥ केवलात्मस्वरूपं तु ज्ञानरूपेण भावयेत् ॥ ९६ ॥ किंच वासिष्ठे ॥ एवं तत्वे परे शुद्धे धीरो विश्रांतिमाश्रितः ॥ तदेवास्वादयत्यन्तर्बहिर्व्यवहरन्नपि ॥ ९६ ॥ किंच सर्वज्ञानोत्तरे ॥ द्रव्याणां समदर्शी च स मुक्तः सर्वबंधनैः ॥ सर्वं शिवमयं भाति नाशिवं विद्यते क्वचित् ॥ ९७ ॥ तथा देविकालोत्तरे ॥ पंचभूतात्मको देहः शिवस्तत्रैव तिष्ठति ॥ शिवाद्यवनिपर्यन्तो लोकोऽयं शंकरात्मकः ॥ ९८ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे गुरुलिंगस्थलं नाम द्वितीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

कार्णी ज्ञानरूपानें भावना ठेवावी. ( ५६ ) आणि वासिष्ठामध्यें सांगितलें कीं, " एवं तत्वे० " ( अर्थ ) याप्रमाणें शुद्ध परतत्वाच्या ठिकाणीं धीर ( धैर्यशाली ) माहेश्वरानें विश्रांति घेतली असतां तो माहेश्वर बाहेर जरी व्यवहार करीत असला तरी आंत त्या तत्वाचाच आस्वाद घेत असतो. ( ५७ ) आणि सर्व ज्ञानोत्तरांत सांगितलें कीं, " द्रव्याणां० " ( अर्थ ) द्रव्याच्या ठिकाणीं समदृष्टि ज्याची आहे, तो माहेश्वर सर्व बंधनापासून मुक्त होतो. त्या माहेश्वराला जगांत सर्वत्र शिवतत्वच दिसतें; त्याला शिव नसलेलें ठिकाणच दिसत नाहीं. ( ५८ ) तसेंच देवीकालोत्तरांत सांगितलें कीं, "पंचभूतात्मको० " ( अर्थ ) पंचभूतस्वरूप या देहामध्येंच शिव वास करीत आहे. शिवापासून पृथ्वीपर्यंत हा लोक श्रीशंकरस्वरूप आहे.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यानें रचलेल्या परमवीर शैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील लिंगस्थलनिरूपणांतील गुरुलिंगस्थल नांवाचें दुसरें प्रकरण संपलें.

---

# तृतीयं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः॥ एवमाचारलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं लिंगप्रसादिनः शरीरे अवगृहीतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं कायानुग्रहस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ अथ भक्तदेहिकलिंगस्थलविशिष्टमाहेश्वरस्याचारलिंगत्रैविध्यस्थल एव सम्यग्विचार्यमाणे सावधानतया तदेव गुरुलिंगं भवति ॥ तदेव सदाचारसंपत्त्या शिवलिंगं भवति ॥ तस्मिन्नेव शिवलिंगे सर्वार्पितभोगित्वमेव प्रसादित्वं तथा सति तत्रानुग्रहलिंगत्रैविध्ये अविरलो भूत्वा गुरुमहत्वादिशरणमहत्वान्तमाक्रम्यार्पितलिंगत्रैविध्ये तदात्मकः सन् प्रसादमहत्वमेव स्वयं भूत्वा तनुकरणलिंगत्रैविध्ये निजस्वरूपमवलोक्य शिवलिंगसावधानित्वेनैव प्रसादित्वसिद्धिः ॥ २ ॥ कैवल्योपनिषदि ॥ वृत्तम् ॥ विविक्तदेशे च सुखासनस्थः शुचिः समग्रीवशिरःशरीरः ॥ अत्याश्रमस्थः सकलेंद्रियाणि निरुध्य भक्त्या स्वगुरुं प्रणम्य ॥ ३ ॥ तथा वासिष्ठे ॥ भृंगभावनया यद्वत्कीटः स इव जायते ॥ शिवभावाभियोगेन तद्वदेव भवेत्पुमान् ॥ ४ ॥ योगदीपिकायां च

---

# उत्तरार्ध ३ रें प्रकरण.

श्रीशिवाय नमः ॥ १ ॥ " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध आचारलिंग मिळून एक झालेलें लिंग लिंगप्रसादांच्या शरीरामध्यें स्वीकारलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर कायानुग्रहस्थल सांगतात. ( २ ) " अथ " ( अर्थ ) भक्ताच्या शरीरावरील लिंगस्थलानें युक्त असलेल्या माहेश्वराच्या त्रिविध आचारस्थलामध्येंच चांगल्या रीतीनें सावधानपणें विचार केला असतां तेंच गुरुलिंग होतें. तेंच सदाचारसंपत्तीनें युक्त झालें तर शिवलिंग होतें. त्या शिवलिंगामध्येंच सर्व भोगांचें अर्पण केलें असतां त्याला प्रसाद असें ह्मणतात. असें झाल्यानंतर त्यांत त्रिविध अनुग्रहलिंगांमध्यें अविरल ( एक ) होऊन गुरुमहत्व आदिकरून शरणमहत्वापर्यंत स्थलांला व्यापून त्रिविधलिंग अर्पण केल्यानंतर त्या ठिकाणीं तत्स्वरूप होऊन प्रसादमहत्वच स्वतः होऊन त्या त्या तनु, गुण, लिंग अशा त्रिविध लिंगांमध्यें निजस्वरूप पाहून शिवलिंगाच्या ठिकाणीं सावधानपणा ठेविला असतां प्रसादित्वाची सिद्धि मिळते. ( ३ ) कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं, " विविक्त० " ( अर्थ ) एकांत प्रदेशांत सुखासनावर बसून शुचिर्भूत होऊन शरीरांतील गळा व शिर हे अवयव सरळ ठेवून अत्याश्रमांत राहून ( सर्व आश्रम धर्म सोडून ) सर्व इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवून भक्तीनें आपल्या गुरूला नमस्कार करावा. ( ४ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, " भृंगभावनया० " ( अर्थ ) भुंग्याच्या ठिकाणीं कोळी नांवाचा किडा तदाकारवृत्ति ठेवतो; ह्मणून तो जसा शेवटीं भुंगाच होतो, त्याप्रमाणें माहेश्वरानें आपली चित्तवृत्ति शिवाच्या ठिकाणीं तन्मय केली असतां तो माहेश्वरही साक्षात् शिवच होतो. ( ५ ) योगदीपिकेंत सांगितलें कीं, " यथासंस्कारसंपत्त्या " ( अर्थ )

॥ यथा संस्कारसंपत्त्या ब्राह्मणो द्विजतामियात् ॥ तथोपदेशसंपत्त्या स्यात्पुमानप्यलौकिकः ॥५॥ तथा शिवरहस्ये ॥ सर्पदष्टस्य यद्देहं तद्देहं विषदेहवत् ॥ लिंगदष्टस्य यद्देहं तद्देहं लिंगदेहवत् ॥६॥ तत्रैव ॥ तैलयुक्तं च कार्पासं ज्योतिःस्पर्शेन ज्योतिवत् स्नेहयुक्तश्च सद्भक्तो लिंगस्पर्शेन लिंगवत् ॥ ७ ॥ एवं प्रसादिशरीरावगृहीतलिंगं तस्य सर्वेंद्रियमुखसंबंधीभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमिंद्रियानुग्रहस्थलमित्युच्यते ॥८॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं हृदींद्रियाणि मनसा सन्निवेश्य ॥ ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान् स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥ ९ ॥ शिवाद्वैते ॥ बहिर्मुखानींद्रियाणि जनयंति भवोदयं ॥ अन्तर्मुखानि तान्येव संसारक्षयहेतवः ॥१०॥ स्कांदे ॥ मनोबुद्धिरहंकार इंद्रियाणि गुणत्रयं ॥ न स्पृशंति महात्मानं विकारास्तस्य नै वहि ॥ ११ ॥ भगवद्गीतायां ॥ रागद्वेषविहीनैस्तु विषयानिंद्रियैश्चरन्

---

संस्काराच्या योगानें ब्राह्मण हा द्विज कसा म्हणवून घेतो, तसा माहेश्वर हा गुरूच्या उपदेशाच्या योगानें अलौकिक पुरुष होतो. ( ६ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " सर्पदष्टस्य " ( अर्थ ) ज्या शरीराला सर्पदंश झाला असतां त्याचा तो देह जसा विषदेह ( विषमय देह ) होतो, त्याप्रमाणें ज्याचें शरीर ध्यानाच्या योगानें लिंगमय झालें आहे, त्याचा तो देह लिंगदेहच होतो. ( ७ ) तेथेंच सांगितलें कीं, " तैलयुक्तं० " ( अर्थ ) कापूस तेलांत भिजवून जाळिला तर तो जसा प्रकाशमय होतो, तसें अंतःकरण लिंगाच्या ठिकाणीं भक्तानें तन्मय केलें तर तो उत्तम भक्त लिंगाप्रमाणेंच होतो. ( ८ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें प्रसादीच्या शरीरानें स्वीकारलेलें लिंग त्या प्रसादीच्या सर्व इंद्रियांच्या मुखासह संबंध झालेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर इंद्रियानुग्रहस्थल सांगतात. ( ९ ) श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितलें कीं, " त्रिरुन्नतं " ( अर्थ ) ज्ञानी व विवेकी माहेश्वरानें आपलें शरीर तीन ठिकाणीं उंच करून सरळ ठेवून भयंकर व नेहमीं विषयांकडे स्रवणारीं आपलीं इंद्रियें हृदयाच्या ठिकाणीं मनानें ठेवून परब्रह्म नांवाच्या नावेच्या सहायानें संसारसमुद्र तरून जावा. ( १० ) शिवाद्वैतांत सांगितलें कीं, " बहिर्मुखानीं० " ( अर्थ ) इंद्रियांचीं तोंडें बाहेरच्या बाजूला ( विषयांकडे ) ठेविलीं तर तीं इंद्रियें संसारांत जन्म घ्यावयास लावतात. तींच इंद्रियांचीं तोंडें आंतील बाजूला केलीं तर तीं इंद्रियें संसाराच्या नाशाला कारण होतात. इंद्रियें ताब्यांत ठेविलीं तर संसारांतून मुक्त होतो, आणि इंद्रियें विषयांकडे भकत सुटलीं तर मनुष्याला संसार चुकत नाहीं असें तात्पर्य आहे. ( ११ ) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " मनो बुद्धि० " ( अर्थ ) मन, बुद्धि, अहंकार, इंद्रियें, तीन गुण ( सत्व, रज, तम ) हे सर्व माहात्म्या माहेश्वराला शिवत नाहींत. अर्थात् त्यासंबंधीं विकारही त्याला होत नाहींत. ( १२ ) भगवद्गीतेंत सांगितलें कीं, " रागद्वेष० " ( अर्थ ) रागद्वेषरहित इंद्रि-

॥ आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ १२ ॥ एवं सर्वेंद्रियसंबंधालिंगेन प्रसादिनः प्राणस्थलालिंगितभेद:[1] कथमित्याकांक्षायामनंतरं प्राणानुग्रहस्थलमित्युच्यते ॥१३॥ कौशीतकब्राह्मणोपनिषदि ॥ यो वै प्राणः सा प्रज्ञा या प्रज्ञा स प्राणः सहैतावस्मिच्छरीरे वसतः सहोत्क्रामतः ॥ १४ ॥ तथा चंद्रावलोकने ॥ यत्र दृष्टे मनःस्थैर्यं यत्र चैव हि मारुतः ॥ लीनः क्वापि भवेदेवं तस्यायं स्यादनुग्रहः ॥१५॥ किंच स्कांदे ॥ यथा लोहः सुवर्णत्वं प्राप्नोत्यौषधयोगतः ॥ आत्मध्यानात्तथा प्राणः परमात्मत्वमाप्नुयात् ॥ १६ ॥ एवमनुग्रहलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं लिंगप्रसादिनः शरीरार्पितसुखलिंगभूतभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं कायार्पितस्थलमित्युच्यते ॥ १७ ॥ प्रश्नोपनिषदि ॥ अथ यथैतस्मिंच्छरीरे सुखं भवति स यथा सौम्य वयांसि वासवृक्षं संप्रतिष्ठंत एवं ह वै तत्सर्वं परे आत्मनि संप्रतिष्ठते ॥१८॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ यदा योगी निजं देहं शिवाय विनिवेदयेत् ॥ तदा भवति

---

यांनीं विषयोपभोग जरी घेतला तथापि इंद्रियें ताब्यांत ठेवलेला तो मानव प्रसाद पावतो. ( १३ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें सर्वेंद्रियांचा संबंध केलेल्या लिंगानें प्रसादीच्या प्राणस्थलाला आलिंगन केलेला भेद कसा ? अशी आकांक्षा आल्यानंतर प्राणानुग्रहस्थल सांगतात. ( १४ ) कौशीतकब्राह्मणोपनिषदांत सांगितलें कीं, " यो वै प्राणः० " ( अर्थ ) ज्याला प्राण ह्मणतात, त्याला प्रज्ञा असें ह्मणतात. त्या प्रज्ञेला ( त्रैकालिक विवेकाला ) प्राण असें ह्मणतात. या दोनी वस्तु शरीरामध्यें मिळून राहतात आणि मिळूनच बाहेर निघून जातात. ( १५ ) तसेंच चंद्रावलोकनामध्यें सांगितलें कीं, " यत्र० " ( अर्थ ) परब्रह्माच्या ठिकाणीं पाहिलें असतां मनाचा स्थिरपणा दिसून येतो. आणि परब्रह्माच्याठिकाणीं कोठेंही प्राणवायु लीन झालेला दिसतो; त्या मानवाला हा प्राणवायुरूपी अनुग्रह मिळाला आहे, असें समजावें. ( १६ ) आणि स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " यथा० " ( अर्थ ) लोखंडाला कांहीं औषधींचा संपर्क केला तर लोखंडाचें सोनें जसें होतें; त्याप्रमाणें परमात्म्याचें ध्यान केलें तर प्राण हा परमात्मा होतो. ( १७ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध अनुग्रहलिंग मिळून एक झालेलें लिंग लिंगप्रसादीच्या शरीराच्या ठिकाणीं अर्पणमुखानें लिंग झालेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर कायार्पितस्थल सांगतात. ( १८ ) प्रश्नोपनिषदांत सांगितलें कीं, " अथ० " ( अर्थ ) प्राणानुग्रहस्थलानंतर या शरीरामध्यें सुख ह्मणून जो पदार्थ उत्पन्न होतो, तो सुखपदार्थ, हे सौम्य मानवा, जसें पक्षी आपल्यास आश्रय असलेल्या वृक्षांवर जातात, त्याप्रमाणें परब्रह्माच्या ठिकाणीं जातो. ( पक्ष्यांना आश्रयभूत वृक्षाचा लाभ कसा होतो ? त्याप्रमाणें शरीराला सुख मिळावयाचें झाल्यास तें परब्रह्मापासूनच मिळतें. ) ( १९ ) तसेंच शि-

---

१ प्राणलिंगस्थलभेदः

तद्रूपं शिवरूपं न संशयः ॥ १९ ॥ किंच वृहत्कालोत्तरे ॥ संयोगेषु वियोगेषु चाणुमात्रसुखानि च ॥ यः कुर्यादिष्टलिंगे च सावधानी निरंतरं ॥ २० ॥ तथा योगजागमे ॥ यदा शिवाय स्वात्मानं दत्तवान् देशिकात्मने ॥ तदा शैवो भवेद्देवि न ततोऽस्ति पुनर्भवः ॥ २१ ॥ किंच शिवयोगदीपिकायां ॥ चक्षुःप्रीतिविधायीनि प्रेक्षणीयानि यानि च ॥ तानि देहेन संपाद्य शिवाय प्रेक्षयेत्सदा ॥ २२ ॥ एवं शरीरे अर्पितसुखापन्नलिंगं प्रसादिनः अन्तःकरणे अर्पितसुखं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं करणार्पितस्थलमित्युच्यते ॥ २३ ॥ कठवल्ल्युपनिषदि ॥ यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा सह ॥ तस्येंद्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ॥ २४ ॥ तत्रैव ॥ आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेवच ॥ बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ २५ ॥ इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ॥ आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ २६ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥

---

वरहस्यांत सांगितलें कीं, " यदायोगी० " ( अर्थ ) ज्या वेळेस शिवयोगी आपला देह श्रीशिवाला समर्पण करील, तेव्हां त्या शिवयोग्याचें रूप शिवरूपच होतें, यांत संशय नाहीं. ( २० ) आणि वृहत्कालोत्तरांत सांगितलें कीं, " संयोगेषु० " ( अर्थ ) संयोग वियोगामध्यें अणुमात्र सुख काय होतें, तें इष्टलिंगाच्या ठिकाणीं समर्पण केलें तर तो निरंतर सावधानप्रसादी ( भक्तियुक्त प्रसादी ) होतो. ( २१ ) तसेंच योगजागमांत सांगितलें कीं, " यदा० " ( अर्थ ) हे देवि, देशिकस्वरूपी श्रीशिवाला आपल्या आत्म्याचें समर्पण जेव्हां करील, तेव्हां तो शिवस्वरूप पावतो; त्याला पुनर्जन्म येत नाहीं. (२२) आणि शिवयोगदीपिकेंत सांगितलें कीं, " चक्षुः " ( अर्थ ) डोळ्यांस आनंद देणाऱ्या पाहाव-यास योग्य अशा वस्तु ज्या असतील, त्या शरीरानें मिळवून सर्वदा शिवाला दाखवाव्या ( समर्पण कराव्या ) ( २३ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें शरीराच्या ठिकाणीं अर्पितसुखाला पावलेलें लिंग प्रसादीच्या अंतःकरणामध्यें अर्पितसुखाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर करणार्पितस्थल सांगतात. ( २४ ) कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं, " यस्तु० " ( अर्थ ) जो मानव योगयुक्त मनासह परब्रह्मस्वरूप होतो, त्याचीं सर्व इंद्रियें सारथ्याच्या ताब्यांत चांगले घोडे जसे राहतात, त्याप्रमाणें त्याच्या ताब्यांत राहतात. ( २५ ) तेथेंच सांगितलें कीं, " आत्मानं० " ( अर्थ ) आत्मा हा रथिक आहे, असें जाण; शरीर रथ आहे, असें जाण; बुद्धि सारथि आहे, असें जाण. मन रज्जु ( लगाम ) आहे, असें जाण. ( २६ ) " इंद्रियाणि " ( अर्थ ) इंद्रियें घोडे आहेत, असें सांगतात, त्या इंद्रियांमध्यें दिसणारे विषय ( रथ राहाण्याचें ठिकाण ) आहेत, असें सांगतात. परमात्मलिंग त्या प्रसादीच्या इंद्रियमनासह उपभोग घेतें; असें बुद्धिमान लोक सांगतात. ( २७ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " त-

तदन्तःकरणं येन क्रियतेऽन्तः शिवेऽखिलं ॥ यस्यार्पितेऽन्तःकरणः स प्रोक्तः करणार्पकः ॥ २७ ॥ शैवरत्नाकरे ॥ यदिंद्रियगतं किंचिद्यत्सुखं तच्छिवार्पितं ॥ तत्प्रसादं च भोक्तव्यं तदिंद्रियमुखेन च ॥ २८ ॥ वासिष्ठे ॥ एवं विरक्तः स्वेनैव मनसा तत्समर्पयेत् ॥ दर्शनस्पर्शनघ्राणभोजनश्रवणादिकं ॥ २९ ॥ एवमन्तःकरणे समर्पितसुखं प्राप्तलिंगं प्रसादिनः सर्वांगेषु स्वयमेव सर्वार्पित प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भावार्पितस्थलमित्युच्यते ॥ ३० ॥ मैत्रेयोपनिषदि ॥ लयविक्षेपरहितं मनः कृत्वा सुनिश्चलं ॥ यदात्मन्युन्मनीभावं[1] तदा तत्परमं पदं ॥ ३१ ॥ तथा शिवरहस्ये ॥ यत्र भावस्य भाव्यं स्याच्छिवाय परमात्मने ॥ समर्प्यतेऽप्यमादौ यत्तद्भावार्पितमिष्यते ॥ ३२ ॥ तत्रैव ॥ चित्तस्थितपदार्थौघमननं यस्य मानसं ॥ अर्प्यते तन्मनोभावः स स्याद्भावार्पकः शिवे ॥ ३३ ॥ किंच ॥ रुद्रयामले ॥ ईश्वरार्पितभावत्वात्प्रियसंसर्गसंभवैः ॥ विकारैरनतिस्पृष्टो

---

दंतःकरणं० " ( अर्थ ) ज्याच्यायोगानें शिवाच्याठिकाणीं हें सर्व आंत केलें जातें, त्याला अंतःकरण, असें ह्मणतात. ज्याचें अंतःकरण अर्पण केलें असेल, त्याला करणार्पक, असें ह्मणतात. ( २८ ) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " यदिंद्रि० " ( अर्थ ) इंद्रियांला गोचर जें कोणतें सुख असेल, तें सुख शिवाला अर्पण करून त्या इंद्रियांच्या द्वारानें त्या प्रसादाचा उपभोग घ्यावा. ( २९ ) वासिष्ठांत सांगितलें कीं, " एवं विरक्तः " ( अर्थ ) पाहिलेलें, स्पर्श केलेलें, वास घेतलेलें, भोजन केलेलें, ऐकलेलें हें सर्व विरक्तानें आपल्या स्वताच्या मनानें याप्रमाणेंच शिवाला समर्पण करावें. ( ३० ) " एवमंतःकरणे " ( अर्थ ) याप्रमाणें अंतःकरणाच्याठिकाणीं समर्पितसुख पावलेलें लिंग प्रसादीच्या सर्वांगामध्यें स्वताच सर्वार्पित प्राप्तभेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आली असतां भावार्पितस्थल सांगतात. ( ३१ ) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, " लयवि० " ( अर्थ ) लय आणि चांचल्य यांनीं रहित मन होऊन व दृढ होऊन जेव्हां परब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं तेंच मन मनोतीतावस्था पावेल, त्यालाच श्रेष्ठ परपद ह्मणतात. (३२) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " यत्र भावस्य० " ( अर्थ ) ज्या ठिकाणीं भावाचें जें कोणतेंही कृत्य होणारें असेल, जें श्रेष्ठ कृत्य श्रीशिवाला समर्पण केलें जाईल, त्याला भावार्पितस्थल ह्मणतात. ( ३३ ) तेथेंच सांगितलें कीं, " चित्तस्थित० " ( अर्थ ) जें मन मनामध्यें असलेल्या नेक पदार्थांच्या समूहाचें मनन करील, त्याला मनोभाव ह्मणतात. तो मनोभाव शिवाच्या ठिकाणीं अर्पण केला असतां त्याला भावार्पण, असें ह्मणतात. ( ३४ ) आणि रुद्रयामलांत सांगितलें कीं, " ईश्वरार्पित० " ( अर्थ ) ईश्वराच्या

---

१ यदा यात्युन्मनीभावं

भावयुक्तो भवेद्बुधः ॥३४॥ तथा वासिष्ठे ॥ संसर्गं प्रियवर्गस्य शिवस्यैवेति भावयन् ॥ अहंकारप्रहाणेन भावशुद्धिं च विंदति ॥ ३५ ॥ किंच विमर्शनसाहस्र्यां ॥ सर्वेषामर्पको भावस्तं भावं परमे शिवे ॥ समर्पितवतः सम्यक्किमन्यदवशिष्यते ॥ ३६ ॥ वातुले ॥ सर्वांगं लिंगमेव स्यादन्नपानाद्यमर्पितं ॥ प्रसादस्तृप्तिरेव स्यात्सर्वं लिंगमयो भवेत् ॥ ३७॥ तत्रैव भोक्ता भोग्यं भोजयिता सर्वमेतच्चराचरं ॥ भावयन् शिवरूपेण शिवो भवति वस्तुतः ॥ ३८ ॥ एवमर्पितलिंगैत्रविध्यस्थलमेकीभूतलिंगं प्रसादिनि उपदेशमुखेन शिष्यभावं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शिष्यस्थलमित्युच्यते ॥ ३९ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्तास्ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीराः युक्तात्मानः सर्वमेवाविशंति ॥ ४० ॥ तथा वातुले ॥ आकृष्टास्ताडिता वापि ये वि-

---

ठिकाणीं भाव अर्पण केलेला असल्यामुळें प्रियवस्तूच्या संसर्गापासून उत्पन्न झालेल्या विकारांनीं परवश न होतां ज्ञानी मनुष्यानें भावयुक्त व्हावें. ( ३५ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, " संसर्ग० " ( अर्थ ) आवडत्या वर्गाचा संसर्ग झाला असतां तो शिवाचाच आहे, अशी भावना ठेवून अहंकाराचा त्याग केला, तर तो भावशुद्धि पावतो. ( ३६ ) आणि विमर्शनसाहस्रिकेंत सांगितलें कीं, " सर्वेषा० " ( अर्थ ) सर्व वस्तूंच्या ठिकाणीं अर्पण करण्यांत येणारा जो भाव असेल, तो भावच श्रेष्ठ शिवाच्या ठिकाणीं अर्पण केला असतां बाकी काय राहिलें? अर्थात् कांहीं नाहीं. ( ३७ ) वातुलांत सांगितलें कीं, " सर्वांग० " ( अर्थ ) सर्व अंग हें लिंगच आहे, अर्पण केलेलें अन्न पान वगैरे प्रसाद असून तो प्रसादच तृप्ति आहे. अर्थात् सर्व लिंगमयच आहे, यांत संशय नाहीं. ( ३८ ) तेथेंच सांगितलें कीं, " भोक्ता० " ( अर्थ ) उपभोग घेणारा, उपभोग घ्यावयास योग्य वस्तु, उपभोग घेवविणारा, व हें सर्व जीवजडात्मक जग शिवच आहे, अशी भावना ठेविली असतां वस्तुतः तो शिवच होतो. ( ३९ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें अर्पित झालेलें त्रिविधलिंगस्थल मिळून एकीभूत लिंग झालें असतां प्रसादाच्या ठिकाणीं उपदेशाच्या मुखानें शिष्यभाव पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर शिष्यस्थल सांगतात. (४०) मुण्डकोपनिषदांत सांगितलें कीं, " संप्राप्यैन० " ( अर्थ ) ज्ञानाच्या योगानें तृप्त झालेले, कृतार्थ झालेले, राग ( लोभ ) सोडलेले, शांत असलेले, असे ऋषि या शिवाला पावून चोहोंकडून सर्वत्र व्याप्त झालेला अशा शिवाला पावून धीरपणें आत्म्याला आपल्या ताब्यांत ठेवून सर्व अशा शिवाच्या ठिकाणींच प्रवेश करतात. ( ४१ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, " आकृष्टा० " ( अर्थ ) आकर्षण केलें तरी, ताडन केलें तरी ज्यांना विषाद होत नाहीं, ते योग्य असून इंद्रियनिग्रह

पादं न यांति हि ॥ ते योग्याः संयताः शिष्याः शिवसंस्कारकर्मणि ॥ ४१ ॥ शिवाद्वैते ॥ प्रव्हीभावं समासाद्य मनोवाक्कायकर्मभिः ॥ गुरुभक्तिः सदा यस्य स शिष्य इति कथ्यते ॥ ४२ ॥ तत्रैव ॥ ऋजवो मृदवः शुद्धा विनीताः स्थिरचेतसः ॥ शौचाचारसमोपेताः शिष्यास्त्वत्र प्रकीर्तिताः ॥ ४३ ॥ शंभुप्रभायां ॥ प्रशांतं गुरुमभ्येत्य शिवज्ञानामृतांबुधिं ॥ भजेत सततं यस्तु स शिष्य इति कथ्यते ।४४। एवं शिष्यभावापन्नलिंगं प्रसादिनः अंगे शुश्रूषाभावं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शुश्रूषास्थलमित्युच्यते ॥ ४५ ॥ प्रश्नोपनिषदि ॥ स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥ ४६ ॥ किंच केनोपनिषदि ॥ यावदुपाधिपर्यन्तं गुरुं शुश्रूषयेत् ॥ ४७ ॥ किंच पारातश्रुतौ ॥ तस्माच्छुश्रूषुः पुत्राणां हृद्यतमः नेदिष्ठो नेदिष्ठो ब्रह्मणो भवति ॥ ४८ ॥ तथैवोक्तं सिद्धांतशेखरे ॥ गुरुशुश्रूषणं कार्यं गुरोर्वाक्यानुवर्तनं ॥ सदा गुरुपरो नित्यं गुरोराज्ञां न लंघयेत् ॥ ४९ ॥ किंच सूतसंहितायां ॥ परमाद्वैतविज्ञाननिष्ठस्य परयोगिनः ॥ शुश्रूषा शु-

---

केलेले. होत. व असे ते शिष्य शिवसंस्कारकर्माला योग्य होत. ( ४२ ) शिवाद्वैतांत सांगितलें कीं, " प्रव्हीभावं० " ( अर्थ ) मन, वाणी, कर्म यांनीं नम्रपणा पावून सर्वदा गुरूच्या ठिकाणीं भक्ति ज्याची असते, त्याला शिष्य असें ह्मणतात. ( ४३ ) तेथेंच सांगितलें कीं, " ऋजवो० " ( अर्थ ) सरळ, मृदु, ( मऊ ) शुद्ध, विनीत, स्थिरबुद्धीचें, शुद्ध आचारांनीं युक्त असलेले, असे शिष्य असावेत, असें येथें सांगितलें आहे. ( ४४ ) शंभुप्रभेंत सांगितलें कीं, " प्रशांतं " ( अर्थ ) शांत व शिवज्ञानरूप अमृताचा समुद्र अशा गुरूजवळ येऊन जो सतत त्याचें भजन करतो, त्याला शिष्य असें ह्मणतात. (४५) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें शिष्यभाव पावलेलें लिंग प्रसादीच्या अंगामध्यें शुश्रूषाभाव पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर श्रुश्रूषास्थल सांगतात. ( ४६ ) प्रश्नोपनिषदांत सांगितलें कीं, " स तत्र तपसा० " ( अर्थ ) तो शिष्य गुरूच्याठिकाणीं ( गुरूच्या घरीं ) ब्रह्मचर्यानें, श्रद्धेनें संपन्न होऊन तपश्चर्येनें युक्त होऊन राहिला, तर गुरूच्या आनंदाचा अनुभव घेतो ( ४७ ) आणि केनोपनिषदांत सांगितलें कीं, " यावदुपाधि० " ( अर्थ ) उपाधीपर्यंत ( उपाधी जाईपर्यंत ) गुरूची सेवा शिष्यानें करावी ( ४८ ) आणि पारातश्रुतींत सांगितलें कीं, " तस्मा० " ( अर्थ ) त्या कारणास्तव गुरूसेवा करणाऱ्या शिष्यानें गुरुपुत्रांमध्यें ( गुरुपुत्रांपक्षां ) प्रिय होऊन राहिला तर परब्रह्मालाहि प्रिय होतो, किंवा परब्रह्मवस्तूपेक्षां श्रेष्ठ ह्मणविला जातो. ( ४९ ) तसेंच सिद्धांतशेखरांत सांगितलें कीं, " गुरुशुश्रूषणं. " ( अर्थ ) शिष्यानें नेहमीं गुरूची सेवा करावी, नेहमीं गुरूच्या वाक्याला अनुसरून चालावें. नेहमीं गुरूच्या ठिकाणीं आसक्त होऊन राहावें. केव्हांही गुरूची आज्ञा मोडूं नये. ( ५० ) आणि सूतसंहितेंत सांगितलें कीं, " परमाद्वैत "

द्धविद्यायाः साधनं न हि संशयः ॥ ६० ॥ मानवपुराणे ॥ शिवे क्रुद्धे गुरुस्त्राता गुरौ क्रुद्धे न कश्चन ॥ तस्मादिष्टं गुरोः कार्यं कायेन मनसा गिरा ॥ ५१ ॥ यजुर्वेदे ॥ आचार्याय प्रियं धनमाहृत्य ( प्रक्षेपकः ) एवं शुश्रूषाभावापन्नलिंगं प्रसादिनः शरीरे इतरेतराध्यासरहितगुरुशिष्यसामरस्यं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं सेव्यस्थलमित्युच्यते ॥ ६२ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥ क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥६३॥ तथैवोक्तं वातुले ॥ तस्मिन्दृष्टे परे लिंगे निष्कले निरुपाधिके ॥ अस्य जीवस्य कर्माणि क्षीयन्ते सकलानि वै ॥ ६४ ॥ अविद्याहृदयग्रंथिर्भिद्यते शतधाऽपि च ॥ संशया बहुसंकल्पाश्छिद्यन्ते च सहस्रधा ॥ ६५ ॥ ग्रंथान्तरे ॥ उपायैर्न शिवो भति भान्ति ते तत्प्रसादतः ॥ स एवाहं स्वप्रकाशो भाति विश्वप्रकाशकः ॥ ६६ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे शिवलिंगस्थलं नाम तृतीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

( अर्थ ) परम अद्वैतज्ञानांत परिनिष्ठितझालेल्या परयोग्याची सेवा केली असतां शुद्धविद्येला साधन होईल यांत संशय नाहीं. ( ५१ ) मानवपुराणांत सांगितलें कीं, "शिवे" (अर्थ) साक्षात् श्रीशिवाचा राग आपल्यावर झाला असतां त्यापासून गुरु रक्षण करील गुरूचा राग झाला, तर मात्र कोणी रक्षण करूं शकणार नाहीं. याकरितां शरीरानें, मनानें, वाणीनें नेहमीं गुरूला आवडेल तसें वर्तन ठेवावें. ( ५२ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें शुश्रूषाभाव पावलेलें लिंग प्रसादीच्या शरीरामध्यें परस्पर अध्यासरहित गुरुशिष्य सामरस्य पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर सेव्यस्थल सांगतात. ( ५३ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " भिद्यते ( अर्थ ) ब्रह्मादि देवापेक्षांही श्रेष्ठ अशा परतत्वाला सद्गुरूनें दाखविल्यानंतर हृदयांतील गांठ सुटून जाते; सर्व संशय नष्ट होऊन जातात, याचीं सर्व कर्में नष्ट होतात. ( ५४ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं, " तस्मिन्० " ( अर्थ ) कलारहित, उपाधिरहित असें श्रेष्ठ शिवलिंग पाहिलें असतां या जीवाचीं सर्व कर्में नष्ट होतात. ( ५५ ) " अविद्या " ( अर्थ ) श्रीसद्गुरूच्या प्रसादानें हृदयांतील अज्ञानाची गांठ शेंकडों तऱ्हेनें छिन्नभिन्न होते, व पुष्कळ तऱ्हेचे संकल्प विकल्प असलेले सर्व संशय हजारो तऱ्हेनें नष्ट होतात. ( ५६ ) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, " उपायै० " ( अर्थ ) हजारो तऱ्हेचे उपाय केले तरी श्रीशिवाचा साक्षात्कार होत नाहीं. श्रीगुरूच्या प्रसादानें मात्र ते उपाय सुचतात. स्वयंप्रकाश असा तो शिव मीच आहे; असें ह्मणून तो ज्ञानी जगाला प्रकाशक होऊन राहतो.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यानें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील लिंगस्थलनिरूपणांतील शिवलिंगस्थल नांवाचें तिसरें प्रकरण संपलें.

## चतुर्थं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः ॥ एवं तत्तुगुणलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं प्राणलिंगिनि जीवभावनिवृत्तिं कृत्वा लिंगसज्जीवसम्यक्त्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं जीवात्मस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ अथैवंभूतप्रसादिनि स्वस्य साकारत्रितये लिंगत्वेन भक्तो भूत्वा तद्भक्तलिंगे जंगममेव चैतन्यमिति ज्ञात्वा तस्मिन् जंगमलिंगे अनुभवभक्त्या समरसभूतप्राणलिंगी आत्मलिंगत्रैविध्येन प्राणलिंगी भूत्वा प्राणलिंगार्चकः सन् शिवयोगसमाधिं प्राप्य निरूपलिंगत्रैविध्येन लिंगं निजमनुसंधाय तल्लिंगनिजेन प्रसादलिंगत्रैविध्ये स्थित्वा तत्प्रसादलिंगमेवांगमिति ज्ञात्वा पादोदकलिंगत्रैविध्ये समरसत्वं गतः सन् प्राणलिंगिस्वरूपं प्राप्तः ॥ २ ॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ सकलंकत्वजन्मवत्वदुःखित्वादिकं जीवस्वरूपं तदनभिज्ञत्वमहंकारः स तेनाविष्टः स्वर्गनरकभोक्ता . संसारसागरनिमग्नो मिथ्याभिमानी जीवः किल्बिषाश्रयः पुनः पुनरुत्पद्यते ॥ ३ ॥ किंच बृहदारण्यकोपनिषदि वालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च ॥ जीवो भागः स विज्ञेयः स चानंत्याय

---

## उत्तरार्ध ४ थें प्रकरण

श्रीशिवायन नमः ॥ १ ॥ " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें तनु, गुण, लिंग असें त्रिविध मिळून एक लिंग झाल्यांनंतर प्राणलिंगीच्या ठिकाणीं जीवभावाची निवृत्तिकरून लिंगसज्जीवसम्यक्त्व पावलेला भेद कसा? अशी आकांक्षा आल्यानंतर जीवात्मस्थल सांगतात. ( २ " अथैवंभूत० " ( अर्थ ) यानंतर अशा प्रकारचा प्रसादी आपल्या तीन साकारामध्यें लिंगत्वानें भक्त होऊन त्या भक्तलिंगाच्या ठिकाणीं जंगमच चैतन्य आहे, असें जाणून त्या जंगमलिंगाच्या ठिकाणीं अनुभाव भक्तीनें समरस झालेला प्राणलिंगी त्रिविध आत्मलिंगानीं प्राणलिंगी होऊन व प्राणलिंगाचा अर्चक ( पूजा करणारा ) होऊन शिवयोगसमाधीला पावून त्रिविध निरूपलिंगानीं निजलिंगाचें अनुसंधान करून त्या निजलिंगानें त्रिविध प्रसादलिंगाच्या ठिकाणीं राहून तें प्रसादलिंगच अंगलिंग आहे, असें जाणून त्रिविध पादोदकलिंगाच्या ठिकाणीं सामरस्य पावून प्राणलिंगिस्वरूप पावला. ( ३ ) वृद्धजाबालोपनिषदांत सांगितलें कीं, " सकलंक० " ( अर्थ ) जीवस्वरूप हें कलंकत्व, जन्मवत्व, दुःखित्व वगैरे यांनीं सहित आहे. या त्रयीला न जाणणें यालाच अहंकार ह्मणतात या अहंकारानें युक्त तो जीव असतो. ह्मणूनच तो जीव स्वर्गनरकाचा उपभोग घेत असतो. संसारसमुद्रांत बुडालेला व खोटा अभिमान बाळगलेला हा जीव पापाचा ( पापकर्मांचा ) आश्रय करून पुनः पुनः उत्पन्न होतो. ( ४ ) आणि बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " वालाग्र० " ( अर्थ ) एका कांट्याचें शंभर भाग करून ( किंवा शेपटाच्या एका केसाच्या अग्राचे ) त्यांत पुनः एका भागाचें शंभर तुकडे करून त्यांतला जो एक भाग अ-

कल्प्यते ॥ ४ ॥ तथैवोक्तं स्वायंभुवसूत्रे ॥ कलोद्वलितचैतन्यो विद्यादर्शितगोचरः ॥ रागेण रंजितश्चापि बुध्यादिकरणैर्युतः ॥ ५ ॥ मायाद्यवनिपर्यन्ते तत्वभूतात्मवर्त्मनि ॥ भुंक्ते तत्र स्थितो भोगान् भोगैकरसिकः पुमान् ॥ ६ ॥ किरणागमे ॥ अनादिमलसंबंधात्किंचिदज्ञो मयोदितः ॥ अनादिमलमुक्तत्वात्सर्वज्ञोऽसौ ततः शिवः ॥ ७ ॥ ग्रथान्तरे ॥ जीवः शिवः शिवो जीवः सज्जीवः केवलः शिवः ॥ पाशबद्धो भवेजीवः पाशमुक्तः सदाशिवः ॥ ८ ॥ पुनरन्यत्र ॥ हंसहंसेति यो ब्रूयाद्धंसो नाम सदाशिवः ॥ ९ ॥ एवं जीवभावनिवर्तकलिंगं प्राणलिंगिनि आत्मविवेकं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमन्तरात्मस्थलमित्युच्यते ॥१०॥ कठवल्ल्युपनिषदि ॥ अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ ११ ॥ किंच ब्रह्मोपनिषदि ॥ एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ॥ कर्माध्यक्षः सर्वभूताधि-

---

सतो; त्याप्रमाणानें जीवाचें स्वरूप असतें. तो जीवच आनंत्याला ( अनेकत्वाला ) कारण होतो. ( ५ ) तसेंच स्वायंभुवसूत्रांत सांगितलें कीं, “ कलोद्वलित० ” ( अर्थ ) ज्याचें चैतन्य कलेच्या योगानें अभिव्यंजित झालें आहे, व ज्याचा बुद्धिरूप विषय विद्येनें दाखविलेला आहे, व जो रागाच्या योगानें ( लोभानें ) अभिलाषयुक्त आहे, व जो बुध्यादि करणांनीं युक्त आहे, असा तो ह्मणजे जीव होय. ( ६ ) “ माया० ” ( अर्थ ) माया आदिकरून पृथ्वीतत्वापर्यंत तत्वस्वरूप आपल्या मार्गांत केवळ भोगाच्या ठिकाणींच लंपट होऊन त्या ठिकाणीं राहून तो जीव अनेक भोग भोगतो. ( ७ ) किरणागमांत सांगितलें कीं, “ अनादि० ” ( अर्थ ) अणुस्वरूप जीव हा अनादिकालापासून आलेल्या मलाचा संबंध झालेला असल्यामुळें अल्पज्ञानी आहे; असें मीं सांगितलें. अनादिकालापासून आलेल्या मलापासून दूर असल्यामुळें तो शिव सर्वज्ञ आहे, असेंही मीं सांगितलें. ( ८ ) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, “ जीवः ” ( अर्थ ) जीव हा शिव असून शिव हा जीव आहे, व सत्स्वरूपी जीव हा केवल शिवच आहे. आणि जीव हा पाशांनीं बांधला गेला आहे; आणि शिव हा पाशापासून मुक्त आहे. ( ९ ) पुनः दुसऱ्या ठिकाणीं सांगितलें कीं, “ हंस० ” ( अर्थ ) जो कोणी पुरुष “ हंसः ” “ हंसः ” असा जप करील तो शेवटीं सदाशिवस्वरूप होतो. ( १० ) “ एवं जीवभाव० ” ( अर्थ ) याप्रमाणें जीवभाव निवर्तक लिंग हें प्राणलिंगीच्या ठिकाणीं आत्मविवेक पावलेल्या भेदाचें कसें होतें; अशी आकांक्षा आल्यानंतर अंतरात्मस्थल सांगतात. ( ११ ) कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं, “ अग्निर्यथैको० ” ( अर्थ ) अग्नि जसा जगांतल्या प्रत्येक रूपांत शिरून तदाकार होतो. तसा शिव हा सर्व प्राण्यांच्या अंतर्यामांत राहून प्रत्येकाच्या रूपाप्रमाणें रूप घेतो. ( १२ ) आणि ब्रह्मोपनिषदांत सांगितलें कीं, “ एको० ” ( अर्थ ) एकच देव ( शिव ) सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं गुप्तपणें राहून

वासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥ १२ ॥ तथैवोक्तं सूतसंहितायां ॥ चराचरात्मकमिदं यत्र विश्वं महेश्वरे ॥ अध्यात्मचिंतया ग्राह्ये सूत्रे मणिगणा इव ॥ १३ ॥ ग्रंथान्तरे ॥ वर्तमानोऽपि न पुमान्युज्यते वस्तुभिर्गुणैः ॥ शोकहर्षभयक्रोधलोभमोहस्पृहादिभिः ॥ १४ ॥ किंच शिवसूत्रे ॥ पुर्यष्टकसमायोगाद्विचरन् सर्वमूर्त्तिषु ॥ रंगोऽन्तरात्मा विज्ञेयो नृत्यतः परमात्मनः ॥ १५ ॥ एवमन्तरात्मस्वरूपापन्नलिंगं प्राणलिंगिनः विवेकस्वरूपपरमात्मानमावृत्य स्थितभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं परमात्मस्थलमित्युच्यते ॥ १६ ॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ दहराकाशमध्यस्थसहस्रदलशोभिते ॥ स्फुरत्केसरसंश्लिष्टकर्णिके च सरोरुहे ॥ सोमसूर्याग्निमण्डले निवातदीपोपस्थायी निःसंगः सर्वकर्मसाक्षी परमात्माऽवतिष्ठते ॥ १७ ॥ किंच नारायणोपनिषदि ॥ दहरं विपापं परवेश्मभूतं यत्पुंडरीकं पुर-

---

सर्व जगाला व्यापून सर्वांतर्यामी होऊन राहिला आहे; आणि सर्व कर्मांचा अध्यक्ष होऊन सर्व भूतांच्या ठिकाणीं वास करून व सर्व साक्षी होऊन चित्स्वरूपाचा तो शिव केवल गुणापलीकडे होऊन राहिला आहे. ( १३ ) तसेंच सूतसंहितेंत सांगितलें कीं, " चराचरात्मक० " ( अर्थ ) अध्यात्मचिंतन केल्यानंतर मिळणाऱ्या त्या माहेश्वराच्या ठिकाणीं हें चराचरस्वरूप जग दोरींत मणि गोवल्याप्रमाणें आहे. ( १४ ) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, " वर्तमानोऽपि० " ( अर्थ ) महापुरुष वर्तन जरी करीत असला तथापि शोक, हर्ष, भय, क्रोध, लोभ, इच्छा वास्तविक गुणांनीं युक्त होत नाहीं. ( १५ ) आणि शिवसूत्रांत सांगितलें कीं, " पुर्यष्टक० " ( अर्थ ) नर्तन करणाऱ्या परमेश्वराला पुर्यष्टकाच्या समायोगानें " शब्दःस्पर्शश्च रूपं च रसो गंधश्च पंचमः ॥ बुद्धिर्मनस्त्वहंकारः पुर्यष्टकमुदाहृतम् ॥ " या कालोत्तर वाक्याला अनुसरून ( बुद्धि, मन, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, यांला पुर्यष्टक म्हणतात. यां आठ पुरींचा संबंध असल्यामुळें ) सर्व देहांमध्यें संचार करणारा अंतरात्मा हा ( जीव ) रंगस्थल होऊन राहिला आहे; असें जाणावें. ( १६ ) " एवमंतरात्म० " ( अर्थ ) याप्रमाणें अंतरात्मस्वरूप पावलेलें लिंग हें प्राणलिंगीच्या विवेकस्वरूप परमात्म्याला आवरण करून राहिलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर परमात्मस्थल सांगतात. (१७) वृद्धजाबालोपनिषदांत सांगितलें कीं, " दहराकाश० " ( अर्थ ) हृदयाकाशामध्यें असलेल्या हजार पानांनीं सुशोभित असलेल्या व प्रकाशमान केसरांनीं आलिंगन केलेला करंडा असलेल्या कमलांत व सोम, सूर्य, अग्नि यांच्या मंडलांमध्यें वारा नसलेल्या ठिकाणीं शांतपणें जळत असलेल्या दीपाप्रमाणें राहिलेला परमेश्वर हा संगरहित होऊन सर्व कर्मांला साक्षी होऊन राहिला आहे. ( १८ ) आणि नारायणोपनिषदांत सांगितलें कीं, " दहरं " ( अर्थ ) संसारदुःखापासून दूर असलेला योगीश्वर हा देहामध्यें राहिलेल्या, व ईश्वराचें स्थान झालेल्या, पापरहित असलेल्या, दह-

मध्यसंस्थं ॥ तत्रापि दहरं गगनं विशोकस्तस्मिन्यदन्तस्तदुपासितव्यं ॥ १८ ॥ तथैवोक्तं ग्रंथान्तरे ॥ संज्ञापितस्य वै नास्ति न रूपं न च कल्पना ॥ स सर्वभूतानुगतः परमात्मा सनातनः ॥ १९ ॥ अंगलग्नेऽपि वातादौ स्पर्शाद्यनुभवं विना ॥ जीवतश्चेतसो रूपं तद्रूपं परमात्मनः ॥ २० ॥ आत्मायं केवलः स्वस्थः शांतः सूक्ष्मः सनातनः ॥ अस्ति सर्वान्तरे साक्षी चिन्मात्रस्तमसः परः ॥२१॥ वातुले ॥ स पश्यति शरीरं तच्छरीरं तं न पश्यति ॥ तौ पश्यति परः कश्चित्तावुभौ तन्न पश्यतः ॥ २२ ॥ एवमात्मलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं प्राणलिंगिनः निर्देहस्वभावचारित्र्यं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं निर्देहागमस्थलमित्युच्यते ॥ २३ ॥ छांदोग्योपनिषदि ॥ एष आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोकोऽविजुगुप्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः ॥ २४ ॥ तथा सिद्धांतरहस्ये ॥ पृथिव्यां यानि भूतानि जिव्होपस्थपराणि च ॥ जिव्होपस्थपरित्यागी निर्देहः स

---

राकाशरूप पुंडरीकामध्यें ( पांढऱ्या कमलामध्ये ) असलेलें अतिसूक्ष्मरूप चिदाकाश जें आहे; त्या चिदाकाशामध्ये आंत जें परमात्मलिंग आहे; त्याची उपासना करावी. ( १९ ) तसेंच ग्रंथांतरांत सांगितलें कीं, " संज्ञापितस्य " ( अर्थ ) त्या आल्याला नांव नाहीं, रूप नाहीं, कल्पना नाहीं, सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं व्याप्त होऊन राहिलेला तो परमात्मा सनातन ( अनादि ) आहे. ( २० ) " अंगलग्नेपि " ( अर्थ ) वारा वगैरे अंगाला लागला असतां स्पर्शादिकांचा अनुभव जो येतो, त्या अनुभवाशिवाय असलेल्या प्राण्याचें जें रूप आहे; तें रूप परमात्म्याचें आहे; असें जाणावें. ( २१ ) " आत्मायं० " ( अर्थ ) जो स्वतः स्थिर, शांत, सूक्ष्म, नित्य, ज्ञानस्वरूप, असून अविद्येच्या पलीकडे राहतो, तो परमात्मा सर्वांच्या हृदयामध्यें साक्षी होऊन राहिला आहे. ( २२ ) वातुलागमांत सांगितलें कीं, " पश्यति० " ( अर्थ ) तो जीव या शरीराला पाहतो, परंतु हें शरीर त्याला पाहत नाहीं. या दोहोंला श्रेष्ठ असा कोणी परमात्मा पाहतो, परंतु परमात्म्याला ते दोनी ( जीव आणि शरीर ) पाहत नाहींत. ( २३ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध आत्मलिंग मिळून एक झालेलें लिंग प्राणलिंगीच्या निर्देह स्वभावचारित्र्याला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर निर्देहागमस्थल सांगतात. ( २४ ) छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं, " एष० " ( अर्थ ) परमात्मस्वरूप झालेला हा योगीश्वर पापरहित असून जरा–( म्हातारपण )–रहित आहे. व मृत्युरहित असून शोकरहित आहे. जुगुप्सा–( निंद्यकर्म )–रहित असून तृष्णारहित आहे. सत्स्वरूपाच्या ठिकाणीं वासना ठेवलेला असून मनांत परब्रह्माचा संकल्प करणारा आहे. ( २५ ) तसेंच सिद्धांतरहस्यांत सांगितलें कीं, " पृथिव्यां० " ( अर्थ ) पृथ्वीवर जितके प्राणी आहेत, तितके सर्व जिव्हा आणि उपस्थ यांत रत झालेले असतात. जिव्हा आणि उपस्थ यांला सोडलेला देहरहित तो महेश्वर

महेश्वरः ॥ २५ ॥ तथा शैवपुराणे ॥ ॥ शिवपूजोपकरणं देहं यः कुरुते नरः ॥ सोऽचिरेणैव कालेन विदेहो जायते नरः ॥ २६ ॥ किंच स्कांदे ॥ तत्फलं देहलाभस्य येन संसेव्य शंकरं ॥ न पुनर्देहसंबंधं देही यत्प्राप्नुयादिति ॥ २७ ॥ वासिष्ठे ॥ वासनारहितैरन्तरिंद्रियैराहरन् क्रियाः ॥ न विक्रियामवाप्नोति भवक्षोभशतैरपि ॥ २८ ॥ एवं निर्देहचारित्रीभूतलिंगं प्राणलिंगिनि निर्भावचारित्रं प्राप्तभेदः कथमित्यकांक्षायामनंतरं निर्भावागमस्थलमित्युच्यते ॥२९॥ मैत्रेयोपनिषदि ॥ यथा निरिंधनो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥ तथा वृत्तिक्षयाद्भावः स्वयोनावुपशाम्यति ॥ ३० ॥ तथैवोक्तं वासिष्ठे ॥ यदा न भाव्यते भावः क्वचिज्जगति वस्तुनि ॥ तथा हृदंबरे शून्ये कथं चित्तं प्रजायते ॥ ३१ ॥ तत्रैव ॥ न जायते न म्रियते किंचिदत्र जगत्त्रये ॥ न च भावविकाराणां सत्ता क्वच न विद्यते ॥ ३२ ॥ एवं निर्भावचारित्रापन्नलिंगं प्राणलिंगिनि विलीनतच्चारित्रं सदागमविरहितत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं नष्टागमस्थलमित्युच्यते ॥ ३३ ॥

---

प्रकट आहे. ( २६ ) तसेंच शैवपुराणांत सांगितलें कीं, " शिवपूजोपकरणं० " ( अर्थ ) जो मनुष्य आपला देह शिवपूजेच्या उपयोगाकरितांच समजतो, तो मानव लौकरच विदेह होतो. ( २७ ) आणि स्कांदपुराणांत सांगितलें कीं, " तत्फलं " ( अर्थ ) ज्या देहानें श्रीशिवाची सेवा घडून त्या पुण्याच्या योगानें पुनः देहाचा संबंध होणार नाहीं, त्या देहाचें सार्थक झालें, असें समजावें. (२८) वासिष्ठांत सांगितलें कीं, " वासना० " ( अर्थ ) जीव हा अविद्यारूप वासनेनें रहित अशा इंद्रियांनीं अंतरंगांत क्रिया करीत असला तर त्याला संसारांत हजारो तऱ्हेचे विकार प्राप्त झाले तरी तो ( जीव ) त्या विकारांला जुमानीत नाहीं. ( २९ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें निर्देहचारित्रीभूतलिंग हें प्राणलिंगीच्या ठिकाणीं निर्भावचारित्राला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर निर्भावागमस्थल सांगतात. ( ३० ) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, " यथा निरिंधनो " (अर्थ) अर्थात लांकडे घालावयाचें सोडून दिलें तर तो अग्नि आपो आप जसा शांत होतो त्याप्रमाणें वृत्तिक्षय झाल्यामुळें स्वयोनीच्या ठिकाणीं ( आपल्यास कारणीभूत अशा परशिवाच्या ठिकाणीं ) तो भाव शांत होतो. ( ३१ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, " यदा० " ( अर्थ ) जगांतील कोणत्याहीं वस्तूवर भाव जर बसला नाहीं, तर हृदयाकाश शून्य झालेलें असतें मग चित्त ( मन ) कसें उत्पन्न होईल? ( ३२ ) तेथेंच सांगितलें कीं, " जायते० " ( अर्थ ) तीनी जगांत कोणतीही वस्तु उत्पन्न होत नाहीं, आणि मरतही नाहीं. आणि भावविकारांची सत्ता कोठेंही असत नाहीं. ( ३३ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें निर्भावचारित्र पावलेलें लिंग प्राणलिंगीच्या ठिकाणीं विलीन चरित्राचें होऊन सर्वदा आगमविरहित्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर नष्टागमस्थल

मैत्रेयोपनिषदि ॥ तावन्मनो निरोद्धव्यं हृदि यावत्क्षयं गतं ॥ एतज्ज्ञानं च मोक्षं च शेषास्तु ग्रंथविस्तराः ॥ ३४ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ पुनर्भवाधिकारश्च मुक्तस्येह न विद्यते ॥॥ यथा दग्धस्य बीजस्य प्ररोहो नात्र दृश्यते ॥ ३५ ॥ तथा योगजागमे ॥ अक्रियैव परा पूजा मौनमेव परो जपः ॥ अचिंतैव परं ध्यानमनिच्छैव परं फलं ॥ ३६ ॥ तत्रैव ॥ वृत्तम् ॥ योगश्च निद्रा कृतवश्चरित्रं स्वेच्छासनं देवमहानिवेद्यं ॥ लीलार्पणं देवपवित्रदानं जपः प्रलापः शयनं प्रणामः ॥ ३७ ॥ पुनस्तत्रैव ॥ कृतिः सेवा गतिर्यात्रा मतिश्चिंता वचः स्तुतिः ॥ अहो सर्वात्मना शंभोः सुधियां सर्वथार्चनं ॥ ३८ ॥ शिवरहस्ये ॥ या या चेष्टा समुत्पन्ना जायते शिवयोगिनां ॥ सा सा पूजनमीशस्य सर्वदा तद्गतात्मनां ॥ ३९ ॥ ग्रंथान्तरे ॥ तुर्यके तु परावस्था तुर्यातीते तु निर्जना ॥ सा नष्टा यादृशादृश्यनष्टयोर्दृष्टिदृश्ययोः ॥ ४० ॥ किंच वातुले ॥ शब्दब्रह्मज्ञानं निःश-

---

सांगतात. (३४) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, "तावन्मनो०" (अर्थ) जोपर्यंत हृदयांत मन नाश पावेल तोपर्यंत मन आवरून धरावें. हेंच ज्ञान होय. आणि यालाच मोक्ष ह्मणतात. बाकी सर्व ग्रंथाचा विस्तार होय. (ग्रंथाचें प्रयोजन नाहीं.) (३५) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, "पुनर्भ०" (अर्थ) जळालेल्या बीजाला पुनः अंकुर कसे येत नाहींत त्याप्रमाणें ज्ञानाग्नीनें दग्ध होऊन मुक्त झालेल्या मानवाला पुनः जन्म नाहीं. (३६) तसेंच योगजागमांत सांगितलें कीं, "अक्रियैव०" (अर्थ) कर्म न करणें हीच पूजा असून मौनच जप होय. काळजी न करणें हें श्रेष्ठ ध्यान असून इच्छा न करणें हेंच श्रेष्ठ फल होय. (३७) तेथेंच सांगितलें कीं, योग्याची निद्राच योग असून त्याची वागणूकच यज्ञयाग होत. त्यानें घातलेलें स्वेच्छासनच महानैवेद्य असून त्याचें खेळणें पवित्र दानें होत. त्याचें उत्तम भाषणच जप असून त्याचें निजणें हें नमस्कार आहे. (३८) पुनः तेथेंच सांगितलें कीं, "कृतिः" (अर्थ) श्रेष्ठ बुद्धीच्या मानवांनीं केलेला सेवा, कृति, गति, यात्रा, बुद्धि, चिंता, वाणी, स्तुति हे सर्व श्रीशिवाची पूर्णपणें केलेली आराधना होय. (३९) शिवरहस्यांत सांगितलें कीं, "या या" (अर्थ) नेहमीं श्रीशिवाच्या ठिकाणीं मन ठेवलेल्या लोकांच्या ज्या ज्या चेष्टा असतील, त्या त्या सर्व चेष्टा श्रीशिवाची पूजाच होय. (४०) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, "तुर्यकेतु०" (अर्थ) चतुर्थावस्थेमध्यें असलेली उत्कृष्ट स्थिति तुरीय सगुणाचें उल्लंघन करून निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं राहिलेली असून जनरहित असतें. या स्थितीमुळें ज्ञान आणि ज्ञानाला गोचर असणारा पदार्थ यांमध्यें जी ज्ञानज्ञेयअवस्था असते, ती नष्ट होते. (४१) आणि वातुलांत सांगितलें कीं, "शब्दब्रह्म ज्ञानं०" (अर्थ) ज्ञानाला शब्दब्रह्म असें ह्मणतात. सत्क्रियेच्या ठिकाणीं असलेल्या निष्ठेला निःशब्द ब्रह्म ह्मणतात. जें शब्दब्रह्म सांगितलें त्या-

द्ब्रह्मसत्क्रिया निधा ॥ शब्दब्रह्म यदुक्तं निःशब्दब्रह्म तच्चरति तूष्णीं ॥ ४१ ॥ एवं निरूपलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं प्राणलिंगिनि सुखप्रसादस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमादिप्रसादिस्थलमित्युच्यते ॥ ४२ ॥ परमहंसोपनिषदि ॥ सर्वेषामिंद्रियाणां गतिमुपरमते य आत्मन्येव स्थीयते यत्पूर्णानंदैकबोधसद्ब्रह्माहमस्मीति कृतकृत्यो भवति ॥ ४३ ॥ कठवल्ल्युपनिषदि ॥ इत्तं ॥ अणोरणीयान्महतो महीयानात्मा गुहायां निहितोऽस्य जन्तोः ॥ तमक्रतुं पश्यति वीतशोको धातुः प्रसादान्महिमानमीशं ॥ ४४ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ गुरुवाक्यामृतास्वादादपुनर्भवहेतुकात् ॥ य आनंदमवाप्नोति स प्रसादीति कथ्यते ॥ ४५ ॥ शैवरत्नाकरे ॥ शिवभावप्रसंगेन प्रसादी सोऽभिधीयते ॥ यस्य प्रियेषु वीतस्य सर्वत्रोपरतं मनः ॥ ४६ ॥ ग्रंथांतरे ॥ यस्यातिविश्रुतार्थानामिंद्रियाणां प्रभावतः । शिवभावप्रसन्नः स्यात्स प्रसादीति गीयते ॥ ४७ ॥ किंच सिद्धांतशेखरेऽपि ॥ परेण भावयोगेन प्रसीदति महेश्वरः ॥ तस्मादस्य शिवो भावः स प्रसादीति क-

---

ठिकाणीं निःशब्दब्रह्म उगीच संचार करीत असतें. ( ४२ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध निरूपलिंग मिळून एक झालेलें लिंग प्राणलिंगीच्या ठिकाणीं सुखप्रसादस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर आदिप्रसादिस्थल सांगतात. ( ४३ ) परमहंसोपनिषदांत सांगितलें कीं, " सर्वेषा० " ( अर्थ ) जो कोणी सर्व इंद्रियांच्या गतीचा उपशम करील, व जें कांहीं पूर्ण आणि आनंदरूपानें युक्त असें ज्ञान असेल, तें ब्रह्म मी होईन असें जाणून आपल्याच ठिकाणीं राहतो, तो कृतार्थ होतो. ( ४४ ) कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं, " अणो० " ( अर्थ ) अतिशय लहान पदार्थापेक्षां लहान, अतिशय मोठ्या पदार्थापेक्षां मोठें असें परमात्मलिंग या जीवाच्या हृदयाकाशांत राहिलेलें आहे. तो जीव परमात्मलिंगाच्या प्रसादानें दुःखरहित होऊन यज्ञ यागादिकालाही गोचर न होणाऱ्या त्या प्रकाशस्वरूप परमात्मलिंगाला पाहतो. ( ४५ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " गुरुवाक्या० " ( अर्थ ) पुनर्जन्म न होण्याला कारण अशा गुरुवाक्यरूप अमृताच्या आस्वादानें जो आनंद पावतो, त्याला प्रसादी असें ह्मणतात. ( ४६ ) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " शिव भाव० " ( अर्थ ) प्रिय वस्तूंच्या ठिकाणीं मन नसलेल्या ज्या पुरुषाचें मन सर्व ठिकाणीं उपरत झालें असेल ( सर्व विषयांची आशा सोडिली असेल ) आणि शिवाच्या ठिकाणींच आसक्त झालें असेल, त्याला प्रसादी असें ह्मणतात. ( ४७ ) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, " यस्याति० " ( अर्थ ) अतिशय प्रसिद्ध विषयाचा स्वीकार केलेल्या इंद्रियांच्या प्रभावानें शिव भावानें जर प्रसन्न झाला असेल, तर तो प्रसादी असा ह्मणवून घेतो ( ४८ ) आणि सिद्धांतशेखरांत सांगितलें कीं, " परेण० " ( अर्थ ) श्रेष्ठ अशा भावाच्या योगानें महेश्वर प्रसन्न होतो. याकरितां ज्याचा भाव शि-

ध्यते ॥ ४८ ॥ वातुले ॥ अस्यात्मनः क्रियाः सर्वा लिंगार्पिततया स्थिताः ॥ स्वस्मिन्नेव स्वयं याति विश्रांतिं सुखलक्षणां ॥ ४९ ॥ एवमादिप्रसादस्वरूपापन्नलिंगं प्राणलिंगिनि प्राणप्रसादस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमंत्यप्रसादस्थलमित्युच्यते ॥ ५० ॥ कैवल्योपनिषदि ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचं यत्प्रकाशते तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥ ५१ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिसर्वावस्थासु सर्वदा ॥ लिंगार्पितोपभोगेन निर्लेपोऽयं न संशयः ॥ ५२ ॥ शिवाद्वैते ॥ संविदेव परा तृप्तिर्भावपर्यन्तभासुरा ॥ ॥ तथैव तृप्तो यस्सोंऽत्यप्रसादीति निगद्यते ॥ ५३ ॥ किंच वासिष्ठे ॥ चिन्मात्रत्वं प्रयातस्य तीर्णमृत्योः स्वचेतसः ॥ यो भवेत्परमानंदः केनासावुपमीयते ॥ ५४ ॥ एवमन्त्यप्रसादस्वरूपापन्नलिंगं प्राणलिंगिनि तृप्तिं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं सेव्यप्रसादिस्थलमित्युच्यते ॥ ५५ ॥ मैत्रेयोपनिषदि ॥ अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परंज्योतिरूपमुपसंपद्य स्वेनरूपेणाभिनि-

---

वाच्या ठिकाणीं असेल, त्याला प्रसादी ह्मणतात. ( ४९ ) वातुलांत सांगितलें कीं, " अस्यात्मनः ( अर्थ ) या आदिप्रसादीच्या सर्व क्रिया श्रीशिवलिंगाच्या ठिकाणीं अर्पित झालेल्या असतात ह्मणूनच आपल्या ठिकाणीं स्वतःच आनंद लक्षणाची विश्रांति तो प्रसादी पावतो. ( ५० ) " एवं. " ( अर्थ ) याप्रमाणें आदिप्रसादि स्वरूप पावलेलें प्राणलिंगीच्या ठिकाणीं प्राणप्रसाद स्वरूप पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर अंत्यप्रसादस्थल सांगतात ( ५१ ) कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं "जाग्रत्स्वप्न" ( अर्थ ) जाग्रत, स्वप्न, सुषुप्ति वगैरे प्रपंच जें प्रकाशतें, तें सर्व परब्रह्मस्वरूप आहे, व मी ही परब्रह्मच आहे, असें जाणून जीवात्मा सर्व बंधनापासून मुक्त होतो. ( ५२ ) तसेंच वातुलांत. सांगितलें कीं, " जागृत्स्व० " ( अर्थ ) जागृत, स्वप्न, सुषुप्ति यां सर्व अवस्थेमध्यें सर्वदा श्रीशिवलिंगाला अर्पण करून उपभोग घेत असला तर तो जीवात्मा निर्लेप असतो; यांत संशय नाहीं. (५३) शिवाद्वैतांत सांगितलें कीं, " संविदेव० " ( अर्थ ) ज्ञानच श्रेष्ठ तृप्ति होय, तें ज्ञान भाव असेंपर्यंत प्रकाशतें ( राहतें ) जो कोणी त्या ज्ञानानें तृप्त होईल तो अंत्यप्रसादी ह्मणवितो. ( ५४ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " चिन्मात्रत्वं० " ( अर्थ ) मृत्यु उल्लंघन करून चित्स्वरूप पावलेल्या व स्वरूपाच्या ठिकाणीं मन ठवलेल्या ज्ञान्याला जो कांहीं आनंद होईल. त्या आनंदाला उपमा कोण देऊं शकेल ? बरें ? ( ५५ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें अंत्यप्रसादस्वरूप पावलेलें लिंग प्राणलिंगीच्या ठिकाणीं तृप्तीला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर सेव्यप्रसादिस्थल सांगतात. ( ५६ ) मैत्रेयोपनिषदांत सांगितलें कीं, " अथ " ( अर्थ ) अनंतर जो कोणी प्राणलिंगी या शरीरापासून उत्क्रमण करून परवस्तु पावून हा प्रसाद आहे, असें आ-

त्पद्यते एप आत्मेति होवाचैतदमृतमेतदभयमेतद्ब्रह्मेति ॥ ६६ ॥ शिवसूत्रे ॥ तृप्तिः संकोचविलयः पूर्णभावात्परात्मनः ॥ तथैव तृप्तस्तृप्तः स्यान्न सुधास्वादनादिभिः ॥ ६७ ॥ शिवाद्वैते ॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य किमन्यैर्भोज्यराशिभिः ॥ ज्ञानमेव परानंदं प्रकाशयति शैवकं ॥ ६८ ॥ किंच शिवधर्मोत्तरे ॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ॥ नैवास्ति किंचित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्ववित् ॥ ६९ ॥ शैवरत्नाकरे ॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य भक्त्या च विवशात्मनः ॥ अन्तर्नं च बाह्यस्तुष्ट्या कृत्यमस्ति कदाचन ॥ ६० ॥ ज्ञानोत्तरेऽपि ॥ नान्तः शरीर एवायं बाह्य एव न संस्थितः ॥ महानंदप्रसादोऽयं सर्वत्रैवावभासते ॥६१॥ किंच वासिष्ठे ॥ आनंदलक्षणा तृप्तिर्निरुपाधितया स्थिता ॥ तदुत्थानंदसांद्रत्वं ज्ञानामृतमुदीरितं ॥६२॥ तत्वसारे ॥ पिण्डे मुक्ताः पदे मुक्ता रूपे मुक्ताः पडानन॥ रूपातीते तु ये मुक्तास्ते मुक्तास्तृप्तिमागताः ॥ ६३ ॥ एवं प्रसादलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं प्राणलिंगिनः

---

पल्या रूपानें प्रकाशतो, तो ज्ञानी हा प्रसादच संसार भयापासून सोडविणारा आहे, हा प्रसादच ब्रह्मस्वरूप आहे, असें सत्यपणें सांगतो. (५७) शिवसूत्रांत सांगितलें कीं, "तृप्ति०" ( अर्थ ) परमात्म्याला पूर्णत्व असल्यामुळें संकोचाच्या लयाला तृप्ति असें ह्मणतात. अशा तऱ्हेनें तृप्त झालेला मानव सुधारसाचा ( अमृताचा ) आस्वाद घेत असला तरी तृप्त होत नाहीं. ( ५८ ) शिवाद्वैतांत सांगितलें कीं, " ज्ञानामृतेन० " ( अर्थ ) ज्ञानरूप अमृतानें तृप्त झालेल्या मानवाला इतर पंचपक्वानाच्या राशि घेऊन काय करावयाच्या आहेत? ज्ञानच शिवसंबंधी आनंद प्रकाश करणारें आहे. ( ५९ ) आणि शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, " ज्ञानामृते० " ( अर्थ ) ज्ञानामृतानें तृप्त होऊन कृतार्थ झालेल्या योग्याला जगांत कांहीं एक कर्तव्य नाहीं. असेल तर तो तत्ववेत्ताच नव्हे; असें ह्मटलें पाहिजे. ( ६० ) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " ज्ञानामृतेन० " ( अर्थ ) ज्ञानामृतानें तृप्त होऊन भक्तीनें परवश झाला तर त्याला अंतरंगांतला संतोष आणि बाहेरचा संतोष घेऊन काय करावयाचा आहे? ( ६१ ) ज्ञानोत्तरांत सांगितलें कीं, " नांतः " ( अर्थ ) या सेव्यप्रसादीला आंत शरीर नाहीं; आणि बाहेरही शरीर नाहीं. महानंदरूप प्रसादाचा उपभोग घेणारा हा सेव्यप्रसादी सर्व ठिकाणीं प्रकाशतो. ( ६२ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " आनंदलक्षणा० " ( अर्थ ) आनंदस्वरूप तृप्तीमध्यें उपाधि कांहीं नसतात. त्या निरुपाधिक आनंदापासून उद्भवलेल्या घनानंदाला ज्ञानामृत असें ह्मणतात. (६३) तत्वसारांत सांगितलें कीं, " पिंडे० " ( अर्थ ) हे कुमारा, शरीर असून कांहीं लोक मुक्त झालेले असतात; आणि स्थानामध्यें कांहीं लोक मुक्त झालेले असतात. रूपांत कांहीं लोक मुक्त झालेले असून रूपाच्या पलीकडे असलेल्या वस्तूंत कांहीं लोक मुक्त झालेले असतात. ते सर्व ज्ञानामृताचा लाभ करून घेऊनच मुक्त झालेले असतात. ( ६४ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिवि-

मलत्रयनिर्हरणार्थं पादोदकस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं दीक्षापादोदकस्थलमित्युच्यते ॥ ६४ ॥ ऐतरेयोपनिषदि ॥ अथाधिविद्यां आचार्यः पूर्वरूपं अन्तेवास्युत्तररूपं विद्यासंधिः प्रवचन ९ संधानं ॥ ६९ ॥ ऋग्वेदे ॥ आप्मानं तीर्थं कइह प्रवोचद्येन पथा प्रपिवन्ते सुतस्य सहस्रधा पंचदशान्युक्था यावत्द्यावापृथिवी तावदित्तत् सहस्रधा महिमानः सहस्रं यावद्ब्रह्मा अधिष्ठितं तावति वाक् ॥ ६६ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ अविभक्तसुधास्वादा निर्वृतिर्या परात्परा ॥ दुर्लभा देहिनां साक्षाद्दीक्षापादोदकं हि तत् ॥ ६७ ॥ योगशास्त्रे ॥ निरूढशिवसद्भावरसेन विमलेन यः ॥ परेण पावनीभूतः किं तस्यान्यत्क्रियादिकैः ॥ ६८ ॥ किंच शिवरहस्ये ॥ शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः ॥ गुरुपादोदकं चित्रं सं-

---

धप्रसादलिंग मिळून एक झालेलें लिंग प्राणलिंगीच्या मलत्रयाचा परिहार करावयास पादोदकस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर दीक्षापादोकस्थल सांगतात. ( ६५ ) ऐतरेयोपनिषदांत सांगितलें कीं, " अथाधिविद्यां० " ( अर्थ ) सेव्यप्रसादस्थलानंतर परब्रह्मविद्येला उद्देशून गुरु हा पूर्वस्वरूपाचा असून शिष्य हा उत्तरस्वरूपाचा असतो. या दोघांमध्यें परब्रह्मविद्या ही संबंधरूपानें असून गुरुवचन हें संधान होऊन राहिलेलें असतें ( ६६ ) ऋग्वेदांत सांगितलें कीं, " आप्मानं० " ( अर्थ ) हजारो प्रकारांनीं असलेलें, चिदानंदस्वरूपी गुरु हे " ब्रह्म तासां ब्रह्ममहद्योनिरहं बीजप्रदः पिता " या वचनाला अनुसरून ब्रह्म ह्मणजे प्रकृति; या प्रकृतीनें अधिष्ठित झालेलें व हजारो तन्हेचें होऊन अधिष्ठानरूप पावलेलें तें ब्रह्मरूप जितक्या प्रमाणाचें असतें, तितक्या प्रमाणाचें पादोदक तीर्थ असतें. तें पादोदक पितात. या पादोदकाच्या मार्गांच्या शेवटीं असलेलें शब्दब्रह्म हजारो प्रकारचें होऊन आकाशपृथ्वीला व्यापून पन्नास अक्षरांच्या आकाराचें होऊन राहिलेलें असतें त्यामध्यें चतुर्मुख ब्रह्मा वर्णाध्वामध्यें ह्मणाला कीं— ककारापासून क्षकारापर्यंत असलेल्या ३५ अक्षरांमध्यें प्रत्येक अक्षराला सोळा स्वराक्षरांची योजना केली असतां ९६ अक्षरें होतात. त्यांत पृथ्वीतत्वामध्यें ५९ अक्षरें व अप्तत्वामध्यें ५२ अक्षरें, अग्नितत्वांत ६२ अक्षरें, वायुतत्वांत ५४ अक्षरें, आकाशतत्वांत ६२ अक्षरें, मनस्तत्वामध्यें ६४ अक्षरें ब्रह्मरंध्रामध्यें हजार अक्षरें आहेत, असें ह्मणाला. ( ६७ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " अविभक्त० " ( अर्थ ) अमृतरसाच्या आस्वादाप्रमाणें आस्वाद असलेलें जें श्रेष्ठाहून श्रेष्ठ सुख असेल तें मानवांला फार दुर्लभ आहे. त्यालाच साक्षात् दीक्षापादोदक ह्मणतात. ( ६८ ) योगशास्त्रांत सांगितलें कीं, " निरूढ० " ( अर्थ ) निर्मळ श्रेष्ठ अशा निरूढ झालेल्या शिवसद्भावाच्या रसानें ( श्रीशिवाच्या ठिकाणीं अचल भक्ति ज्यानें ठेवली आहे, त्या भक्तिरसानें ) ज्याचा देह पवित्र झाला आहे, त्याला इतर क्रिया घेऊन काय करावयाच्या आहेत? ( ६९ ) आणि शिवरहस्यांत सांगितलें कीं, " शोषणं० " ( अर्थ ) गुरुपादोदक हें पापरूप चिखलाला शोषण करणारें असून ज्ञान तेजाला वाढवि-

सारद्रुमनाशनं ॥ ६९ ॥ एवं दीक्षापादोदकस्वरूपापन्नलिंगं शिक्षागुरुतत्वे दृष्टपादोदकस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शिक्षापादोदकस्थलमित्युच्यते ॥ ७० ॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥ ७१ ॥ पारातश्रुतौ ॥ लोकस्य द्वारमर्चिमत्पवित्रं ज्योतिष्मद्भ्राजमानं महास्वदमृतस्य धारा बहुधा दोहमानं चरणं नोलोके सुधितां ददातु ॥ ७२ ॥ तथैवोक्तं सिद्धान्तशेखरे ॥ अविद्यामूलनाशाय जन्मकर्मनिवृत्तये ॥ ज्ञानवैराग्यसिध्यर्थं गुरुपादोदकं पिवेत् ॥ ७३ शिवसूत्रे ॥ प्रत्यक्स्रोतसि सततं प्रवृत्तनिजधाम्नि निर्मले गगने ॥ अवगाह्यानंदमये स्नातो निःशेषमृष्टदृश्यमलः ॥ ७४ ॥ किंचस्वात्मयोगप्रदीपिकायां ॥ वृत्तम् ॥ तत्तध्दृपीकविषयाख्यतरंगसंघसंघट्टजं निजमनोमरुतोपनीतं ॥ यत्सौख्यबिंदुमुपजीवति जीवलोकः सोऽनंतसत्यसुखबोधसुधाब्धिरस्मि ॥ ७६ ॥ एवं शिक्षापादोदकस्वरूपापन्नलिंगं त्रिपुटिरहितं सन्महाज्ञान-

---

णारें आहे. आणि संसाररूप वृक्षाला समूल उपटून टाकणारें आहे. ( ७० ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें दीक्षापादोदकस्वरूप पावलेलें लिंग शिक्षागुरुतत्वाच्या ठिकाणीं दृष्टपादोदकस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर शिक्षापादोदकस्थल सांगतात. ( ७१ ) तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें कीं, " चरणं " ( अर्थ ) जंगमपाद पवित्र असून सर्वत्र व्याप्त आहे. आणि अनादिसिद्ध आहे. ज्या जंगमपादानें मनुष्य पापापासून तरून जातो; शुद्ध पवित्र अशा त्या पादानें पुनीत होऊन अत्यंत पापरूपी शत्रूला तरून ( जिंकून ) आम्ही जातों. ( ७२ ) पारातश्रुतींत सांगितलें कीं, " लोकस्य० " ( अर्थ ) जगाला कारण असून तेजस्वी आहे, व पवित्र असून ज्योतिस्वरूप आहे; आणि प्रकाशमान असून परब्रह्मस्वरूप आहे, असें तें शिक्षागुरु जंगमाचें चरण पादोदकरूप अमृताच्या धारा पुष्कळ प्रकारानें देऊन आम्हांस सद्बुद्धि देवो. ( ७३ ) तसेंच सिद्धांतशेखरांत सांगितलें कीं, " अविद्या० " ( अर्थ ) अविद्येच्या मुळीचा नाश होण्याकरितां जन्मकर्म जाण्याकरितां ज्ञान वैराग्याच्या सिद्धीकरितां गुरुपादोदक प्यावें. ( ७४ ) शिवसूत्रांत सांगितलें कीं, " प्रत्यक्० " ( अर्थ ) निरंतर निर्मळ अशा आकाशामध्यें असलेल्या प्रवृत्त निजस्वरूपाच्या आनंदमय प्रत्यगात्मरूप प्रवाहामध्यें स्नान केलें असतां संसाररूप मळ धुवून जातो. ( ७५ ) आणि स्वात्मयोगप्रदीपिकेंत सांगितलें कीं, " तत्तध्दृपीक० " ( अर्थ ) त्या त्या इंद्रियाचें विषय हेंच अनेक तऱ्हेच्या लाटा होत, या लाटांच्या संघट्टनानें उत्पन्न झालेलें व आपलें मन हेंच वायु होय; या वायूनें आणलेलें जें लवमात्र सुख असतें; त्या सुखाकरितां सर्व लोक धडपडतात मी मात्र अनंत व सत्य सुखसमुद्रांत यथेच्छ पोहतों. ( ७६ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें शिक्षापादोदकस्वरूप पावलेलें लिंग त्रिपुटिरहित हो-

गुरुतत्त्व परमानंदस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञानपादोदकस्थलमित्युच्यते ॥ ७६ ॥ छांदोग्योपनिषदि ॥ पंचेंद्रियस्य पुरुषस्य यदेव स्यादनावृतं ॥ तदस्य स्रवते प्रज्ञा गुरोः पादादिवोदकं ॥ ७७ ॥ परमहंसोपनिषदि ॥ तेन नित्यान्निवृत्तस्तन्नित्यबोधस्ततस्वयमेवावस्थितिस्तच्छान्तमचलमद्वयानंदविज्ञानधन एवास्मि तदेव मम परम धाम ॥ ७८ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे जंगमलिंगस्थलं नाम चतुर्थं प्रकरणं समाप्तम् ॥

---

ऊन सन्महाज्ञानगुरुतत्वाच्या ठिकाणीं परमानंदस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानपादोदकस्थल सांगतात. ( ७७ ) छांदोग्योपनिषदांत सांगितलें कीं, " पंचेंद्रियस्य० " ( अर्थ ) पंचेंद्रियस्वरूप पुरुषाला आवरणरहित जें रूप प्राप्त होतें; तें अनावृतरूप या प्राणलिंगीला त्रैकालिक ज्ञानस्वरूप होऊन दीक्षागुरूच्या पायापासून स्रवलेल्या एकाद्या तीर्थाप्रमाणें गुरुपादोदक स्रवतें. ( ७८ ) परमहंसोपनिषदांत सांगितलें कीं, " ते न नित्या० " ( अर्थ ) त्या ज्ञानपादोदकानें नित्य नांवाच्या कल्पनेपासून परावृत्त झालेला ( फिरलेला ) होऊन तें नित्य ज्ञानस्वरूप पादोदक स्वतः घेऊन त्या ज्ञानपादोदकामध्यें शांतपणें राहून स्थिर राहून नित्यानंदस्वरूप होऊन सहायरहित आनंदस्वरूप घनविज्ञानाच्या ठिकाणीं मी आहें तेंच श्रेष्ठ स्थान होय.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यानें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील लिंगस्थलनिरूपणांतील जंगमलिंगस्थल नांवाचें चौथें प्रकरण संपलें.

# पंचमं प्रकरणं.

श्रीशिवाय नमः ॥ एवं पादोदकलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं शरणस्य सत्क्रियायां निष्पत्तिस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं क्रियानिष्पत्तिस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ अथैवंविधप्राणलिंगी परमानंदेन परिणामप्रसादालिंगे स्वस्वरूपं विस्मृत्य निष्पत्तिलिंगत्रैविध्ये शरणो भूत्वा शरणलिंगयोः सतिपतिन्यायमनुसृत्य सकलकरणोपभोगं निवार्य तामसस्वरूपं निराकृत्याकाशलिंगत्रैविध्यमुपास्य निर्देशस्थले स्थित्वा तनुकरणसंसारभ्रांतिं व्युदस्य शीलसंपादनेन प्रकाशलिंगत्रैविध्येन संपन्नो भूत्वा सकलकर्मनिवर्तकः शिवैक्यं गतः सन् शरणत्वं प्राप्तः ॥ २ ॥ क्षुरिकोपनिषदि ॥ यथा निर्याणकाले तु दीपो दग्ध्वा लयं व्रजेत् ॥ तथा सर्वाणि कर्माणि योगी दग्ध्वा शिवं व्रजेत् ॥ ३ ॥ तथैवोक्तं योगजागमे ॥ फलप्रकाशकं पुष्पं फलं पुष्पविनाशकं ॥ ज्ञानप्रकाशकं कर्म ज्ञानं कर्मविनाशकं ॥ ४ ॥ एवं क्रियानिष्पत्तिस्वरूपापन्नलिंगं शरणस्यांगे संयोगं प्राप्य प्राणस्याग्रे दृश्यमानभावान्तर्भावत्वेन लक्ष्यं सत्तद्भावनिष्पत्तिस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं

---

# उत्तरार्ध ५ वें प्रकरण

श्रीशिवाय नमः ॥ १ ॥ " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध पादोदलिंग मिळून एक झालेलें लिंग शरणाच्या सत्क्रियेमध्यें निष्पत्तिस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर क्रियानिष्पत्तिस्थल सांगतात. ( २ ) " अथैवं० " ( अर्थ ) आतां अशा तऱ्हेचा प्राणलिंगी श्रेष्ठ आनंदानें परिणाम प्रसादलिंगाच्या ठिकाणीं स्वस्वरूप विसरून त्रिविध निष्पत्तिलिंगांमध्यें शरण होऊन शरणलिंगांमध्यें सतिपतिन्यायाला अनुसरून सर्व इंद्रियांच्या उपभोगाला निवारण करून तामसस्वरूपाचें निराकरण करून त्रिविध आकाशलिंगाची उपासना करून निर्देशस्थलांत राहून त्याचें अनुकरण अशा संसाराची भ्रांत सोडून शीलसंपादनानें त्रिविध प्रकाशलिंगानें संपन्न होऊन सर्व कर्मांपासून परावृत्त होऊन शिवैक्य पावला तर शरणपणा त्यानें मिळविला, असें होतें. ( ३ ) क्षुरिकोपनिषदांत सांगितलें कीं, " यथा० " ( अर्थ ) दिवा जात असतां शिल्लक असलेली वात सर्व जळून शेवटीं मोठा होऊन जसा जातो, त्याप्रमाणें योगी हा सर्व कर्में जाळून शिवाजवळ जातो. ( ४ ) तसेंच योगजागमांत सांगितलें कीं, " फलप्रकाशकं० " ( अर्थ ) फूल हें फलोदयाला कारण असून फल हें फुलाच्या नाशाला कारण आहे. तसें कर्म हें ज्ञानोदयाला कारण असून ज्ञान हें कर्मांच्या नाशाला कारण आहे. ( ५ ) " एवं " ( अर्थ ) याप्रमाणें क्रियानिष्पत्तिस्वरूपाला पावलेलें लिंग शरणाच्या शरीरामध्यें संयोग पावून प्राणाच्या पुढें दिसणाऱ्या भावांतर्भावत्वानें लक्ष्य होऊन तद्भावनिष्पत्तिस्वरूपाला पाव-

भावनिष्पत्तिस्थलमित्युच्यते ॥ ५ ॥ हंसोपनिषदि ॥ तस्मान्मनो विलीने मनसि गते संकल्पविकल्पे दग्धे पुण्यपापे सदाशिवों शक्त्यात्मनः सर्वत्रावस्थितैः शान्तः प्रकाशयतीति वेदवचनं भवति भवति ॥ ६ ॥ किंच कठवल्ल्युपनिषदि ॥ इंद्रियेभ्यः परं मनो मनसस्सत्वमुत्तमं ॥ सत्वादपि महानात्मा महतोऽव्यक्तमेव च ॥ ७ ॥ अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापको लिंगमेव च ॥ यज्ज्ञात्वा मुच्यते जन्तुरमृतत्वं च गच्छति ॥ ८ ॥ पुनस्तत्रैव ॥ इंद्रियेभ्यः परा ह्यर्था ह्यर्थेभ्यश्च परं मनः ॥ मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥ ९ ॥ महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः ॥ पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥ १० ॥ तथैवोक्तं किरणागमे ॥ चिरेण साध्यमानस्य भावकैर्विगतक्रमैः ॥ स्थिरीभावो हि भावस्य भावनिष्पत्तिरिष्यते ॥ ११ ॥ शैवरत्नाकरे ॥ अभ्यासक्रमतः सिद्धे भावे वृत्तिनिरोधकः ॥ शिवभावः परो भाति भक्तस्य क्षीणचेतसः ॥ १२ ॥ एवं भावे निष्पन्नलिंग

---

लेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर भावनिष्पत्तिस्थल सांगतात (६) हंसोपनिषदांत सांगितलें कीं, " तस्मान्मनो० " (अर्थ) त्या क्रियानिश्चयापासून मनाचा लय झाल्यानंतर व मनांतील संकल्पविकल्प नष्ट झाल्यानंतर पुण्य पाप जळून गेल्यानंतर ब्रह्मस्वरूप शिव हा शरण अशा आह्मांस चिच्छक्तिस्वरूपयुक्त होऊन सर्व ठिकाणीं राहिलेल्या पदार्थांनीं प्रकाशतो, असें वेदवाक्य आहे. वेदवाक्य आहे. (७) आणि कठवल्ल्युपनिषदांत सांगितलें कीं, " इंद्रियेभ्यः " (अर्थ) इंद्रियांपेक्षां मन हें श्रेष्ठ आहे, मनापेक्षां बुद्धितत्व हें श्रेष्ठ आहे. बुद्धितत्वापेक्षां महातत्वस्वरूप आत्मा हा श्रेष्ठ आहे. त्या महातत्वापेक्षां प्रकृतितत्व श्रेष्ठ आहे. (८) " अव्यक्त० " (अर्थ) त्या प्रकृतितत्वापेक्षां व्यापक असा महापुरुषतत्व असें शिवलिंगच श्रेष्ठ आहे. तर जो प्राणी या शिवलिंगाला उद्देशून सत्कर्म करतो, तो या संसारबंधनापासून मुक्त होतो (९) पुनः तेथेंच सांगितलें कीं, " इंद्रिये० " (अर्थ) इंद्रियांपेक्षां विषय श्रेष्ठ होत, विषयांपेक्षां मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आहे. बुद्धीपेक्षां महान आत्मा श्रेष्ठ होय. (१०) " महतः " (अर्थ) महत्तत्वापेक्षां अव्यक्ततत्व श्रेष्ठ होय, अव्यक्ततत्वापेक्षां पुरुष श्रेष्ठ होय. त्या शिवलिंगरूपी पुरुषापेक्षां श्रेष्ठ वस्तु जगांत कोणतीही नाहीं. सर्वांला तीच दिशा असून तीच गति आहे. (११) तसेंच किरणागमांत सांगितलें कीं, " चिरेण० " (अर्थ) विन आयासानें शिवाच्या ठिकाणीं भाव ठेवणाऱ्यांनीं कांहीं कालपर्यंत साध्य करण्यांत येणाऱ्या भावाचें स्थिरीकरण (निश्चल करणें) याला भावनिष्पत्ति असें ह्मणतात. (१२) शैवरत्नाकरांत सांगितलें कीं, " अभ्यास० " (अर्थ) मनाच्या इतर व्यापारांचा प्रतिबंध करणारा शिवभाव उत्पन्न व्हावयाचा असेल तर तो मन नष्ट झालेल्या भक्ताच्या क्रमानें केलेल्या अभ्यासानें सिद्ध झालेल्या मनाच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. (१३) " एवं " (अर्थ)

शरणस्य त्रिपुटीनाशनानंतरं तच्छरणज्ञानान्तरे स्वयमेव स्थितत्वा तज्ज्ञाननिष्पत्तिस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञाननिष्पत्तिस्थलमित्युच्यते ॥ १३ ॥ चुलिकोपनिषदि ॥ ब्रह्माद्याः स्थावरान्ताश्च पश्यतो ज्ञानचक्षुषः ॥ तमेकमेव पश्यंति परिशुद्धांचितं द्विजाः ॥ १४ ॥ किंच अमृतबिंदूपनिषदि ॥ गवामनेकवर्णानां क्षीरस्याप्येकवर्णता ॥ क्षीरवत्पश्यते ज्ञानं लिंगिनस्तु गवां यथा ॥ १५ ॥ तथैवोक्तं योगसंग्रहे ॥ ज्ञानस्य परिनिष्पत्तिर्निर्ममत्वादिकैर्गुणैः ॥ निश्चयो नान्यथा ज्ञानात्परमात्मस्पृशो भवेत् ॥ १६ ॥ तत्वसारे ॥ न रक्तं न च वा पीतं न शुक्लं कृष्णमेव च ॥ सर्वैर्गुणैर्विनिर्मुक्तं नानातीतं परात्परं ॥ १७ ॥ एवं निष्पत्तिलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं शरणस्य पिण्डे पिण्डस्वरूपं प्राप्य तत्पिंडं निरवयवस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं पिंडाकाशस्थलमित्युच्यते ॥ १८ ॥ ऐतरेयोपनिषदि ॥ आकाशशरीरं ब्रह्म सत्यात्मप्राणारामं मन आनंदं शांतिसमृद्धिममृत

---

याप्रमाणें भावाच्या ठिकाणीं निष्पन्न झालेलें लिंग शरणाच्या त्रिपुटीचा नाश झाल्यानंतर त्या शरणाच्या ज्ञानाच्या मध्यावस्थेमध्यें स्वतः राहून त्या ज्ञानाच्या निष्पत्तिस्वरूपाल पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञाननिष्पत्तिस्थल सांगतात. ( १४ ) चुलिकोपनिषदांत सांगितलें कीं, " ब्रह्माद्याः " ( अर्थ ) दीक्षेनें संपन्न असे ब्राह्मणहो, ब्रह्मदेवापासून तों तहत स्थावरापर्यंत असलेले सर्व जीव ज्ञानरूपी चक्षूंनीं ( डोळ्यांनीं त्या एक परब्रह्मवस्तूलाच पाहतात व शुद्ध अशा चिच्छक्तीलाही पाहतात. परब्रह्मवस्तूला आणि चिच्छक्तीला एकस्वरूपानें पाहतात असाही अर्थ होण्याचा संभव आहे. ( १५ ) आणि अमृतबिंदूपनिषदामध्यें सांगितलें कीं, " गवा० " ( अर्थ ) गायी अनेक रंगांच्या असल्या तरी त्या सर्व गायींचें दूध एकच रंगाचें असतें, परंतु दुधामध्यें वर्णभेद असत नाहीं. तसें लिंगांगीचें ज्ञान असतें. असें ज्ञानी लोक पाहतात. ( १६ ) तसेंच योगसंग्रहांत सांगितलें कीं, " ज्ञानस्य० " ( अर्थ ) निर्ममत्व ( अहंकार नसणें ) वगैरे गुणांनीं ज्ञानाची उत्पत्ति होतें. अशा त्या ज्ञानानेंच निश्चयपणें परमात्मलिंगाची प्राप्ति होते, याशिवाय होत नाहीं. ( १७ ) तत्वसारांत सांगितलें कीं, " न रक्तं " ( अर्थ ) परात्परवस्तु ही तांबडी नाहीं, पिवळी नाहीं, पांढरी नाहीं, काळी नाहीं, सर्व गुणांहून मुक्त असून ज्ञानाच्याही पलीकडे आहे. ( १८ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविधनिष्पत्तिलिंग मिळून एक झालेलें लिंग शरणाच्या पिंडामध्यें पिंडस्वरूप पावून तें पिंड निरवयवस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर पिंडाकाशस्थल सांगतात. ( १९ ) ऐतरेयोपनिषदांत सांगितलें कीं, " आकाशशरीरं ब्रह्म " ( अर्थ ) परब्रह्मवस्तूचें शरीर आकाश हेंच आहे. व ती वस्तु सत्यस्वरूप असून प्राणाला क्रीडास्थान होऊन राहिलेली आहे. व मनाचें आनंदस्वरूप असून समृद्ध ( संपूर्ण ) शांतस्वरूपाची आहे. व मोक्षस्वरूप आहे.

मिति प्राचीनयोगिन्नुपास्व ॥ १९ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ शरीरे परमाकाशं परात्परतरं शिवं ॥ भावयेद्भावसंशुद्धेः पिंडाकाशः स उच्यते ॥ २० ॥ किंच सूक्तावल्यां ॥ वृत्तम् ॥ षट्त्रिंशतासंघटितान्तराय त्वगादिसप्तावरणान्विताय ॥ नादात्मलिंगस्थितिमंगलाय नमः शरीराय शिवालयाय ॥ २१ ॥ एवं पिण्डनिरवयवत्वापन्नलिंगं शरणस्य पिंडमध्यस्थचितिबिंद्वाकाशस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं बिंद्वाकाशस्थलमित्युच्यते ॥ २२ ॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ य एषोऽन्तर्हृदयाकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः ॥२३॥ किंच तैत्तरीयोपनिषदि ॥ स एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिन्नयं पुरुषो मनोमय अमृतो हिरण्मयः ॥ २४ ॥ तथैवोक्तं किरणागमे ॥ सदाशिवादितत्वानां कारणं व्यापकः शिवः ॥ बिंदुरूपः शिवो ध्येयो बिंद्वाकाश इतीर्यते ॥२५॥ निश्वासकारिकायां ॥ बिंदुमध्यगतं सूक्ष्मं सुषिरं ज्योतिरूपकं ॥ दृष्ट्वा तं सर्वभूतात्मा स शांतिपददीपकं ॥ २६ ॥ एवं बिंद्वाख्यनिरवयवलिंगं शरणस्य ज्ञानलक्ष्यस्याश्र-

---

असें जाणून हे प्राचीन योग्या, तूं त्या वस्तूची उपासना कर. ( २० ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " शरीरे० " ( अर्थ ) या शरीरामध्यें परात्परतर परमाकाशस्वरूप शिवरूप वस्तूची भावना भावाची शुद्धि होईपर्यंत केली तर त्याला पिंडाकाश असें ह्मणतात. ( २१ )आणि सूक्तावलींत सांगितलें कीं, " षट्त्रिंशता० " ( अर्थ ) छत्तीस तत्वें ज्यामध्यें आहेत, व जें त्वगादि सात आवरणांनीं युक्त आहे, व जें नादस्वरूप लिंगाच्या स्थितीला मंगलस्वरूप होऊन राहिलें आहे. व ज्याला शिवालय असें ह्मणतात, अशा या शरीराला नमस्कार असो. ( २२ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें पिंडनिरवयवत्वाला पावलेलें लिंग शरणाच्या पिंडाच्या मध्यभागीं असलेल्या मनामध्यें बिंद्वाकाशस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर बिंद्वाकाशस्थल सांगतात. ( २३ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " य एषोंत० " ( अर्थ ) या हृदयामध्यें जें एक बिंद्वाकाश आहे, त्या बिंद्वाकाशामध्यें सर्वांस अधिष्ठान असलेलें, सर्वांचा प्रभु ह्मणविणारें, सर्वांचा अधिपति असलेलें तें परब्रह्म राहतें. (२४) तैत्तरीयोपनिषदांत सांगितलें कीं, " स एषो ० " ( अर्थ ) तें हें हृदयाकाश होय. या हृदयाकाशामध्यें मनोमय, मोक्षस्वरूप, हिरण्मयस्वरूप असा पुरुष राहिला आहे. ( २५ ) तसेंच किरणागमांत सांगितलें कीं, " सदाशिवादि० " ( अर्थ ) शिव हा सदाशिवादि तत्वांला कारण असून सर्वत्र व्याप्त होऊन राहिला आहे. तो शिव बिंद्वाकाशामध्यें बिंदुरूप होऊन राहिला आहे, अशा शिवाचें ध्यान करावें, असें सांगतात. ( २६ ) निश्वासकारिकेंत सांगितलें कीं, " बिंदु० " ( अर्थ ) बिंद्वाकाशामध्यें असलेलें परब्रह्म हें सूक्ष्म असून सुषिरस्वरूप आहे. आणि प्रकाशस्वरूप आहे. व मोक्षपदवीला प्रकाशणारें आहे, अशा परब्रह्मवस्तूला पाहून शरण हा सर्व प्राण्यांच्या अंतर्यामांत व्याप्त होऊन राहतो. ( २७ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें बिंदु नांवाचें निरवयवलिंग

यीभूतचैतन्ये निरस्तज्ञानज्ञेयभावं तत् निरवयवस्वरूपं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं महदाकाशस्थलमित्युच्यते ॥ २७ ॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ अदः पूर्णमिदं पूर्णं पूर्णात्पूर्णतरं महत् ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ खं ब्रह्म खं पुराणं ॥ २८ ॥ तथैवोक्तं वासिष्ठे ॥ सर्वं व्योम कृतं व्योम्ना व्योम्नि व्योम विलीयते ॥ भुज्यते व्योमनि व्योम व्योम व्योमनि शाश्वतं ॥ २९ ॥ तत्रैव ॥ सर्वोपाधिविहीनस्य साक्षात्कर्तुमशक्यतः ॥ महाकाशतया सर्वं दृश्यते तस्य वस्तुतः ॥ ३० ॥ एवमाकाशलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं शरीरस्य सर्वक्रियासु स्वयमेव प्रकाशत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ॥ क्रियाप्रकाशस्थलमित्युच्यते ॥३१॥ मुंडकोपनिषदि ॥ क्रियावन्तः श्रोत्रियाः ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुव्हन्त एकर्षिं श्रद्धयन्तस्तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत्तच्छिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णं ॥ ३२ ॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ अतीवोत्तमभावेन प्रसन्नविमलात्मनां ॥ या चोदिता निवृत्तिः

---

हें शरणाच्या ज्ञानरूप लक्ष्याला ( नेमाला ) आश्रय झालेल्या चैतन्यामध्यें ज्ञानज्ञेयरूप संबंधाचा निरास करून निरवयवस्वरूपाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर महदाकाशस्थल सांगतात. ( २८ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं " अदः पूर्ण० " ( अर्थ ) तें असें भासणारें पूर्ण असून हें असें भासणारेंही पूर्ण आहे. व पूर्णापेक्षां पूर्ण असलेलें तें " महत् " असें ह्मणवून घेतें. पूर्णांतील पूर्ण घेतलें तर शेवटीं पूर्णच राहतें. अनादिसिद्ध परब्रह्म हें आकाशस्वरूप आहे. पुराण ( पुरातन ) ब्रह्म हें महदाकाशस्वरूप आहे. ( २९ ) तसेंच वसिष्ठपुराणांत सांगितलें कीं, " सर्वं० " ( अर्थ ) आकाशानें सर्व आकाशच केलें आहे, आकाशाच्या ठिकाणीं आकाश लीन होतें. आकाशाच्या ठिकाणीं आकाश हें उपभोगिलें जातें. आकाशाच्या ठिकाणीं आकाश शाश्वत होऊन राहिलें आहे ( ३० ) तेथंच सांगितलें कीं, " सर्वोपा० " ( अर्थ ) अंडपिंडरूप उपाधींनीं रहित असलेल्या वस्तूला प्रत्यक्षपणें करावयास अशक्य असल्यामुळें महदाकाशस्वरूपानें सर्व दिसतें. ( ३१ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें त्रिविध आकाशलिंग मिळून एक झालेलें लिंग शरणाच्या सर्व क्रियेमध्यें स्वतः प्रकाशाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर क्रियाप्रकाशस्थल सांगतात. ( ३२ ) मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं, " क्रियावंतः " ( अर्थ ) चांगल्या क्रिया करणारे असून उत्तम श्रोत्रिय जे आहेत, व परब्रह्माच्या ठिकाणीं निष्ठा ठेवणारे असून प्राणाग्निहोत्रामध्यें होम करणारे जे आहेत, व एक्या परब्रह्माच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवणारे जे आहेत, त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी. व ज्यांनीं हें वीरशैवव्रत केलें आहे, त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी. ( ३३ ) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें कीं, " अतीवोत्तम० ( अर्थ ) अत्यंत उत्तम भावानें प्रसन्न व निर्मळ मन ज्याचें झालें आहे, त्यांना जी निवृत्ति सांगितली असेल, ती निवृत्ति क्रियेला प्रकाशक होऊन राहते.

स्यात्सा क्रियायाः प्रकाशिता ॥ ३३ ॥ किंच रुद्रयामले ॥ दृश्यजातमशेषं च शिवत्वेनैव पश्यतः ॥ क्रियाकलापस्तस्यैव चिद्रूपं चाखिलं भवेत् ॥ ३४ ॥ एवं क्रियायां स्वयमेव क्रियास्वरूपं प्राप्य प्रकाशभूतलिंगं शरणस्य मनोभावमध्ये भावस्वरूपं स्वयमेव भूत्वा प्रकाशत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भावप्रकाशस्थलमित्युच्यते ॥ ३५ ॥ हंसोपनिषदि ॥ भावः प्रकाशते येन यत्र भावः प्रलीयते ॥ तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सुखी भवति संयमी ॥ ३६ ॥ तथैवोक्तं विज्ञानभैरवीये ॥ शिवभावप्रकाशेन नष्टभेदतमस्यथ ॥ पुनः स एव विमलः शिवमेव प्रकाशते ॥ ३७ ॥ किंच रुद्रयामले ॥ अनाहते ततः शून्ये सुस्थितं युगपन्मनः ॥ आद्यंतशून्यनिरतः शिवभावः प्रकाशते ॥ ३८ ॥ स्वावबोधे च ॥ यद्येवं परमो भावः प्रत्यग्भूतः प्रकाशितः ॥ स याति परमं भावं स्वकं साक्षात्प्रकाशितम् ॥ ३९ ॥ एवं भावप्रकाशित्वापन्नलिंगं शरणस्य भावभाविभावितमिति त्रिपुटिनाशानंतरं स्वयमेव महाज्ञानं भूत्वा स्वस्मिन्नेव स्वयं प्रकाशत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञानप्रकाशस्थलमित्युच्यते ॥ ४० ॥ मुण्डकोपनिषदि ॥

---

(३४) आणि रुद्रयामलांत सांगितलें कीं, " दृश्य० " (अर्थ) जगामध्यें जें कांहीं दिसतें, तें सर्व शिवभावानें पाहणाऱ्याचें क्रियाकलापच ( सर्व क्रिया ) चित्स्वरूप होईल (३५) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें क्रियेमध्यें स्वतःच क्रियास्वरूप पावून प्रकाशभूत झालेलें लिंग शरणाच्या मनोभावामध्यें स्वतःच भावस्वरूप होऊन प्रकाशत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर भावप्रकाशस्थल सांगतात. ( ३६ ) हंसोपनिषदांत सांगितलें कीं, " भावः " ( अर्थ ) ज्याच्या योगानें भाव हा प्रकाशतो, व ज्याठिकाणीं भाव हा लीन होतो, तेंच ब्रह्म मी आहे, असें जाणून तो संयमी ( नियमन करणारा योगी ) सुखी होतो. ( ३७ ) तसेंच विज्ञानभैरवीयांत सांगितलें कीं, " शिवभाव० " ( अर्थ ) शिवभावरूप प्रकाशानें ज्याचा भेदरूपी अंधकार ( अज्ञान ) नष्ट झाला आहे, तो पुनः निर्मळ होऊन शिवाला प्रकाशतो. ( भेदज्ञान नष्ट झाल्यानंतर शिवच मी आहे असें ज्ञान जेव्हां होईल तेव्हां त्याला शिवस्वरूप प्राप्त होतें ) ( ३८ ) आणि रुद्रयामलांत सांगितलें कीं, " अनाहते० " ( अर्थ ) शून्य अशा अनाहत चक्रामध्यें मन हें एके कालींच स्थिर होऊन राहिलें असतां आदि अंतरहित असा शिवभाव प्रकाशतो. ( ३९ ) स्वावबोधांत सांगितलें कीं, " यद्येवं० " ( अर्थ ) याप्रमाणें जर तो श्रेष्ठ शिवभाव प्रत्यग्भूत होऊन ( सन्मुख होऊन ) प्रकाशला तर तो प्रत्यक्ष प्रकाशलेला स्वीय भाव ( आपला ) परमपदाला जातो. ( ४० ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें भावप्रकाशित्वाला पावलेलें लिंग शरणाच्या भावानें भावित झालेलें असतें म्हणून त्रिपुटीचा नाश होतो, त्यानंतर स्वतःच महाज्ञानस्वरूप होऊन स्वतःच्या ठिकाणींच स्वप्रकाशत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानप्रकाशस्थल सांगतात. ( ४१ ) मुंडकोपनिषदांत सांगि-

मायामात्रमिदं द्वैतमद्वैतं परमार्थतः ॥ विकल्पो विनिवर्तेत कल्पितो यदि केन चित् ॥ उपदेशादिना पाशे ज्ञाते द्वैतं न विद्यते ॥४१॥ तथैवोक्तं सूतसंहितायां ॥ द्वैतं मायामयं प्राह श्रुतिः सत्यार्थवादिनी ॥ वास्तवं प्राह चाद्वैतं सर्वमानातिगामिनी ॥ ४२ ॥ किंच वासिष्ठे ॥ ब्रह्मज्ञाने समुत्पन्ने विश्वोपाधिविवर्जिते ॥ सर्वं संविन्मयं भाति तदन्यं नैव दृश्यते ॥ ४३ ॥ स्वावबोधेऽपि ॥ न किंचिच्चिन्तयेद्योगी उदासीनपरो भवेत् ॥ न किंचिच्चिन्तनादेव स्वयं तत्वं प्रकाशते ॥ ४४ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे प्रसादलिंगस्थलं नाम पंचमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

तलें कीं, " मायामात्र० " ( अर्थ ) हा द्वैत केवळ मायामय ( खोटा ) असून वास्तविक पाहिलें तर अद्वैतच खरें आहे. जर कोणी मनांतला विकल्प काढून टाकील तर त्याला सर्व कल्पितच भासेल. उपदेश वगैरे साधनांनीं संसारपाश समजला तर द्वैत नाहींसा होईल ( ४२ ) तसेंच सूतसंहितेंत सांगितलें कीं, " द्वैतं० " ( अर्थ ) सत्य अर्थ सांगणारी श्रुति ही द्वैत निवळ खोटा आहे, असें सांगते. सर्व प्रमाणांमध्यें श्रेष्ठ प्रमाण ज्याला ह्मणतात अशी ती श्रुति अद्वैतच वास्तव आहे, असें सांगते ( ४३ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, " ब्रह्मज्ञाने० " ( अर्थ ) सर्व उपाधि निघून गेल्यानंतर ब्रह्मज्ञान जें उत्पन्न होतें, त्याच्या योगानें सर्व जग चिदानंदमयच दिसतें, त्याशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. ( ४४ ) स्वावबोधांत सांगितलें कीं, " न किंचिं० " ( अर्थ ) योग्यानें कांहींएक चिंतन करूं नये, नेहमीं उदासीन होऊन राहावें. चिंतनाच्या योगानीं स्वयंतत्व प्रकाशत नाहीं.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनी रचलेल्या परमवीर शैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारांतील लिंगस्थलनिरूपणांतील प्रसादिस्थल नांवाचें पांचवें प्रकरण संपलें.

---

## षष्ठं प्रकरणं.

॥ श्रीशिवाय नमः ॥ एवं प्रकाशलिंगं ऐक्ये परिणामग्राहकत्वं प्राप्य सोऽपि तस्मिन् लिंगे परिणामग्राहकत्वं प्राप्य भिन्नभावपरित्यागेन परमानंदपरिणामत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं स्वीकृतप्रसादिस्थलमित्युच्यते ॥ १ ॥ अथैवं प्रसादलिंगपरिणामः शरणः अधिष्ठानसामरस्येन महालिंगैक्यं गन्तुमुद्युक्तः व्यापकलिंगत्रैविध्यनिष्ठतया प्रतीतः सन् तथाविधैक्यत्वे सर्वाचारसंपत्तेरेव कारणत्वादधिष्ठानलिंगत्रैविध्ये निजस्वरूपमवगम्य एकभाजनसहभोजनयोरार्पितसामरस्येनातीतलिंगत्रैविध्यनिष्ठत्वेन निरवयवो भूत्वा स्थायित्वमेव परशिवस्वरूपत्वमिति सिद्धं ॥२॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ यत्रास्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कं श्रावयेत्तत्केन कं स्पृशेत्तत्केन कमास्वादयेत् ॥ ३ ॥ किंच ॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ भुक्तशेषं भगवतस्त्रैलोक्यं स चराचरं ॥ ४ ॥ किंच मुण्डकोपनिषदि ॥ सन्नि-

---

## उत्तरार्ध ६ वें प्रकरण.

श्रीशिवास नमन असो. १ याप्रमाणें त्रिविधप्रकाशलिंग मिळून एक झालेलें लिंग ऐक्याच्या ठिकाणीं परिणामग्राहकत्वाला पावून व तो ऐक्यही त्या लिंगाच्या ठिकाणीं परिणामग्राहकत्वाला पावून भिन्नभावाच्या परित्यागानें परमानंदपरिणामत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर स्वीकृतप्रसादिस्थल सांगतात. २ "अथैवं" ( अर्थ ) अनंतर प्रसादलिंगाच्या ठिकाणीं परिणति पावलेला शरण हा अधिष्ठानाच्या सामरस्यानें महालिंगैक्याला जाण्याकरितां प्रयत्न करणारा होऊन त्रिविध व्यापकलिंगामध्यें निष्ठा ठेवल्यामुळें प्रसिद्ध होऊन व तशा तऱ्हेच्या ऐक्यपणाविषयीं सर्वाचारसंपत्तीलाच कारणत्व येत असल्यामुळें त्रिविध अधिष्ठानलिंगामध्यें निजस्वरूपाला पावून एकभाजनसहभोजनामध्यें सामरस्य अर्पण केल्यामुळें व त्रिविधलिंगाच्या ठिकाणीं निष्ठेचें अतिक्रमण न केल्यामुळें निरवयवच होऊन राहणें परशिवस्वरूपपणा आहे, असें सिद्ध झालें. त्रिविध लिंगाच्या ठिकाणीं एकनिष्ठ होऊन राहत असल्यामुळें तो शरण निरवयव होऊन परशिवस्वरूपाला पावतो असें सिद्ध झाले ) ३ बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, " यत्रास्य." अर्थ ) ज्या वस्तूच्या ठिकाणीं या ऐक्याला सर्व परब्रह्मच होऊन बसल्यानंतर तें (महालिंग कशानें कोणाला पाहील, व कशानें कोणाचा वास घेईल, व कशानें काय ऐकेल, कशानें कोणाचा स्पर्श करील, व कशानें कोणाचा आस्वाद घेईल. ( ४ ) आणि वृद्ध जाबालोपनिषदांत सांगितलें कीं " भुक्तशेषं " ( अर्थ ) चराचरस्वरूप हें त्रैलोक्य भगवान श्रीपरशिववस्तूनें उपभोगिलेलें शेष आहे. ( ५ ) आणि मुंडकोपनिषदांत सांगितलें कीं " सन्नि० " ( अर्थ ) चांगल्या तऱ्हेनें संनिहित झालेलें, दहराकाशामध्यें असलेलें, महालिंगपद हें दहराकाश या नांवानें प्रसिद्ध झालें आलें आहे. त्याठि-

हितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्सर्वमर्पितमेतत्प्राणं निमेषश्च यत् ॥ ५ ॥ किंच तलवकारोपनिषदि ॥ यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यन्ति तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रेणेदं श्रुतं तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्राणीयते तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ ६ ॥ तथैवोक्तं शिवयोगदीपिकायां ॥ आर्या ॥ आदाय बाह्यविषयानिंद्रियमार्गैरहंकृतौ चेतः ॥ अर्पयति सा च बुद्धौ बुद्धेः साक्षी ततः पुमान्भुंक्ते ॥ ७ ॥ किंच शिवसूत्रे ॥ स्वात्मार्पणं विकल्पानामर्पणं शिवधामनि ॥ तृप्तिसंकोचविलयविकाशशिवचित्सुखं ॥ ८ ॥ लिंगसारे ॥ जन्मत्रयमिदं वक्ष्ये स्थित्युत्पत्तिविनाशनं ॥ संकल्पितार्पितं भावमर्पितत्रयमुत्तमं ॥ ९ ॥ आधिव्याधिमहाशाखं त्रिविधं लिंगार्पितं सदा ॥ बाल्ययौवनवृद्धत्वं त्रिविधं लिंगार्पितं[1] सदा ॥१०॥ विस्मयं

काणीं हे प्राण व हे निमेष सर्व जें कांहीं असेल तें अर्पण केलें आहे. ( ६ ) आणि तलवकारोपनिषदांत सांगितलें कीं " यद्वाचा. " ( अर्थ ) वाणीच्या योगानें ज्याचा उदय होत नाहीं ( कितीही स्तोत्र वाणीनें केलें तर कळत नाहीं ) व वाणीचा उदय ज्याच्या योगानें होतो, तेंच ब्रह्म ( महालिंग ) आहे. असें तूं जाण आणि जें या जगाची उपासना करीत नाहीं, व जें डोळ्याला दिसत नाहीं, डोळे ज्याच्या योगानें दिसतात, तेंच ब्रह्म आहे, असें तूं जाण व जें ज्याची उपासना करीत नाहीं, जी वस्तु श्रोत्रेंद्रियानें रहित आहे, परंतु ज्या वस्तूच्या योगानें श्रोत्रेंद्रिय शब्दाला ग्रहण करतात. व जें प्राणाच्या योगानें प्राणावस्थेंत राहत नाहीं ज्याच्या योगानें प्राणमात्र पोशिले जातात, जें ज्याची उपासना करीत नाहीं तेंच ब्रह्म आहे, असें तूं जाण. ( ७ ) तसेंच शिवयोगदीपिकेंत सांगितलें कीं, "आदाय०" ( अर्थ ) मन हें सर्व इंद्रियांच्या द्वारांनीं बाह्यविषयांचा अंगिकार करून अहंकृतीच्या ठिकाणीं अर्पण करितें. व ती अहंकृति बुद्धीच्या ठिकाणीं अर्पण केली जाते. नंतर बुद्धीचा साक्षीभूत होऊन हा पुरुष सुखदुःखाचा उपभोग घेतो. ( ८ ) आणि शिवसूत्रांत सांगितलें कीं, " स्वात्मार्पणं " ( अर्थ ) विकल्पांचें ( संशयाचें ) अर्पण आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं करावें. व तो आत्मा शिवस्वरूपाच्या ठिकाणीं अर्पण करावा, ह्मणजे तृप्तीच्या संकोचाच्या लयानें प्रकाशणारें शिवानंदसुख मिळतें. ( ९ ) लिंगसारांत सांगितलें कीं, " जन्मत्रय० " ( अर्थ ) सृष्टि, स्थिति, लय यां नांवाचें जन्मत्रय हेंच आहे, असें मी सांगतों, संकल्पकरून अर्पण केलेला भाव श्रेष्ठ अर्पितत्रय असें ह्मणवून घेत आहे. ( १० ) " आधि० " ( अर्थ ) मानसिक शारीरक दुःखरूपी शाखा असलेलें शरीररूपी त्रिविध झाड सर्वदा लिंगार्पितच करावें. या शरीराच्या ठिकाणीं बाल्य, यौवन, वार्धक्य या ज्या तीन अवस्था आहेत, त्या अवस्थांचें अर्पण सर्वदा लिंगाच्या ठिकाणीं करावें. ( ११ ) विस्मय ( आश्चर्य ) जनन,

[1] भवेल्लिंगार्पितं सदा.

जननं निद्रा सर्व लिंगे समर्पितं ॥ कृष्णं श्वेतं च पीतं च स्वयं लिंगे समर्पितं ॥ ११ ॥ उत्पत्तिस्थितिपर्यन्तं सुखदुःखेषु सर्वथा ॥ संपदश्च व्युदासोऽहं सर्वद्रव्यं समर्पितं ॥ १२ ॥ वासिष्ठे ॥ नान्यत्पश्यति योगीन्द्रो नान्यज्जानाति किंचन ॥ नान्यच्छृणोति संदृष्टे चिदानंदमये शिवे ॥ १३ ॥ तत्रैव ॥ न वांच्छिता न त्यजिता ज्ञेयं प्राप्यं स्वभावतः ॥ सरितः सागरेणैव भोक्तव्या भोगभूमयः ॥ १४ ॥ एवं परमानंदप्रसादजनितसुखमालिंग्य तृप्तिलिंगमैक्ये स्वयं स्वस्य रूपत्वेन स्थितभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं शिष्टोदनस्थलमित्युच्यते ॥ १५॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदंत्यस्थूलमनण्वन्ह्रस्वमदीर्घमथात आदेशो नेति नेति ॥ १६ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ नेति नेतीति नेतीति शेषितं यत्परं पदं ॥ निराकर्तुमशक्यत्वात्तदस्मीति सुखी भवेत् ॥ १७ ॥ चंद्रावलोकने ॥ चित्तत्वैकस्वरूपस्य न स्याज्ज्ञेयादिकं क्वचित् ॥ यत्रत्स्थितं तत्त-

---

निद्रा हे सर्व लिंगाच्या ठिकाणीं सदा अर्पण करावेत. कृष्ण, श्वेत, पीत हे सर्व स्वतः लिंगाच्या ठिकाणीं अर्पण करावेत. ( १२ ) " उत्पत्ति० " ( अर्थ ) सुखें व दुःखें उत्पत्ति स्थितिपर्यंतच असतात, या सुखदुःखामध्यें येणाऱ्या संपत्तिविपत्तीच्या ठिकाणीं उदासीन होऊन सर्व द्रव्य लिंगाच्या ठिकाणीं अर्पण केलें जातें. ( १३ ) वासिष्ठांत सांगितलें कीं, " नान्यत्पश्यति० " ( अर्थ ) श्रेष्ठ योगी हा दुसरें कांहीं पाहत नाहीं, दुसरें कांहीं जाणत नाहीं. दुसरें कांहीं ऐकत नाहीं. कारण चिदानंदमय श्रीशिवाच्या ठिकाणीं त्याची दृष्टि नेहमीं लागून राहिलेली असते. ( १४ ) तेथेंच सांगितलें कीं, " न वांच्छितां० " ( अर्थ ) या विषयांची इच्छा केली नाहीं, व यांचा त्यागही केला नाहीं, तर स्वभावतः येतात, व स्वभावतः जातात, असें जाणून त्यांचा उपभोग घ्यावा समुद्राला नद्या जशा येऊन मिळतात, त्याप्रमाणें भोगभूमि जाणाव्या. ( १५ ) " एवं० " ( अर्थ ) याप्रमाणें परमानंदनिजसुखाचें आलिंगन करून तृप्तिलिंग हें ऐक्याच्या ठिकाणीं स्वतः स्वस्वरूपपणानें स्थिति भेदाचें कसें झालें? अशी आकांक्षा आल्यानंतर शिष्टोदनस्थल सांगतात. ( १६ ) " बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं, हे गार्गी ऋषीश्वरा, क्षररहित ( नाशरहित ) तें परब्रह्म हेंच आहे, असें स्वीकृतप्रसादिस्थलानंतर परब्रह्मासंबंधी ब्राह्मण सांगतात कीं, तें परब्रह्म स्थूल नाहीं, तें लहान नाहीं, ठेंगणें नाहीं, लांब किंवा उंच नाहीं, म्हणूनच या प्रपंचामध्यें तें हें नव्हे, तें हें नव्हे, असा उपदेश करतात. ( १७ ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं,— हें तें नव्हे, हें तें नव्हे, हें तें नव्हे, असें म्हणतां म्हणतां जें श्रेष्ठ पद राहील तें निराकार करावयास अशक्य असल्यामुळें तेंच मी आहे, असें म्हणून सुखी व्हावें. ( १८ ) चंद्रावलोकनांत सांगितलें कीं, चिदानंदस्वरूपामध्यें अभेदभाव पावलेल्या ज्ञान्याला या जगांत समजून घ्यावयाची वस्तु कोणतीही नाहीं. जें जें या जगांत असेल, तें तें सर्व या ज्ञा-

दस्य भासा ज्ञानमयं मतं ॥ १८ ॥ किंच सूतसंहितायाम् ॥ वृत्तम् ॥ गुरूपदेशेन शिवं विलोकयेद्विलोकनेनापि शिवं विलोकयेत् ॥ विलोकनं चापि विसृज्य केवलं स्वभावभूतं[१] स्वचिदेव शिष्यते ॥ १९ ॥ एवं निजस्वरूपस्थितलिंगं ऐक्ये चराचरोभयनास्तित्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं चराचरनास्तिस्थलमित्युच्यते ॥ २० ॥ चुलिकोपनिषदि ॥ यस्मिन्सर्वमिदं प्रोतं ब्रह्म स्थावरजंगमं ॥ तस्मिन्नेव लयं याति बुद्बुदाः सागरे यथा ॥ २१ ॥ तथैवोक्तं वासिष्ठे ॥ नैकता नान्यथा चैव न महत्ता न चाणुता ॥ वेदनत्वं स्वसंवेद्यं यत्र नास्ति चराचरं ॥२२॥ तत्रैव ॥ यत्किंचिद्वाङ्मयं लोके जगत्स्थावरजंगमं ॥ चराचरं जगद्विश्वं मदन्यन्नास्ति किंचन ॥ २३ ॥ किंच सर्वज्ञानोत्तरे ॥ क्रिमिकीटपतंगेषु स्थावरे जंगमे तथा ॥ न किंचिदस्ति वस्तुत्वं सर्वदैव प्रतिष्ठितं ॥ २४ ॥ एवं व्यापकलिंगत्रैविध्यमेकीभूतलिंगं ऐक्यस्य सर्वांगमिति भाण्डे लीनं सत् सर्वाचाराख्यसकलकरणद्रव्याणामाश्रयस्थानत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भाण्डस्थलमित्युच्यते ॥ २६ ॥ कैवल्योपनिषदि ॥ मय्येव सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितं ॥

---

त्याच्या प्रकाशानें ज्ञानमय झालेलें असतें. ( १९ ) आणि सूतसंहितेंत सांगितलें कीं, साक्षात् श्रीगुरूच्या उपदेशानें श्रीशिवाला पाहावें, आणि त्या पाहण्यानेंही श्रीशिवालाच पाहावें. नंतर तें पाहणें सोडून दिलें ह्मणजे नंतर केवल स्वभावभूत आपलें ज्ञानच बाकी उरतें ( शेवटीं ज्ञानच राहतें ) ( २० ) याप्रमाणें निजस्वरूपामध्यें राहिलेलें लिंग हें ऐक्याच्या ठिकाणीं चराचरोभयनास्तित्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर चराचरनास्तिस्थल सांगतात. ( २१ ) चुलिकोपनिषदांत सांगितलें कीं, समुद्रांतील पाण्यावरचें बुडबुडे तेथेंच उत्पन्न होऊन तेथेंच कसे लय पावतात, त्याप्रमाणें ब्रह्मदेवआदिकरून स्थावरजंगम जग हें जेथें उत्पन्न होतें, तेथेंच लय पावतें. ( २२ ) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं, ज्या परब्रह्माच्या ठिकाणीं एकत्व नाहीं, व अनेकत्वही नाहीं, तें परब्रह्म मोठें नाहीं, लहान नाहीं, आपल्या आपणच समजून घ्यावयाचें ज्ञानस्वरूप आहे, त्या परब्रह्मवस्तूंत हें चराचर जग नाहीं. ( २३ ) तेथेंच सांगितलें कीं, जें कांहीं स्थावरजंगमस्वरूप जग वाङ्मय ( वाणीस्वरूप ) आहे, व जें कांहीं चराचर जग असेल तें माझ्याशिवाय कोणतेंही नाहीं. ( २४ ) आणि सर्वज्ञानोत्तरांत सांगितलें कीं, क्रिमि, कीट, पतंग, स्थावर, जंगम यांमध्यें सर्वदा ( केव्हांही ) स्थिर असा वस्तुपणा थोडा देखील नाहीं. ( २५ ) याप्रमाणें त्रिविध व्यापकलिंग मिळून एक झालेलें लिंग ऐक्याच्या सर्वांगरूपी भांडामध्यें लीन होऊन सर्वाचार नांवाच्या सर्व करणद्रव्यामध्यें आश्रयस्थानाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर भांडस्थल सांगतात. (२६) कैवल्योपनिषदांत सांगितलें कीं, माझ्यापासून हें सर्व जग उत्पन्न झालें आहे, माझ्याच ठि-

---

१ यद्भावभूतं स्वचिदेव शिष्यते.

मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहं ॥ २६ ॥ किंच तैत्तरीयोपनिषदि ॥ यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवंति यत्प्रयान्त्यभिसंविशंति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्मेति ॥ २७ ॥ किंच प्रश्नोपनिषदि ॥ विज्ञानमात्मा सह देवैः सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठंति यत्र तदक्षरं वेदयते यस्तु सौम्य स सर्वज्ञः स सर्व मेवाधिवसाति ॥ २८ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ सर्वत्यागान्तरे नास्ति ज्ञानमात्मप्रदर्शकं ॥ यच्छून्यमेव भाण्डं स्यात्तत्र तत्राधितिष्ठति ॥ २९ ॥ स्तोत्रार्णवे ॥ वृत्तम् ॥ विकसति स्ववपुर्भवदात्मकं समुपयांति जगंति ममांगतां ॥ व्रजति सर्वमिदं द्वयभावितं स्मृतिपदोपगमप्यनुपास्यतां ॥ ३० ॥ एवं सर्वकारणानीति सर्वाचारसाधनानि व्याप्य भाण्डस्वरूपं प्राप्तलिंगं तस्यैक्यस्य स्वयमेव भाजनस्वरूपत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भाजनस्थलमित्युच्यते ॥ ३१ ॥ ईशावास्योपनिषदि ॥ हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापि हितं जनं ॥ तत्वं पोपन्नपाहणु सत्यधर्माय दृष्टये ॥३२॥ तथैवोक्तं वासिष्ठे ॥ अखंडपरिपूर्णं यत्सच्चिदानंदलक्षणं ॥ तयेन ज्ञाप्यते तादृक्

---

काणीं हें सर्व प्रतिष्ठित झालें आहे, व माझ्याच ठिकाणीं हें सर्व लीन होतें, तें नाशरहित ब्रह्म मीच आहें. ( २७ ) आणि तैत्तरीयोपनिषदांत सांगितलें कीं, ज्याच्यापासून हे प्राणी जन्मले आहेत, ज्याच्यापासून जन्म घेऊन ज्याच्या योगानें पोशिले जातात, शेवटीं ज्याच्यामध्यें जातात, अथवा प्रवेश करतात, तेंच ब्रह्म आहे, असें जाण. ( २८ ) आणि प्रश्नोपनिषदांत सांगितलें कीं, हे सौम्या विज्ञानच आत्मा होय, देवांसह सर्व प्राण सर्व भूत ज्या ठिकाणीं राहतात, तेंच अक्षरपरब्रह्म होय. तें परब्रह्म जो जाणतो, तोच सर्वज्ञ असून तो सर्वत्र व्याप्त होऊन राहतो ( २९ ) तसेंच वातुलांत सांगितलें कीं, सर्व त्यागानंतर ( सर्व पदार्थांचा त्याग केल्यानंतर ) " नास्ति० " ( नाहीं ) असें जें ज्ञान राहतें, तें आत्म्याला दाखविणारें आहे. जें भांड शून्यच होईल तें त्या त्या ठिकाणीं राहील. (३०) स्तोत्रार्णवांत सांगितलें कीं, आपलें हें शरीर तुझ्या स्वरूपाचें होऊन विकास पावतें. सर्व लोक माझ्या शरीरत्वाला पावतात. द्वयभावानें भावना केलेलें हें सर्व जग स्मृतिपदाला गेलेलें असलें तरी अनुपास्यतेला ( उपासना राहित्याला ) पावतें. ( ३१ ) याप्रमाणें सर्व कारण अशा सर्वाचारसाधनांला व्यापून भांडस्वरूपाला पावलेलें लिंग त्या ऐक्याच्या स्वतःच भाजनस्वरूपत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर भाजनस्थल सांगतात. ( ३२ ) ईशावास्योपनिषदांत सांगितलें कीं, परमात्मा जरी सद्रूप आहे, तरी त्याच्याठिकाणीं हिरण्मयत्वाची भावना ठेवल्यामुळें प्राणिभाव प्राप्त झाला आहे, त्याकरितां हे सूर्या, सच्चरित्राच्या परमात्म्याच्या साक्षात्काराकरितां तूं तो प्राणिभाव सोडून दे. (३३) तसेंच वासिष्ठांत सांगितलें कीं,– जें अखंड परिपूर्ण आहे, जें सच्चिदानंदस्वरूपाचें आहे, असें तें परब्रह्म ज्या ज्ञानाच्या योगानें समजतें, तें ज्ञान आपल्यापेक्षां अभेद भावाचें भाजन आहे,

ज्ञानं स्वाभिन्नभाजनं ॥ ३३ ॥ किंच ॥ शिवधर्मोत्तरे ॥ यद्धौतं ज्ञानसलिलैः स्वात्मानंदप्रमार्जितं ॥ तत्पात्रं सर्वपात्राणामुत्तमं परिकीर्तितं ॥ ३४ ॥ एवमैक्यलिंगयोः सामरस्येनाविरलीभूतलिंगमैक्यस्य सर्वांगे लेपत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरमंगलेपनस्थलमित्युच्यते ॥ ३५ ॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ यस्मिन्निदं संचविचैति सर्वं यस्मिन्देवा अधिविश्वे निषेदुः ॥ ३६ ॥ किंच ध्यानबिंदूपनिषदि ॥ पुष्पमध्ये यथा गंधः पयोमध्ये तु सर्पिषः ॥ तिलमध्ये तथा तैलं पाषाणेऽपि तु कांचनं ॥ ३७ ॥ एवं सर्वाणि भूतानि मणिः सूत्र इवात्मनि ॥ स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्म ब्रह्मणि संस्थितः ॥३८॥ तिलेषु च यथा तैलं पुष्पे गंध इवाश्रये ॥ पुरुषस्य शरीरे तु स बाह्याभ्यन्तरे स्थितः ॥ ३९ ॥ तथैवोक्तं वातुले ॥ सबाह्याभ्यंतरं साक्षाल्लिंगं ज्योतिः परं स्वकं ॥ तिले तैलमिवाभातमरण्यामिव पावकः ॥ क्षीरे सर्पिरिव स्रोतस्यंबुवत्स्थितमात्मनि ॥ ४० ॥ एवमधिष्ठानलिंगं त्रैविध्यमेकीभूतलिंगमैक्ये इदमहमित्युभयं ज्ञात्वा प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं स्वपराज्ञस्थलमित्युच्यते ॥ ४१ ॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ यथा प्रियया स्त्रिया संपरिष्वक्तो न बाह्यं

---

असें समजावें. ( ३४ ) आणि शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं,— ज्ञानरूपी पाण्यानें जें धुतलेलें आहे, स्वात्मानंदानें ज्याचें मार्जन केलें आहे, तें पात्र सर्व पात्रांमध्यें उत्तम पात्र आहे, असें सांगितलें आहे. ( ३५ ) याप्रमाणें ऐक्य आणि लिंग यांच्या सामरस्यानें ऐक्य झालेलें लिंग ऐक्याच्या सर्वांगामध्यें लेपत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर अंगलेपनस्थल सांगतात. ( ३६ ) तैत्तरीयोपनिषदांत सांगितलें कीं,— ज्याच्याठिकाणीं हें सर्व जग वृद्धिक्षय पावतें, व त्या परब्रम्ह्माच्या ठिकाणीं सर्व देव ( योगीश्वर ) सामरस्य पावतात. ( ३७ ) आणि ध्यानबिंदूपनिषदांत सांगितलें कीं,— फुलांमध्यें जसा गंध आहे, व दुधामध्यें जसें तूप आहे, तिळांमध्यें जसें तेल आहे, दगडांमध्यें जसें सोनें आहे, ( ३८ ) त्याप्रमाणें हे सर्व प्राणी दोरींत मणि गोंवल्याप्रमाणें परमात्म्याच्या ठिकाणीं आहेत. तर जो स्थिर बुद्धीचा असेल, जो मोह पावत नाहीं, तो परब्रम्ह्माच्या ठिकाणीं सामरस्य पावून राहतो. (३९) तिळामध्यें तेल जसें असतें, फुलांमध्यें गंध जसा असतो. त्याप्रमाणें पुरुषाच्या शरीरामध्यें तो शिव आंत बाहेर व्याप्त होऊन राहिला आहे. ( ४० ) तसेंच वातुलागमांत सांगितलें कीं, श्रेष्ठ, स्वकीय, तेजोमय असें साक्षात् लिंग हें बाहेर व आंत राहतें. जसें तिळांत तेल दिसतें, व अरणींत अग्नि जसा दिसतो, व दुधांत तूप जसें असतें, स्रवणाऱ्या पदार्थांत पाणी जसें असतें, त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं परब्रह्मलिंग समजावें. ( ४१ ) याप्रमाणें त्रिविध अधिष्ठान लिंग मिळून एक झालेलें लिंग ऐक्याच्या ठिकाणीं " हें मी आहे. " असें दोन्ही जाणून पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर स्वपराज्ञस्थल सांगतात. ( ४२ ) बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें कीं,— एखादा पुरुष प्रिय अशा स्त्रीला

किंचन वेद नांतरं एवमेवायं पुरुषः प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नांतरं तद्वदसौ तदात्तकाममात्मकाममकामं रूपं शोकान्तरं ॥ ४२ ॥ किंच जाबालोपनिषदि ॥ यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ॥ अविज्ञातं विजानतां विज्ञानमविजानतां ॥ ४३ ॥ सर्वज्ञानोत्तरे ॥ स्वयं स्वस्य परो नैव न परः स्वस्य विद्यते ॥ इति धार्थेऽपि संलीने तस्मिन्ज्ञेयं न तस्य हि ॥ ४४ ॥ किंच वासिष्ठे ॥ सर्वज्ञता सा शिवता सावस्था परमात्मिका ॥ सा सत्यता सा च तृप्तिर्न यत्र स्वपरेक्षणं ॥ ४५ ॥ एवमिदमहमित्युभयज्ञत्वं प्राप्तलिंगैक्यभावनिर्भावोभयराहित्यं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं भावाभावनष्टस्थलमित्युच्यते ॥ ४६ ॥ अमृतबिंदूपनिषदि ॥ न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ॥ न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥ ४७ ॥ योगजागमे ॥ भावाभावद्वयातीतं स्वप्नजागरणातिगं ॥ मृत्युजीवननिर्मुक्तं तत्वं तत्वविदो विदुः ॥ ४८ ॥ किंच वासिष्ठे ॥ अहंभावो यदा नास्ति निरहंता तदा न हि ॥ न यत्राहं न निराहं तद्भावाभावनाशनं ॥ ४९ ॥ तत्रैव

---

आलिंगन दिल्यानंतर जसें आंत जाणत नाहीं, व बाहेरहीं जाणत नाहीं, त्याप्रमाणें प्राज्ञ अशा लिंगैक्य पुरुषानें आत्म्याला आलिंगन दिलें असतां तो आंत बाहेर कांहीं जाणत नाहीं. त्याचप्रमाणें लिंगैक्य हा जेव्हां लिंगांगसामरस्य पावल्यानंतर आपले मनोरथ, रूप, दुसरीं दुःखें कांहीं एक जाणत नाहीं. ( ४३ ) आणि जाबालोपनिषदांत सांगितलें कीं, ज्याला जें समजलें नाहीं, त्याला तें समजतें, ज्याला जें समजलें आहे. तें तो जाणत नाहीं. ज्ञान्यांला जें समजलें नाहीं, तें अज्ञान्यांला समजतें. ( ४४ ) सर्वज्ञानोत्तरांत सांगितलें कीं,— जो आपल्या ठिकाणीं परकी भाव समजत नाहीं, त्याला परकी भाव कोठेंही नाहीं. असें ज्ञान ज्या ऐक्याच्या ठिकाणीं लीन झालें आहे, त्या ऐक्याला जगांत समजून घ्यावयाची वस्तुच नाहीं. ( ४५ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं,— ज्या लिंगैक्याची दृष्टि आपपरभावानें नाहींशी झाली आहे, त्या दृष्टीलाच सर्वज्ञता ह्मणतात, व तिला शिवता ह्मणतात, तिलाच परमात्मस्वरूप अवस्था ह्मणतात, तिलाच सत्यता ह्मणतात, तिलाच तृप्ति ह्मणतात. ( ४६ ) याप्रमाणें हें मी आहें, अशा उभयज्ञत्वाला पावलेलें ऐक्यलिंग हें प्राप्तलिंगैक्य भाव निर्भावोभयराहित्याला पावलेल्या भेदाचें कसें होतें ? अशी आकांक्षा आल्यानंतर भावाभावनष्टस्थल सांगतात. ( ४७ ) अमृतबिंदूपनिषदांत सांगितलें कीं,— निरोध नाहीं, उत्पत्ति नाहीं बंधन नाहीं, साधन नाहीं, मोक्षाची इच्छा नाहीं, व मुक्तहीं नाहीं, यालाच परमार्थता ह्मणतात ( ४८ ) योगजागमांत सांगितलें कीं, भावाभावद्वयापलीकडे जें आहे, स्वप्नजागरणाच्या पलीकडे जें आहे, मरणजन्मापासून जें सुटलें आहे, तेंच तत्व आहे, असें तत्ववेत्ते ह्मणतात. ( ४९ ) आणि वासिष्ठांत सांगितलें कीं, जेव्हां अहंभाव नष्ट होईल, तेव्हां निरहंतेचाही नाश होतो. " मी " या ज्ञानाचा नाश होणें व मीपणाचा नाश होणें यालाच भावाभावनाशन ह्मणतात. ( ५० ) तेथेंच सांगितलें कीं,— मीपणाचा न

॥ त्वन्ताहन्तात्मता यत्र परता नास्ति काचन ॥ न क्वचिद्भेदकलना न भावाभावरंजना ॥ ९० ॥ एवं भावनिर्भावोभयरहितलिंगैक्यस्य मूलज्ञानमालिंग्य तज्ज्ञानमेव स्वयं भूत्वा तज्ज्ञानं निजस्वरूपे स्थित्वा शून्यत्वं प्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं ज्ञानशून्यस्थलमित्युच्यते ॥ ९१ ॥ तेजोबिंदूपनिषदि ॥ अशून्यं शून्यभावं तु शून्यातीतं हृदि स्थितं ॥ न ध्यातं न च वाध्यातं यत् ध्येयाध्येयमेव च ॥ ९२ ॥ सर्वं च यत्पदं शून्यं न परं न परापरं ॥ अचिंत्यमप्रबुद्धं च न सत्यं न च तद्विदुः ॥ ९३ ॥ तथैवोक्तं योगजागमे ॥ ज्ञानाचारसमायुक्ता ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ ज्ञानिनः शिवभावेन ज्ञानशून्यैक्यभागिनः ॥९४॥ किंच निश्वासकारिकायां ॥ उल्काहस्तो यथा कश्चिद्द्रव्यमालोक्य तां त्यजेत् ॥ ज्ञानेन ज्ञेयमालोक्य पश्चाज्ज्ञानं परित्यजेत् ॥ ९५ ॥ वासिष्ठे ॥ आत्मनो निर्विकारस्य क्व ज्ञानं क्व च वा क्रिया ॥ वेदका न बहिर्भावा अतः शून्यमिदं जगत् ॥ ९६ ॥ कामिकागमे ॥ यथा घृते घृतं न्यस्तं क्षीरे क्षीरं यथैव च ॥ केवलत्वं तथा प्राप्तं न किंचिदपि तद्भवेत् ॥९७॥ शून्यं शून्यं पुनः शून्यं त्रिशून्यं प्रश्यति क्षणात् ॥ सर्वशून्यं निराभासं सामरस्यं

---

तंपणाचा नाश जेथें झाला आहे, व जेथें परकीपणा कोणताही नाहीं, व भेदभाव जेथें नाहीं, तेथें भावाभाव मुळींच नसतो. ( ५१ ) याप्रमाणें भावनिर्भावांनी रहित झालेलें लिंग ऐक्याच्या मूलज्ञानाला आलिंगन देऊन तें ज्ञानच स्वतः होऊन तें ज्ञान निजस्वरूपांत राहून शून्यत्वाला पावलेल्या भेदाचें कसें होतें? अशी आकांक्षा आल्यानंतर ज्ञानशून्यस्थल सांगतात. ( ५२ ) तेजोबिंदूपनिषदांत सांगितलें कीं, शून्यरहित, शून्यकण असलेलें, शून्यापलीकडे असलेलें, हृदयाच्या मध्यभागीं असलेलें, ध्यानातीत असलेलें, ध्यानातीत नसलेलें, ध्यान करावयास योग्य नसलेलें, ध्यान करावयास योग्य असलेलें, ( ५३ ) आपल्यास परकें नसलेलें, परज्ञान अपरज्ञान यांनीं रहित असलेलें, चिंतन करावयास अशक्य असलेलें, बुद्धीला गोचर नसलेलें, सत्यासत्य नसलेलें असें जें ज्ञानातीत निष्कल ब्रह्मपद आहे, त्या ब्रह्मपदाला जाणत नाहींत. (५४) तसेंच योगजागमांत सांगितलें कीं,— ज्ञानाचारानें युक्त असलेलें, ज्ञानानें निष्कल्मप झालेले, असे ते ज्ञानी लोक शिवभावाच्या योगानें ज्ञानातीत निष्कल ब्रह्मपदाचा उपभोग घेतात. ( ५५ ) आणि निश्वासकारिकेंत सांगितलें कीं,— हातांत कोलीत घेऊन द्रव्य शोधणारा माणूस द्रव्य मिळाल्यानंतर कोलीत जसें टाकून देतो, तद्वत ज्ञानाच्या योगानें ज्ञेयवस्तु समजल्यानंतर ज्ञानी माणूस ज्ञानाचा त्याग करतो. ( ५६ ) वासिष्ठांत सांगितलें कीं,— निर्विकार अशा आत्म्याला ज्ञान कोठें आहे? व क्रिया कोठें आहे? ज्ञानी लोक बाहेर भाव ठेवीतच नसतात. याकरितां जग हें शून्याकार आहे. ( ५७ ) कामिकागमांत सांगितलें कीं,— तुपांत तूप, दुधांत दूध जसें ठेविलेलेंच असतें, तसें केवलत्व हें प्राप्त झालें आहे, त्या केवलत्वाला दुसरें रूप कधींही येत नाहीं. ( ५८ ) शून्य, शून्य, पुनः शून्य याप्रमाणें एका क्षणांत तीन वेळां शून्य

सदा भवेत् ॥ ९८ ॥ श्रीतोंटदार्यरचितमेकोत्तरशतस्थलं ॥ कैवल्यसारपठनात्तत्क्षण एव विमुक्तिभाक् ॥ ९९ ॥

इति श्रीमत्परमशिवयोगिराट्परिव्राजकाचार्यश्रीतोंटदार्यविरचिते परमवीरशैवाद्वैतबोधिन्यामेकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरणाख्यकैवल्यसारे लिंगस्थलनिरूपणे महालिंगस्थलं नाम षष्ठं प्रकरणं समाप्तम् ॥ ॥ श्रीः ॥ ॥ श्रीः ॥

---

पाहतो. ( जेव्हां परमात्मवस्तु उत्पत्तिशून्य होऊन स्थितिशून्य होऊन लयशून्य होऊन भूतभविष्यद्वर्तमानशून्य होऊन दिसतें ) सर्व शून्य हें निराभास जेव्हां होईल तेव्हां सामरस्य होतें. ( ९९ ) श्रीतोंटदार्यांनें केलेलें एकोत्तरशतस्थल अशा कैवल्यसाराचें पठन जो करतो, तो तत्काळ मुक्त होतो.

याप्रमाणें श्रीमत्परमशिवयोगिराज परिव्राजकाचार्य श्रीतोंटदार्यांनें रचलेल्या परमवीरशैवाद्वैतबोधिनींतील एकोत्तरशतस्थलश्रुतिमालाविवरण नांवाच्या कैवल्यसारग्रंथांतील लिंगस्थलनिरूपणांतील महालिंगस्थल नांवाचें सहावें प्रकरण संपलें.

---

कैवल्यसारास्वादेच्छाकारिणो यांतु सत्वरम्
कैवल्यमेवमित्येतद्वारदार्यैः प्रकाशितम् ॥ १ ॥



# विक्रीस तयार.

१. वीरशैवसदाचार संग्रह—( मराठी अर्थासह ) किंमत ०।१२.

२. सिद्धांतशिखामणि—( मराठी अर्थासह ) भाग १ ला किंमत १।८.

३. सिद्धांतशिखामणि—( मराठी अर्थासह ) भाग २ रा किंमत १॥ रुपया.

४. बसवेश्वरगुरुराज व्यासोक्त—( मराठी अर्थासह ) भाग १ ला किंमत १।८

५. बसवेश्वरगुरुराज व्यासोक्त—( मराठी अर्थासह ) भाग २ रा किंमत १।८

६. वीरशैवाचारप्रदीपिका—( मराठी अर्थासह ) किंमत २ रुपये.

७. हरिहरतारतम्य—( मराठी अर्थासह ) किंमत ०।४.

८. पादोदकविचार—आवृत्ति ३ किंमत ०।२.

९. रामायणसार संग्रह—( अप्पयदीक्षितकृत ) ह्यांत शिवाचा महिमा सर्वांपेक्षां अधिक असल्याचें वर्णन आहे. किंमत आ० ६.

१०. उपयुक्त वेंचे—ह्यांत वीरशैवधर्मास अनुकूल असे इतर पुराणांतील अर्थासह उतारे दिले आहेत. किंतत ०।७.

११. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण—कानडी टीकेसह किंमत आ० ०।४.

१२. पारमेश्वरागम—भाग १ ला मराठी अर्थासह किंमत १ रुपया.

१३. पारमेश्वरागम—भाग २ रा मराठी अर्थासह किंमत १ रुपया.

१४. प्रभुलिंगलीला—भाग १ ला ( भविष्यत्पुराणांतर्गत ) यांत अल्लमप्रभूची लीला फारच चटकदार रीतीनें वर्णिलेली आहे. किंमत १।८.

१५. प्रभुलिंगलीला—भाग २ रा ( भविष्यत्पुराणांतर्गत ) ह्यांत प्रमथगणांचे अवतार, त्यांचीं चरित्रें व महादेवीअक्कास कृतार्थ केल्याचें वर्णन आहे. किंमत १।४.

१६. प्रभुलिंगलीला—भाग ३ रा ( भविष्यत्पुराणांतर्गत ) ह्यांत अल्लम प्रभूनें बसवेश्वरास व इतर भक्तांस तत्वोपदेश केल्याचें वर्णन आहे. किंमत १ रुपया.

१७. पंचाचार्यपंचमोत्पत्तिप्रकरणम्—( सुप्रबोधागमांतर्गत ) यांत पंचाचार्य व पंचम यांचीं उत्पत्ति कशी झाली याबद्दल माहिती आहे. किंमत आ० ६.

१८. वीरमाहेश्वरप्रकरणम्—( स्कंदपुराण शंकरसंहितामध्यपठित ). यांत वीरशैवाची विशेष प्रशंसा आहे. किंमत आ० ८.

१९. दीक्षादिकथनम्—( श्रीव्यासकृत लिंगपुराण उत्तरभागांतील ) यांत विष्णु, ब्रह्मदेव वगैरे देवांनीं वगैरे लिंगधारण केलें याबद्दल माहिती आहे. किंमत आ० २.

२०. सूक्ष्मागम—किंमत आ० १०, याचें स्वरूप व महत्व समजावें म्हणून याचें पटल पांचवें किंमत आ० १, सहावें किंमत आ० १. सातवें आ० १। व नववें किं ९ पै. हीं निराळीं छापविलीं आहेत.

२१. संक्षिप्त लिंगपूजाविधि—कित्येकांनां रोज समग्र लिंगपूजा करतां येत नाहीं, सबब थोड्या वेळांत ( १५–२० मिनिटांत ) लिंगपूजा करतां यावी म्हणून हा लहानसा ग्रंथ तयार केला आहे. किंमत ९ पै.

२२. वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपट—किंमत आ० १.
२३. व्यापारसाम्राज्य पूर्वार्धं—किंमत १ रुपया.
२४. शिवपरअभंग—किंमत ७ आणे.
२५. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी—भाग १ ला. किंमत ५ आणे.
२६. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी—भाग २ रा. किंमत ५ आणे.
२७. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी—भाग ३ रा. किंमत ४ आणे.
२८. मराठी सिद्धरामेश्वर चरित्र—किंमत ७ आणे.
२९. वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधि—वीरशैव सदाचारसंग्रहांतील प्रकरण ११ वें. किंमत १ आणा.
३०. शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण—( शिष्य कोणाला करावा याचा विचार ) वीरशैवसदाचारसंग्रहांतील प्रकरण १४ वें. किंमत १ आणा.
३१. शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभाग—मराठी अर्थासह किं. २ रु.
३२. " " उत्तरभाग—मराठी अर्थासह २ रुपये.
३३. भारतसारसंग्रह—मराठी अर्थासह किंमत आणे ६
३४. वीरशैव खानेसुमारी—किंमत आ० १.
३५. वीरशैव मतसंवर्धिनी—किंमत आ० २.
३६. संक्षिप्त विवाहविधि—किंमत आ० ३.
३७. विशेषार्थप्रकाशिका—मराठी अर्थासह ७ आणे.
३८. अनादिवीरशैवसारसंग्रह—मराठी अर्थासह भाग १ ला किंमत १॥८.
३९. अनादिवीरशैवसारसंग्रह—मराठी अर्थासह भाग २ रा. किंमत १॥८.
४०. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण—मराठी अर्थासह किं. आ० ११.
४१. " —केवळ कानडी टीका: किं. ४ आणे.
४२. वीरमाहेश्वराचारसंग्रह— भाग १ ला १॥ रुपया किंमत.
४३. भाग २ रा.—किंमत २ रुपये.
४४. दशकमपद्धति—किंमत १।.
४५. शिवचरित—मराठी अर्थासह किं ७ आ०
४६. तात्पर्यसंग्रह—मराठी अर्थासह किं. ४=॥.

यांपैकीं कोणत्याही ग्रंथांच्या एकदम दहा प्रती घेणारास एक प्रत बक्षिस मिळेल.

## छापत असलेले ग्रंथ.

१. वीरशैवशिवपूजापद्धति. २. वीरमाहेश्वराचारसंग्रह भाग ३ रा.

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथे रावसाहेब भाऊसा वसंता वारद यांचे दुकानीं व यादिवाय मुंबई, विजापूर व कलबुर्गी येथे रावसाहेब वारद यांचे दुकानीं विक्रत मिळतील.